# हृद्गत–(द्वितीयावृत्तीचें)

"मराठी साहित्याची रूपरेषा" या ग्रंथाची इ. स. १९५२ सालीं प्रसिद्ध केलेल्या ग्रंथाची द्वितीयावृत्ति काढण्याचा सुयोग आज येत आहे, तो रसिक पण विचक्षण वाचकवर्गाच्या कृपेमुळेंच होय. ज्या आपुलकीनें त्यांनीं पहिल्या आवृत्तीचा स्वीकार केला, त्याच आपुलकीनें ते या द्वितीयावृत्तीचा स्वीकार करोत अशी त्यांना प्रार्थना आहे.

पहिल्या आवृत्तींत शिलालेखाच्या काळापासून ते इ. स. १९५० सालापर्यंतच्या मराठी साहित्याचा स्थूलमानानें विचार केला होता. प्रस्तुत आवृत्तींत शिलालेखाच्या काळापासून ते इ. स. १९६० पर्यंतच्या काळातील मराठी साहित्याचा स्थूलमानानें परामर्श घेण्यात आला आहे. गेल्या दहा वर्षांत काव्य, नाटक, कथा, कादंबरी इत्यादि क्षेत्रांत नवे प्रवाह, मूळ मराठी साहित्याच्या सरितेला येऊन मिळाले आहेत. ही कामगिरी अक्षरशः शेंपन्नास ठळक लेखकांकडून झाली आहे. या सर्वांचा संपूर्ण विचार या ग्रंथांत केला नसून, त्याचा निर्देश मात्र केला आहे. या लेखकांविषयीं आताच निर्णयात्मक कांहीं लिहिणें उचित होणार नाहीं.

आतां आभार मानण्याची कामगिरी. पहिले आभार ईश्वराचे. अलीकडे प्रकृति नादुरुस्त राहत असल्यानें, द्वितीयावृत्तीचें काम झेपेल कीं नाहीं, या शंकेत होतों पण ईश्वराच्या दयेनें हें अवघड काम तडीला गेलें. इतर सज्जनांचेंहि साहाय्य झालें. त्यांत प्रमुखपणें आभार मानावयाचे ते माझे विद्यार्थीमित्र श्री. भालचंद्र चंद्रकांत धारकर एम्. ए. यांचे. सांगीतलेला मजकूर लिहून घेण्याचें व प्रेसकॉपी तयार करण्याचें बरेचसें काम त्यांनीं केलें. मुद्रितें तपासण्याचें व सूची तयार करण्याचें काम श्री. रामचंद्र चिंतामण भावे, श्री यशवंतराव देवस्त व विद्यार्थीमित्र श्री. ग. ल. वैद्य एम्. ए. यांनीं केलें. या सर्वांचा मी ऋणी आहें. घरांतील मंडळीचे आभार काय मानावयाचे! परंतु माझी पत्नी

व मुल याच प्रुफें तपासण्याचें कामीं पुष्कळ साहाय्य आलें. श्री सयाजी साहित्य मालेचे चालक यानीं ही द्वितीयावृत्ति काढण्याची परवानगी दिली त्याबद्दल त्याचेहि आभार मी मानतों काहीं महिन्यामागें महाराष्ट्रातील लेखकाना स्वत न्या साहित्यसेवेची माहिती पुरविण्यावावत मी विनंति केली होती या विनंतीला ज्यानीं ज्यानीं सक्रिय उत्तर दिलें त्याचा मी ऋणी आहें शेवटीं बडोदें येथील श्रीरामविजय प्रेसचें मालक श्री कृष्णराव मराठे यानीं ग्रंथ छापण्याची कामगिरी चांगली केल्याबद्दल त्याचे आभार मानतों

रसिकवाचकानीं 'न्यून त पुरतें अधिक तें सरतें' करून प्रस्तुत ग्रंथाचा उपयोग करावा, अशी त्याना विनंती करून हें द्वितीयावृत्तीचें हृद्गत पुरें करतो

बडोद
बुधवार ता १४ जून १९६१ — वि पा दाडकर
भारतीय दिनाक २४ सौर ज्येष्ठ १८८३

## हृद्गत ( पहिल्या आवृत्तीचें )

मराठी नाट्यसृष्टि–पौराणिक नाटकें, मराठी नाट्यसृष्टि–सामाजिक नाटकें हे ग्रंथ लिहिण्याची प्रेरणा जशी मी ॲलर्डाईस निकोल याच्या ' ब्रिटिश ड्रामा ' या ग्रंथावरून मिळविली, तशी प्रस्तुत ग्रंथ तयार करण्याची मूळ प्रेरणा मला एमिल लेग्वॉय व लुई कझामिया यांच्या ' अ हिस्टरी ऑफ इंग्लिश लिटरेचर ' या ग्रंथामुळें झाली. श्री सयाजी साहित्यमालेच्या संचालकांनीं मला, मराठी साहित्याची स्थूल कल्पना देणारा, ग्रंथ तयार करायला सांगून या प्रेरणेला प्रोत्साहन दिलें, आणि अशा रीतीनें ' मराठी साहित्याची रूपरेषा' हा ग्रंथ तयार झाला.

प्रस्तुत ग्रंथात शिलालेखाच्या काळापासून ते इ. स. १९५० पर्यंतच्या काळातील मराठी साहित्याचा परामर्श घेण्यात आला आहे. हा परामर्श अर्थातच मर्यादित स्वरूपाचा, रूपरेषेच्या स्वरूपाचा आहे. मराठी साहित्याचें संपूर्ण, सविस्तर, सूक्ष्म विवेचन यात नाहीं. परंतु मराठी साहित्याचे प्रमुख मानकरी आणि त्यांचें कार्य याविषयींचें यथार्थ ज्ञान प्रस्तुत ग्रंथावरून होईल, अशी तजवीज करण्यात आली आहे.

ही ललित साहित्याची रूपरेषा असल्यानें हींत ललितेतर साहित्यिकांचा इच्छा असूनहि फारसा विचार करता आला नाहीं. खुद्द बडोद्यातील श्रीमंत दत्तात्रय चिंतामण ऊर्फ आबासाहेब मुजुमदार यांनीं दहा खंडांचा व्यायाम ज्ञानकोश तयार केला असूनहि त्याचा उल्लेख या ग्रंथात नाहीं ! ग्रंथाचा विस्तार होऊं नये म्हणून लिहिलेल्या मजकुरांतील सुमारें दीडशे पानें गाळावीं लागलीं ! मोरोपंताच्या शब्दांत याविषयीं सांगावयाचें तर असें म्हणता येईल "गाथा श्रवण कराया योग्य परि ग्रंथविस्ताराकरिता। इतिहास गाळल्या हा झाला श्रम मलाहि चित्त आवरिता ॥"

प्रस्तुतची 'रूपरेषा' तयार करीत असताना अक्षरशः शेकडो ग्रंथाचा आणि ग्रंथकाराचा उपयोग करण्यात आला असला तरी, महाराष्ट्र सारस्वतकार

भावे, इतिहासाचार्य राजवाडे, डॉ. भांडारकर, महामहोपाध्याय द. वा. पोतदार. ह. भ. प. पांगारकर, प्रा कृ. पां. कुलकर्णी, प्रा. रा. श्री. जोग, सरवटे, प्रो सरदार, डॉ. कोल्हे, बाळकृष्ण महानुभावशास्त्री, डॉ. शंकर दा. पेंडसे, प्रा. रा. वा. दांडेकर, प्रा न र. फाटक, शंकर श्रीकृष्ण देव इत्यादि ग्रंथकारांचा आधार प्रामुख्यानें घेण्यात आला आहे.

सामाजिक-राजकीय-भौगोलिक परिस्थितीचा परिणाम साहित्यावर होतो प्रस्तुत ग्रंथात कोणत्या सामाजिक-राजकीय परिस्थितीत विशिष्ट ग्रंथकारांनी विशिष्ट प्रकारचेच ग्रंथ निर्माण केले. त्याचें सुरुवातीच्या काळापासून ते अगदी अलीकडच्या काळापर्यंत विवेचन केलें आहे ग्रंथकाराच्या चरित्रासंबंधीं भाबडे पणानें किंवा भाविकपणानें पाल्हाळ करीत न बसता, चरित्रविषयक माहिती अगदी थोडक्यात व त्रोटकपणें दिली आहे. ग्रंथकाराचें कार्य व ग्रंथांतील मर्म हीं विशद करून सांगण्यावरच मुख्य भर देण्यात आला आहे. अर्थात्‌च कमी महत्त्वाच्या लेखकांचा आणि पुस्तकांचा प्रस्तुतच्या 'साहित्याच्या रूपरेषेत' उल्लेख टाळण्यात आला आहे. बी ए व एम्. ए करिता मराठी विषय घेणाऱ्या विद्यार्थ्यांना मराठी साहित्याच्या सर्वांगीण व साधार अभ्यासाकरिता आतापर्यंत अनेक ग्रंथ अभ्यासावे लागत प्रस्तुत ग्रंथानें ही त्यांची दगदग बरीच वांचेल असे वाटते मराठी साहित्यासंबंधीं व त सर्वविभागाच्या शेंकडो लेखकांसंबंधीं माझे काहीं विचार आज इतक्या वर्षांच्या अनुभवानें व अभ्यासानें तयार झाले आहेत ते विचार मराठी साहित्यरसिकांच्या समोर मांडण्याचें कार्य या ग्रंथानें मी करीत आहे माझा हा अल्पसा प्रयत्न वाचकांना आवडल्यास मला धन्यता वाटेल

बडोदें
ता २८-९-५२ — वि पां दांडेकर
विजयादशमी शके १८७४

# अनुक्रमणिका

## पूर्वार्ध

## उत्तरार्ध

# मराठी साहित्याची रूपरेषा

## पूर्वार्ध

# प्राचीन मराठी साहित्य

## १

## प्रास्ताविक

### महाराष्ट्राचा पूर्वेतिहास

मराठी साहित्याची रूपरेषा नीट लक्षात येण्याच्या दृष्टीनें महाराष्ट्राचा पूर्वेतिहास, महाराष्ट्रांतील राजकीय स्थित्यंतरें, मराठी भाषेची उत्पत्ति इत्यादि जाणणें उपयुक्त ठरेल.

महाराष्ट्र शब्दाच्या व्युत्पत्तिसंबंधानें निरनिराळीं मतें आहेत. डॉ. विल्सन[१] यांच्या मतें, "महरट्ट हें महाराष्ट्र या संस्कृत शब्दाचें पाली रूप आहे. हें रूप मल्लराष्ट्र या शब्दाबरोबर विष्णुपुराण वगैरे पुराण ग्रंथांत आढळतें. संस्कृत पंडित महाराष्ट्र शब्दाची व्युत्पत्ति महा+राष्ट्र=मोठें राष्ट्र अशी करतात... परंतु त्या व्युत्पत्तीस पुरेसा ऐतिहासिक अगर भौगोलिक पुरावा आढळत नाहीं[१]."—असें असून ते महारांचें राष्ट्र तें महाराष्ट्र अशी दुसरी व्युत्पत्ति सुचवितात. गांव तेथें महारवाडा, ही म्हण आदि स्वमतपुष्ट्यर्थ ते पुढें करितात. ह्या व्युत्पत्तिविरुद्ध एका

---

१ मोल्सवर्थ कोशाची प्रस्तावना.

गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे की, ऐहोळी येथील जैन रविकीर्तिच्या शिलालेखांत (इ. स. ६३४) महाराष्ट्र हें एक राष्ट्र नसून तीन महाराष्ट्रांचा समुदाय आहे असे स्पष्ट म्हटले आहे. डॉ. ओप्पर्ट[1] यांनी दि ओरिजिनल इनहॅबिटंट्स ऑफ भारतवर्ष (भारतवर्षाचे आदिवासी) या आपल्या ग्रंथात "मल्लराष्ट्र म्हणजे महाराष्ट्र होय, मार म्हणजेच मल्ल व मार लोकांनाच म्हार असें म्हणत, म्हाराचे हळुहळू महार झाले, महार लोकांच्या भाग्याला उतरती कळा जसजशी लागत चालली तसतसा त्यांच्या महाराष्ट्र व मल्लराष्ट्र या नावाशी असलेल्या संबंधाचा विसर पडून महा+राष्ट्र असा अर्थ करण्यात येऊ लागला."—असें मत सुचविलें आहे. महाराष्ट्रांतील फार मोठ्या वर्गाचें कुलदैवत खंडोबा यानें मणि व मल्ल या दैत्यांचा वध केल्यावरून त्यास मल्लारि असें म्हणतात. या गोष्टीवरून तसेंच मल्लग, मळगाव, मळखेडें, मळराग, मळवली इत्यादि गावांच्या नावांवरून महाराष्ट्रांत पूर्वी मल्ल जातीचे लोक राहात असावेत असें कै. राजवाडे यांचें जें मत आहे त्यावरून ही व्युत्पत्ति अगदींच अग्राह्य अशी वाटत नाहीं. डॉ. भांडारकर[2] या बाबतीत असें म्हणतात, "कुडा व बेडसा येथील शिलालेखांत महाभोज असा उल्लेख आहे. ज्याप्रमाणें भोज हे स्वतःला महाभोज म्हणवीत त्याप्रमाणें राष्ट्रिक, रट्टि, रठि, रट्ठ स्वतःला महारट्ठ किंवा महारठ्ठ म्हणवीत. त्यांच्या देशाला महारट्ठ व त्याचेंच संस्कृत रूप महाराष्ट्र होय." अशोकाच्या शिलालेखांत 'राष्ट्रिकां'चा उल्लेख आहे. त्यावरून ह्या राष्ट्रिकांचें किंवा रट्ठांचें जें राष्ट्र तें महारट्ठ किंवा महाराष्ट्र होय हें उघडच दिसतें. कै. वि. का. राजवाडे यांनीं आपल्या 'महाराष्ट्राचा वसाहतकाल' या निबंधात डॉ. भांडारकर यांच्या व्युत्पत्तीस पोषक असेंच मत दिलें आहे. गजाननशास्त्री भागवत यांच्या मतें महारथींचा जो देश तोच महाराष्ट्र होय. महामहोपाध्याय पा. वा. काणे यांच्या मतें मोठें राष्ट्र तें महाराष्ट्र होय. महाराष्ट्रांत पूर्वी मोठें अरण्य होतें. त्याच्या जागीं आर्यांनीं वसाहती स्थापून मोठें राष्ट्र निर्माण केलें, म्हणून त्याला

१ पृ. २२, १८९३

२ अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन (दक्षिण देशाचा प्राचीन इतिहास)

महाराष्ट्र म्हणू लागले. ह्या व्युत्पत्तीला पोषक असा उतारा महानुभावीय ग्रथात (आचार महाभाष्य) आढळतो. 'महाराष्ट्र म्हणजे महत्वराष्ट्र । म्हणून महाराष्ट्र । महत म्हणजे थोर । असे त्यात एके ठिकाणी म्हटले आहे. वरील सर्व व्युत्पत्तींत रठ्ठाचा किंवा महारठ्ठाचा जो देश तो महारठ्ठ म्हणजे महाराष्ट्र ही व्युत्पत्ति आणि मोठें राष्ट्र तें महाराष्ट्र ही व्युत्पत्ति ह्या दोन आमच्या मतें अधिक ग्राह्य आहेत. कारण या दोन्हीं व्युत्पत्तींना शिलालेखाचा आधार[१] आहे.

आता ह्या महाराष्ट्राची व्याप्ति व मर्यादा या कोठपर्यंत आहेत तें पाहू या. स्थूल मानानें पाहाता ज्या भागात मराठी भाषा चालते, बहुसंख्य लोकाकडून बोलली जाते तो महाराष्ट्र होय. या प्रदेशाची व्याप्ति निरनिराळ्या काळीं कमी अधिक असण्याचा संभव आहे. तथापि सामान्यतः या देशाच्या मर्यादा पुढें दिल्याप्रमाणें सागता येतील. "मुख्य मराठी भाषा भरतखंडाच्या पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीज अमलाखालीं असलेल्या गोव्याच्या हद्दीपासून सुरू होऊन समुद्र किनाऱ्यानें वर उत्तरेकडे दमण जवळील दमणगगा या नदीपर्यंत जाते. ही नदी सह्याद्रीच्या पश्चिमेकडील सखल प्रदेशापुरती मराठी भाषेची उत्तरेकडील सीमा होय घाटमाथ्यावर मात्र ही सीमा पाणलोटाच्या बाजूबाजूनें कोळी, भिल्ल वगैरे वन्य समाजातून वर नर्मदेपर्यंत जाते. नर्मदा नदी गुजराती व नेमाडी या भाषापासून मराठीला विभिन्न करणारी रेषा होय. हीच सीमारेषा पुढें नर्मदेला पूर्वेस व पश्चिमेस स्पर्श करून असलेल्या सातपुडा पर्वताच्या कडेनें गेली आहे. गाविलगडाच्या आसपास ज्या ठिकाणीं सातपुड्याच्या एका दुसऱ्या फाट्यास सुरवात होते तेथें ही सीमारेषा पूर्वेकडे बैतुल व शिवणीकडे प्रारंभ करून नागपूर व शिवणी यामधील घाटात संपते. व तेथून नागपूर मध्य कल्पून काहीशा अर्धवर्तुलाकार रेषेंत ही सीमारेषा थोडी दक्षिणेकडे व थोडी पूर्वेकडे आणि नतर पश्चिमेकडे वळून लाजी व वैरागड याना स्पर्श करून जाते. तेथें

१ अशोकाचे शिलालेख, पेंढोळी येथील शिलालेख; नाणेघाटातील शिलालेख.

२ महाराष्ट्र शब्दकोश, खंड तिसरा.

तिची गोंडी व तेलगू भाषांनी गाठ पडते तेथून नंतर ही सीमारेषा चांद्याच्या नजीक जाऊन तेथून पश्चिमेकडे आपला सुरुवात करून पैनगंगेच्या मार्गानें माहूरपर्यंत जाते. ही रेषा मराठी व तेलगू यामधील विभाजक रेषा होय माहूरपासून गोदावरीपर्यंत जाऊन नागमोडी मार्गानें ती नैऋत्य दिशेकडे देगलूर, नल्दुर्ग, सोलापूर, विजापूर, यांना स्पर्श करून जाते. तेथून ही रेषा कृष्णेपर्यंत जाऊन जवळ जवळ कोल्हापूर पर्यंत जेथें कृष्णा उत्तरेकडे वळण घेते तेथपर्यंत जाते कृष्णा ही मराठी व कानडी यामधील विभाजक रेषा आहे नंतर ही रेषा नैऋत्य दिशेकडे वळून कोल्हापूर संस्थानच्या मुलुख व गोव्याच्या घाटावरील मुलुख पोटात घेऊन तेरेखोलच्या खाडीपाशी समुद्रास मिळते" हल्लीच्या महाराष्ट्र राज्याच्या निश्चित् सीमा वाचकाला परिचित असल्यानें, त्या येथें दिलेल्या नाहीत

वर ह्या मर्यादा दिल्या आहेत त्यात आज परिचित नावानीं पहावयाचें म्हणजे मुख्यत पुढील प्रदेश येतात. गोकर्ण, गोवें प्रांत, कोंकण, देश, खानदेश वऱ्हाड, मराठी मध्यप्रांत, व निजामाच्या राज्यातील मराठवाडा या मुख्य भागात पुढील जिल्हे सामान्यत मोडले जातात कारवारचा काहीं भाग, गोवा, बेळगावचा काहीं भाग, रत्नागिरी, कुलाबा, ठाणें, सातारा, सोलापूर, पुणें, अहमदनगर, पूर्व व पश्चिम खानदेश हे मुंबई इलाख्यातील जिल्हे, वऱ्हाडातील बुलढाणा, अकोला, यवतमाळ, अमरावती हे चार जिल्हे, तसेच मध्यप्रांतातील (आताच्या महाराष्ट्र राज्यातील) वर्धा, नागपूर, चांदा व भंडारा हे जिल्हे आणि बालाघाट व छिंदवाडा या जिल्ह्यांचा भाग व छत्तिसगड, बस्तर, रायपुर, दुर्ग वगैरेंचा काहीं भाग दक्षिणेतील पूर्वीचीं संस्थानें, आणि निजामशाहीतील औरंगाबाद, बीड, नांदेड, परभणी हे जिल्हे, उस्मानाबाद व बेदर यांचा काहीं भाग, या सर्व प्रदेशास आज आपण महाराष्ट्र या नावानें सामान्यपणें संबोधितो परंतु यास महाराष्ट्र हें नाव फार प्राचीन काळापासून दिलेले आढळत नाहीं प्राचीनकाळीं या प्रदेशाच्या निरनिराळ्या भागांस निरनिराळीं नावें असलेलीं आढळतात वऱ्हाड ह्या प्रदेशास पूर्वी विदर्भ म्हणत खानदेश, अजंठ्याचा पहाड

वगैरे भाग अश्मक या नावानें प्रसिद्ध होता. नाशिकच्या आसपासच्या भागास दण्डकारण्य या नावानें संबोधिलें जाई. ह्या दंडकारण्याच्या दक्षिणेकडील कृष्णेजवळच्या भागास कुंतल व कोंकणास अपरांत असें नाव आढळतें.

बृहदारण्यकोपनिषद्, महावंसो, बौधायनस्मृति, महाभारत, रामायण इत्यादि प्राचीन ग्रंथात व अशोकाचीं शासनें आणि भाजे, बेडसा, कार्ले, नाणेघाट, नाशिक इत्यादि शिलालेखात विदर्भ, वनवास, महारठ, दक्षिणापथ, अपरान्त, नाशिक्य, कुंतल, सुपारग (सोपारा), कलियन (कल्याण), पतिठाण (पैठण) इत्यादि महाराष्ट्रात अन्तर्भूत होणाऱ्या स्थळांचा निर्देश असला तरी महाराष्ट्र या नावाचा उल्लेख वराहमिहिराच्या काळापर्यंत (इ. स. ४९०) आढळत नाहीं. वराहमिहिराच्या बृहत्संहितेंत विदर्भदेश भारतवर्षाच्या मध्यभागाच्या आग्नेय दिशेला आहे असें सांगितलें आहे. (बृहत्संहिता अ. १४-८) याच ग्रंथाच्या दहाव्या अध्यायात महाराष्ट्राचें नाव आलेलें आहे. 'भाग्ये रसविक्रयिणः पण्यस्त्रीकन्यका महाराष्ट्राः।' (बृ. स. १०-८) ऐहोळीचा जैन रविकीर्ति यानें लिहिलेला शिलालेख अत्यंत महत्वाचा आहे. हा इ. स. ६३४ मध्यें सत्याश्रय पुलकेशीच्या कारकीर्दीत लिहिण्यात आला असून त्यात रविकीर्तीनें असें म्हटलें आहे कीं, महाराष्ट्रांचे तीन भाग असून त्यात ९९००० गावें आहेत. (अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्रकाणां। नवनवति सहस्रग्रामभाजां त्रयाणाम्) रविकीर्तीच्या वेळीं बदामी शहर महाराष्ट्रात मोडत होतें. ऐहोळी शिलालेखाच्या वेळीं हिंदुस्थानात आलेला चिनी प्रवासी ह्युएनत्संग ह्यानें आपल्या प्रवासवृत्तात महाराष्ट्राबद्दल खालील सीमादर्शक उल्लेख केला आहे. द्रविडदेशाहून उत्तरेस तो प्रवासी एक लहान गावास गेला. तेथून २००० ली (२५०–३०० मैल) प्रवास केल्यावर तो कोंकणपुर (Kung kin-napuls) ह्या देशाला गेला. हा देश ५००० ली आहे व त्याच्या राजधानीचा विस्तार ३० ली आहे. कोंकणपुर देश सोडून वायव्येस (इशान्येस ?) प्रवास केल्यावर एक मोठें अरण्य लागलें. त्यात वन्यपशु व पुष्कळ क्रूर लुटारू होते. कोंकणपुरापासून २४०० ली (३५०–४०० मैल) वाट चालल्यावर तो महाराष्ट्र (Mo ha-la-cho)

देशात आला. ह्या देशाचा विस्तार ६००० ली होता व त्याची राजधानी ३० ली होती.

ह्या महाराष्ट्रात आर्यांनीं केव्हा वसति केली, या मुद्याकडे आता आपण वळू या. दंडकारण्य किंवा महाकान्तार म्हणजे प्रचंड अरण्य असलेल्या या भागात केव्हापासून लोक येऊन राहू लागले हा मुद्दा खरोखरच महत्त्वाचा आहे. पाणिनीच्या काळीं (शकपूर्व ९०० वर्षें) दंडकारण्याची किंवा विंध्यपर्वताच्या दक्षिणेकडील माहिती आर्यांना नसावी हें उघड आहे. कारण पाणिनीसारख्या अत्यंत चौकस वैयाकरणानें इतर देशाचा आपल्या सूत्रात उल्लेख केला, तसा दंडकारण्याचा केलेला नाहीं. कात्यायनानें मात्र आपल्या वार्तिकात महिष्मत् या देशाचा उल्लेख कुमुद्वत्, नड्वत्, वेतस्वत् या देशाबरोबर केला आहे. महिष्मत् हा देश महाराष्ट्रात मोजला जात असून त्याची राजधानि नर्मदेकाठीं असलेलें महिष्मति किंवा महेश्वर हें शहर होतें. कात्यायनाचा काळ शकपूर्व महाशें वर्षें मानतात. कात्यायनानें नासिक्य उर्फ नाशिक शहराचाहि उल्लेख केला आहे. पतंजलीच्या काळीं तर हरमहा सर्वांच्या परिचयाचा दक्षिणापथ हा देश झाला होता. महिष्मती, वैदर्भ, कांचिपूर, केरल इत्यादि शहराचा उल्लेख पतंजलीच्या ग्रंथात आहे. अर्थात् शकपूर्व सातव्या शतकापासून आर्यांची वसति दंडकारण्यात हळुहळू होऊ लागून, शकपूर्व तिसऱ्या शतकात तर रट्टांचीं किंवा राष्ट्रकूटांचीं छोटीं छोटीं राज्यें महाराष्ट्रात सिद्ध झालीं होतीं. अशोकाच्या शासनावरून तसेंच नाणेघाटातल्या शिलालेखावरून ही गोष्ट सुस्पष्ट आहे. आर्यांपैकींच मानव्य, हैहय, भोज, यादव, नळ, कदंब, मौर्य, सेंद्रक, चालुक्य इत्यादि शेंकडो गोत्राचे रट्ट दंडकारण्यात शिरले. त्यानीं येथें ग्रामकूटपणा म्हणजे पाटिलकी व राष्टकूटपणा म्हणजे देशमुखी व महाराष्ट्रकूटपणा म्हणजे सरदेशमुखी इत्यादि अधिकाराचा स्वीकार करून आपलें वर्चस्व स्थापन केलें. ह्या शेंकडो गोत्राच्या रट्टाना शहाण्णव कुळींचें मराठे म्हणण्याची चाल आहे. आजच्या माने, शिंदे, जाधव, कदम इत्यादि आडनावात पूर्वीच्या मानव्य, सेंद्रक, यादव, कदंब इत्यादि गोत्राचा ठसा स्पष्ट दिसतो. आर्य दंडकारण्यात येण्यापूर्वी येथें

देशात आला. ह्या देशाचा विस्तार ६००० लीं होता व त्याची राजधानी ३० ली होती.

ह्या महाराष्ट्रात आर्यांनीं केव्हा वसति केली, या मुद्याकडे आता आपण वळू या. दण्डकारण्य किंवा महाकान्तार म्हणजे प्रचंड अरण्य असलेल्या या भागात केव्हापासून लोक येऊन राहू लागले हा मुद्दा खरोखरच महत्त्वाचा आहे. पाणिनीच्या काळीं (शकपूर्व ९०० वर्षे) दण्डकारण्याचा किंवा विंध्यपर्वताच्या दक्षिणेकडील माहिती आर्यांना नसावी हें उघड आहे. कारण पाणिनीसारख्या अत्यंत चोकस वैयाकरणानें इतर देशाचा आपल्या सूत्रात उल्लेख केला, तसा दण्डकारण्याचा केलेला नाहीं. कात्यायनानें मात्र आपल्या वार्तिकात महिष्मत् या देशाचा उल्लेख कुमुद्वत्, नड्वत्, वेतस्वत् या देशाबरोबर केला आहे. महिष्मत् हा देश महाराष्ट्रात मोजला जात असून त्याची राजधानि नर्मदाकाठीं असलेलें महिष्मति किंवा महेश्वर हें शहर होतें. कात्यायनाचा काळ शकपूर्व सहाशें वर्षे मानतात. कात्यायनानें नासिक्य उर्फ नाशिक शहराचाहि उल्लेख केला आहे. पतंजलीच्या काळीं तर सरसहा सर्वांच्या परिचयाचा दक्षिणापथ हा देश झाला होता. महिष्मती, वैदर्भ, कांचिपूर, केरल इत्यादि शहराचा उल्लेख पतंजलीच्या ग्रंथात आहे. अर्थात् शकपूर्व सातव्या शतकापासून आर्यांची वसति दण्डकारण्यात हळुहळू होऊ लागून, शकपूर्व तिसऱ्या शतकात तर रट्टांची किंवा राष्ट्रकूटाची छोटीं छोटीं राज्यें महाराष्ट्रात सिद्ध झालीं होतीं. अशोकाच्या शासनावरून तसेच नाणेघाटातल्या शिलालेखावरून ही गोष्ट सुस्पष्ट आहे. आर्यांपैकींच मानव्य, हैहय, भोज, यादव, नळ, कदंब, मौर्य, सेंद्रक, चालुक्य इत्यादि शेंकडो गोत्राचे रट्ट दण्डकारण्यात शिरले. त्यानीं येथें ग्रामकूटपणा म्हणजे पाटिलकी व राष्ट्रकूटपणा म्हणजे देशमुखी व महाराष्ट्रकूटपणा म्हणजे सरदेशमुखी इत्यादि अधिकाराचा स्वीकार करून आपलें वर्चस्व स्थापन केलें. ह्या शेंकडो गोत्राच्या रट्टाना शहाण्णव कुळींचे मराठे म्हणण्याची चाल आहे. आजच्या माने, शिंदे, जाधव, कदम इत्यादि आडनावात पूर्वीच्या मानव्य, सेंद्रक, यादव, कदंब इत्यादि गोत्राचा ठसा स्पष्ट दिसतो. आर्य दंडकारण्यात येण्यापूर्वी येथें

मूतिब, पुलिंद, शबर, भिल्ल, कातकरा, ठाकूर, गाँड, खोंड, कोळी व नाग इत्यादि अनार्य लोक गहत असावेत असे वाटतें. कदाचित् हे लोक, अमेरिकेंत नीग्रो युरोपियनांच्या मागाहून आले तसे, आर्यांच्या मागाहून किंवा बरोबरीनें आले असावेत असेंहि एकमत आहे[१] मराठींत व तत्पूर्वीच्या महाराष्ट्रींत अगदीं देशी, ज्याचा संस्कृतशीं कांहींहि संबंध नाहीं असे डोळा, पोट, हाड, आई, बाप इत्यादि अनेक शब्द आहेत त्यावरून तसेच आर्यांच्या संस्कृत भाषेला महाराष्ट्री सारख्या अपभ्रंश भाषेचें जें स्वरूप दंडकारण्यात आलें त्यावरून, या प्रदेशात अनार्यांची पुष्कळ वसति असावी हें उघड होतें. सांप्रत महाराष्ट्रात वंशशास्त्राच्या दृष्टीनें पाहता पश्चिमेकडील भागात सिदियन व द्रविडियन अशा मिश्रवंशाचे लोक मुख्यत्वें राहतात, व पूर्वेकडील भागात मोंगल्द्रविडियन वंशाचे लोक वसति करून आहेत. पश्चिमेकडील भागात ब्राह्मण, प्रभु, पाठारे प्रभु, मराठा, कुणबी, महार, धनगर, भिल्ल, लिंगायत या जाती मुख्य असून पूर्वे कडील भागात ब्राह्मण, चांभार, भिल्ल, गोंड, कुणबी, कोळी या जाती प्रमुख आहेत. या शिवाय वाणी, माळी, मांग, कुंभार, सुतार, आगरी, सोनार, न्हावी, बेरड, माहारी, धावळी, शिंपी, तेली, लोहार, वणजारा, अहिर याहि जाती महाराष्ट्रात आढळतात. मुसलमानांची लोकसंख्याहि महाराष्ट्रात आहे पण तिचें प्रमाण फार थोडें आहे. सर्वांत जास्त लोकसंख्या मराठा यांची असून कुणबी यांची लोकसंख्या त्यांच्या खालोखाल आहे

प्राचीनकाळीं अगस्ति ऋषीनें ज्या मार्गानें विंध्य पर्वत ओलांडून आर्यांच्या वसाहतीची मुहूर्तमेढ दंडकारण्यात रोविली, त्याच मार्गानें दाशरथी रामानें जाऊन हें वसाहतकर्म पुढें चालविलें. पूर्वसूरींच्या याच मार्गाचा अवलंब करून शकपूर्व सातव्या–आठव्या शतकात आर्यांनीं दंडकारण्यात घुसण्याचा जोराचा प्रयत्न केला. या रट्ट आर्यांनीं इतकें दमाम्यी वसाहतकार्य केलें कीं त्यांच्याच दंडकारण्याला पुढें महाराष्ट्र किंवा महारट्ठ म्हणू लागले

---

१ वै. वि. का. राजवाडे, महाराष्ट्राचा वसाहतकाल

## महाराष्ट्रांतील राजकीय स्थित्यंतरें

सम्राट अशोकाच्या शिलाशासनांवरून महाराष्ट्रावर राज्य करणाऱ्या राजघराण्यात मौर्य घराण्याचा प्रथम उल्लेख केला पाहिजे. हें घराणें खि. पूर्व ३२० ते खि. पूर्व. १८३ पर्यंत राजसत्ता उपभोगीत होतें. महाराष्ट्राच्या सर्व भागावर या घराण्याची सत्ता नसावी. कारण अशोकाच्या शिलालेखात आपल्या राज्याच्या दक्षिणेकडे राष्टिक (राष्ट्रिक) व पेटेणिक (पैठणक) यांची राज्यें असल्याचा उल्लेख आहे. तरी पण विदर्भ व शूर्पारक (सोपारा) या भागात मौर्यांची सत्ता होती ही गोष्ट निर्विवाद आहे. मौर्य घराण्यातील शेवटच्या राजा बृहद्रथ यास त्याचा सेनापति शुंगवंशीय पुष्यमित्र किंवा पुष्पमित्र याने ठार करून शुंगवंशाची स्थापना केली. या घराण्याने खि. पू. १८३ पासून खि. पू. ७३ वर्षांपर्यंत महाराष्ट्रावर राज्य केलें. या नंतर खि. पू. सारे ७३ पासून ते इ. स. २१८ पर्यंत सातवाहन (शालिवाहन) किंवा आंध्रभृत्य घराण्याकडे राजसत्ता आली. या आंध्रभृत्य घराण्यातील सिमुक (सिंधुक), कृष्ण, शातकर्णी, गौतमीपुत्र, पुळुमायी, यज्ञश्री व मदरिपुत्र इत्यादि राजांचा नाशिक व कान्हेरी येथील शिलालेखात उल्लेख आहे. गौतमीपुत्र शातकर्णी व वासिष्ठीपुत्र पुळुमायी ह्या पितापुत्रांनी एकाच वेळीं अनुक्रमें धनकटक (गन्तुर जिल्हा) व पैठण या भागात राज्य करून शक-यवन पल्हवांचा नाश केला, व आपल्या राज्याचा विस्तार उत्तरेस सुराष्ट्रापासून दक्षिणेस धनिकोट पर्यंत केला. हे पितापुत्र अत्यंत पराक्रमी, उदार व दानशूर होते असें नाशिक येथील शिलालेखावरून स्पष्ट होतें. आंध्रभृत्यांच्या अमदानींत सुमारें पन्नास वर्षें शकांचें आक्रमण यशस्वी ठरून, महाराष्ट्राच्या काहीं भागात त्यांचें राज्य होतें क्षहरात नहपान व त्याचा जावई उषवदात ह्या शक राजांचा उल्लेख नाशिक व जुन्नर येथील शिलालेखात आहे. बुद्ध भिक्षुकरिता उषवदातानें विहार बांधल्याचा उल्लेख नाशिक येथील लेण्यात आहे. वायुपुराण, विष्णु पुराण, मत्स्यपुराण इत्यादि पुराणात आंध्रभृत्य राजांची जी वंशावळ दिली आहे ती व शिलालेखात सातवाहनांची जी यादि आढळते ती हीं दोन्हीं एकच होत

नंतरच्या तीन शतकांचा इतिहास अज्ञात आहे
राजांचा ठसा स्पष्ट दिसतो. आर्य दण्डकारण्यात येण्यापूर्वी

आन्ध्रभृत्याच्या पडत्या काळात महाराष्ट्रांतील मूळचीं रट्टाची किंवा रट्टकुटाचीं घराणीं पुन्हा वर डोकीं करूं लागलीं असतील. खानदेशाच्या भागात आभीरांचें व त्याच्याखालीं रट्टकुट किंवा राष्ट्रकुटाचें राज्य ह्या काळात असावें यापैकींच इंद्र राष्ट्रकूटाचा जयसिंह चालुक्यानें पराभव करून, चालुक्य राजवंशाची स्थापना महाराष्ट्रात केली. जयसिंह चालुक्यानंतर रणराग व त्यानंतर त्याचा पुत्र पुलकेशी पहिला हा गादीवर आला हा मोठा पराक्रमी राजा होऊन गेला. यानें बदामी (वातापीपूर) येथें राजधानी स्थापन केली व अश्वमेध यज्ञ केला. मंगलीश चालुक्यानें त्रिपुरीच्या चेदीवंशीय कलचुरीचा पराभव केला. बदामी येथील लेण्यात मंगलीशानें विष्णुपूजा सुरू केल्याचा निर्देश आहे. दुसरा पुलकेशी हा तर मोठाच पराक्रमी होता. यानें मौर्य, लाट, मालव, गुर्जर इत्यादिकांचा पराभव केला त्याचें पूर्ण नाव सत्याश्रय श्री पृथ्वीवल्लभ पुलकेशी महाराज असें होतं. अजिंठा येथील एका चित्रात इराणी वकील याच पुलकेशीला पत्रिका देत आहे असें चित्र आहे. याच्याच राज्यात इ. स. ६३९ च्या सुमारास चिनी यात्रिक ह्युएन्त्संग हा चीनहून फिरत फिरत महाराष्ट्रात आला होता चालुक्य घराणें इ. स. ५१३ पासून ७५३ पर्यंत चालू होतें चालुक्य वंशातील शेवटचा राजा दुसरा कीर्तिवर्मा याचा पराजय दन्तिदुर्ग या राष्ट्रकूटानें करून, पुनश्च राष्ट्रकूट घराण्याची राजसत्ता प्रस्थापित केली. हें घराणें इ. स ७५३ पासून इ स. ९७२ पर्यंत सत्ता उपभोगित होतें

राष्ट्रकूट घराण्यातील प्रथमचे काहीं राजे अत्यंत पराक्रमी झाले दन्तिदुर्गानें चालुक्याचा पराभव केल्यानंतर त्याचा पूर्ण निःपात कृष्णराज राष्ट्रकूटानें केला. ह्याच कृष्णराजानें वेरूळ येथें आजहि टवीस पडणारें प्रचंड कैलास लेणें तयार करविलें. तिसऱ्या गोविंद राष्ट्रकूटानें आपल्या राज्याचा विस्तार माळव्यापासून कांचीपुरपर्यंत केला. ह्या राष्ट्रकुटाच्या कारकीर्दीतच बुद्धविहार मागें पडून शिव व विष्णु यांच्याकरिता भव्य देऊळें जागोजागीं उभारलीं गेलीं. बुद्धधर्माचा या काळांत नेवट झाला तरी जैनधर्मानें आपला टिकाव धरला. विद्या व कला ह्यांना उदार आश्रय याच काळांत मिळाला. राष्ट्रकूटाची राजधानि मान्यखेट किंवा

मान्यखेट येथें होती. राष्ट्रकूट घराण्यांतील शेवटचा राजा कर्क याला चालुक्य वंशीय तैलपानें इ. स. ९७२ च्या सुमारास जिंकून पुनः चालुक्यांचें साम्राज्य स्थापन केलें. हे उत्तर चालुक्य व पूर्वीचे चालुक्य एक नव्हेत असें कै. डॉ. भांडारकर यांचें मत आहे. तैलपानंतर सत्याश्रय विक्रमादित्य (पहिला), जयसिंह, सोमेश्वर (पहिला), सोमेश्वर (दुसरा), विक्रमादित्य (दुसरा), सोमेश्वर (तिसरा), सोमेश्वर (चौथा), इत्यादि अकरा राजे इ. स. ११८९ पर्यंतच्या काळांत झाले. या राजांत दुसऱ्या विक्रमादित्याची कारकीर्द फारच गाजली. त्यानें इ. स. १०७६ ते इ. स. ११२६ पर्यंत पन्नास वर्षें दणदणीत राज्य केलें. चालुक्यांची राजधानी बेदरजवळील कल्याण किंवा कल्याणी ही होती. शेवटचे चालुक्य राजे दुर्बळ निघाल्यामुळें त्यांच्या मांडलिक राजांनीं त्यांच्याविरुद्ध बंड पुकारण्यास सुरुवात केली. अशा मांडलिकांपैकींच कल्चुरी वंशाचे राजे होते. अखेरीस यादववंशीय पांचव्या भिल्लमानें इ. स. ११८९ च्या सुमारास यादवांचें साम्राज्य स्थापिलें. यादववंश हा मूळचा उत्तरेंत मथुरेस राज्य करीत होता. तो कृष्णाच्या काळीं द्वारकेचा राजवंश झाला. याच वंशांतील दृढप्रहार यानें प्रथम दक्षिणेंत चंद्रादित्यपूर किंवा चांदवड येथें आपलें राज्य इ. स. ७५४ च्या सुमारास स्थापिलें. पुढें या वंशांतील पराक्रमी राजा भिल्लम यानें चालुक्यांचा नायनाट करून देवगिरी (आधुनिक दौलताबाद) येथें राजधानी नेली. भिल्लमानंतर त्याचा मुलगा जैत्रपाल हा गादीवर बसला व त्याच्यानंतर त्याचा मुलगा सिंघण यानें सर्व दक्षिणभर यादवांची सत्ता स्थापून गुजरातहि आपल्या अमलाखालीं आणला. याच सिंघणाच्या सुप्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्यांचा नातू चांगदेव हा ज्योतिषी होता. यानेंच कोल्हापुरच्या शिलाहार राजा दुसरा भोज याचा पराभव करून (शके १०८९) त्याचें राज्य देवगिरीस जोडलें. सिंघणानंतर त्याचे नातू कृष्ण व महादेव यांनीं अनुक्रमें इ. स. १२४७ ते १२६० व १२६० ते १२७१ राज्य केलें. महादेवानंतर त्याचा पुतण्या रामचंद्र किंवा रामदेव हा इ. स. १२७१ मध्यें गादीवर बसला. याच महादेव व रामदेव राजाच्या प्रधान हेमाद्रि किंवा हेमाडपंत नांवाचा विद्वान ब्राह्मण होऊन गेला. यानेंच मराठींत मोडी लिपी

अस्तित्वांत आणिली यानें चतुर्वर्गचिंतामणि नावाचा चारहि पुरुषार्थांचे विवेचन करणारा ग्रंथ लिहिला. रामदेव राजाच्याच कारकीर्दीत श्रीज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरी नामक ग्रंथ रचिला. सुरवातीच्या लीळा चरित्र, सूत्रपाठ, वछाहरण, रुक्मिणी स्वयंवर इत्यादि महानुभावीय वाङ्मयाची रचना याच काळांत झाली.

महाराष्ट्रांतील यादव राजाच्या साम्राज्याचा शेवट अल्लाउद्दीन खिल्जीचा एक सरदार मलिक-इ-काफूर यानें केला. ज्ञानेश्वरींत ज्या रामदेवराव यादवाचा गौरवपूर्वक उल्लेख करण्यात आला आहे, त्याच्यावर अल्लाउद्दिन खिलजीनें स्वारी करून त्याला आपलें मांडलिकत्व कबूल करायला लाविलें होतें. रामदेवरावानें कांहीं दिवस मांडलिकत्व मान्य करून पुढें दिल्लीस खंडणी देण्याचें बंद केलें. तेव्हां मलिक इ-काफूरनें त्याच्यावर चढाई करून त्यास पुनः दिल्लीच्या बादशहाचें वर्चस्व कबूल करायला लाविलें. हें त्यानें आमरण कबूल केलें. पुढें रामदेवराव वारल्यावर त्याचा मुलगा शंकरदेव यादव हा गादीवर बसला. त्यानें दिल्लीचें वर्चस्व नाकारल्यानें मलिक इ-काफूरनें पुनः देवगिरीवर स्वारी करून या खेपेस (इ. स. १३१२) शंकरदेव यादवाला ठार मारलें. अशा तऱ्हेनें मराठ्याची राजधानी देवगिरी ही मुसलमानांच्या ताब्यात गेली.

इ. स. १३१२ पासून पुढें तीनशें सव्वातीनशें वर्षेपर्यंत महाराष्ट्रांत मुसलमानांचेंच राज्य चालू होतें. खिलजी घराण्यानंतर दिल्लीच्या गादीवर तघलख घराणें आलें. महमद तघलखानें साम्राज्यविस्तार बराच केला. पण त्याला तो सांभाळतां आला नाहीं. त्यामुळें मुलतान बंगाल-वरगळ-बेदर देवगिरी-गुजरात अशीं जिकडे तिकडे बंडें उत्पन्न झालीं. अशा बंडांतूनच हसन गंगू ब्राह्मणी (कोणी यास झफिरखान ऊर्फ अलाउद्दिन हुसेन कांगो म्हणतात) यानें महाराष्ट्रांत इ. स. १३४७ मध्यें ब्राह्मणी ऊर्फ बहामनी राज्याची स्थापना केली. हसन हा मुळचा गंगू नामक एका ब्राह्मणाच्या पदरीं गुलाम होता. पुढें त्या ब्राह्मणानें त्यास मुक्त केलें. तेव्हां हसननें आपल्या मालकाच्या उदारपणाची आठवण म्हणून त्याचें नांव आपल्या नांवास जोडलें असें म्हणतात. भीमानदीजवळचें कल्बुर्गा शहर ही हसनची राजधानि होती. त्याच्या पश्चात् कल्बुर्गाच्या गादीवर एक

लहान मुलगा आल्यानें, राज्यकारभार महमद गवान नावाच्या इराणी सरदाराकडे आला. महमद गवानचा राज्यकारभार चांगल्या शिस्तीचा व शांततेचा झाला तरी देशीय त्याला शत्रू उत्पन्न होऊन इ स. १४८१ मध्यें त्याचा खून झाला यापुढें बहामनी राज्यात फूट पडून त्याचें वऱ्हाड, विजापूर, अहमदनगर, गोवळकोंडा व बेदर असे पांच तुकडे झाले.

मुसलमानाची सत्ता महाराष्ट्रात तीनशें वर्षे टिकल्यानंतर तिला हळुहळू उतरती कळा लागून, तिच्या जागीं मराठ्यांची सत्ता हळुहळू पण निश्चितपणें आपलें आसन जमवू लागली. शिवाजी महाराजांचे वडिल शहाजीराजे भासले हे प्रथम अहमदनगर व मागाहून विजापूर अशा दोन मुसलमान संस्थानांत मातब्बर सरदार म्हणून गाजले. त्यांच्याकडे पुणें व सुपें या दोन प्रांताची जहागीर होती. या जहागिरीवर देखरेख ठेवण्याची कामगिरी त्यांनीं दादाजी कोंडदेव मळठणकर या कर्तबगार ब्राह्मणाकडे सोंपविली होती. शिवाजीनें राजकारणाचे पहिले धडे दादाजी कोंडदेव यांजकडून घेतले आपल्या जहागिरीच्या आस पासच्या हळुहळू होणाऱ्या निष्प्रभ यवनी सत्तेकडे पाहून शिवाजीच्या मनात राज्यस्थापनेची कल्पना येऊन त्यानें आपल्या मावळ्यांच्या मदतीनें इ. स. १६४५ ते १६४८ या तीन वर्षांत राजगड, तोरणा, पुरंदर, लोहगड, राजमाची हे विजापुरच्या ताब्यांतील किल्ले हस्तगत केले. विजापूरकरांनीं शहाजीला कैद करून शिवाजीला भीति दाखविण्याचा व्यर्थ प्रयत्न केला शिवाजीनें दिल्लीच्या बादशहाशी सूत जमवून व विजापूरकरांना त्यांचा कोंडाणा परत देऊन शहाजीची सुटका करवून घेतली. या पुढच्या काळांत शिवाजीनें जावळी प्रांत, कोल्हापूर प्रांत, मुधोळ, सावंतवाडी इत्यादि सह्याद्रिलगतचा भाग जिंकून व विजापूरकरांनीं पाठविलेल्या अफजुल्खान, सिद्दि जोहार इत्यादि बलाढ्य सरदारांना नामोहरम करून विजापुर दरबाराकडून आपल्या राज्याला मान्यता मिळविली. ह्या वेळीं कल्याणपासून गोव्या पर्यंतची कोंकणपट्टी आणि भीमेपासून वारणेपर्यंतचा घाटमाथा असा १५० मैल लांबीचा आणि १०० मैल रुंदीचा मुलूख शिवाजीच्या ताब्यात होता. इ. स. १६६४ मध्यें शिवाजीनें सुरतेवर स्वारी करून त्या शहराची खंडणी वसूल केली,

व याच वर्षी शहाजीराजे वारल्यानें 'राजे' हे पद स्वतःकडे घेतलें, व आपल्या नावाचें नाणें पाडलें. इ. स. १६७४ मध्यें काशीचे ब्राह्मण बोलावून रायगडावर हिंदुधर्मपद्धतिप्रमाणें शिवाजीनें आपणावर राज्याभिषेक करवून घेतला व याच प्रसंगीं 'छत्रपति' असा नवा किताब धारण करून नवा शक त्यानें सुरू केला.

इ. स. १६८० मध्यें शिवाजी महाराज कालवश झाल्यावर इ. स. १८१८ पर्यंत महाराष्ट्रात मराठ्यांचीच सत्ता होती. शिवाजीच्या नंतर त्याचा वडील मुलगा संभाजी हा गादीवर आला. त्याचा औरंगजेबानें १६८९ मध्यें क्रूरपणें वध केल्यानंतर, त्याचा भाऊ राजाराम यानें अत्यंत कठिण परिस्थितींत मराठ्यांचें राज्य आपल्या मृत्यूपर्यंत (इ. स. १७००) टिकविलें. राजारामानंतर त्याचा पुत्र शिवाजी हा साताऱ्याच्या गादीवर राज्य करूं लागला. इतक्यात इ. स. १७०७ मध्ये संभाजीचा मुलगा शाहू व त्याची आई येसूबाई मोंगलाच्या कैदेतून सुटून आल्यावर मराठी राज्यात दुही उत्पन्न होऊन त्यापायीं कोल्हापूर व सातारा अशीं दोन राज्यें झालीं. त्यापैकीं कोल्हापूर येथें राजारामाचा मुलगा याचें राज्य व सातारा येथें संभाजीचा मुलगा शाहू याचें राज्य सुरू झालें. शाहूच्या पक्षाकडे प्रथमपासून बरेच मराठे सरदार होते. शाहूला बाळाजी विश्वनाथ भट नावाच्या कर्तबगार ब्राह्मण सरदाराची जोड मिळाल्यानें, छत्रपति म्हणून पुढच्या काळात त्याचेंच नाव सर्वतोमुखीं झालें. इ. स. १७१५ च्या सुमारास शाहूनें बाळाजी विश्वनाथ यास मुख्य पेशवा करून राज्यकारभार त्याच्याकडे सोपविला. ह्या पेशव्याच्या कारकीर्दींत मराठी राज्य हें नुसतें राज्य न राहता त्याचें रुपांतर साम्राज्यात झालें. बाळाजी विश्वनाथ, बाजीराव बाळाजी, नानासाहेब, थोरले माधवराव इत्यादि रणधुरंधर पेशव्यांच्या काळात मराठ्यांची सत्ता थेट अटकेपर्यंत जाऊन पोंचली. शिंदे होळकर, भोसले, गायकवाड इत्यादि छत्रपतींच्या सरदारांनी मराठ्यांचा भगवा झेंडा उत्तर हिंदुस्थानातहि फडकविण्याच्या कामीं पेशव्यांना बरीच मदत केली. पुढे पेशव्यांच्या घराण्यात गृहकलह माजल्यानें तसेच मराठे सरदारात आपापसात दुही सुरू झाल्यानें, वाढत्या इंग्रजी सत्तेचा आश्रय त्यांनीं घ्यावयास सुरवात केली आणि त्यापायीं इ. स. १८१८ मध्यें

दुसऱ्या बाजीरावानें स्वराज्याचें उदक इंग्रजांच्या हातावर सोडून तो ब्रह्मावर्तास चालता झाला.

या नंतरच्या इ. स. १९४७ पर्यंतच्या काळात महाराष्ट्रात इतर हिंदुस्थानातल्या प्रमाणेंच इंग्रजांचें राज्य सुरू होतें. पूर्वीच्या मराठी राज्याच्या सरदारांपैकीं शिंदे होळकर, गायकवाड, भोसले, घोरपडे, पटवर्धन, पंतप्रतिनिधि इत्यादिकांनीं इंग्रजांशीं तह केल्यानें त्यांची राज्यें इंग्रजांच्या सार्वभौमत्वाखालीं टिकाव धरून राहिलीं होतीं. तीं सर्व भारत स्वतंत्र होताच इ. स. १९४८ पासून हळुहळू निरनिराळ्या प्रांतात जोडलीं गेलीं.

इ. स. १८१८ पासून हिंदुस्थानात सर्वत्र इंग्रजांचें सार्वभौमत्व सुरू होताच त्याला पहिला प्रतिकार इ. स. १८५७ सालच्या स्वातंत्र्यसमरानें झाला. या स्वातंत्र्यसमराचें नेतृत्व नानासाहेब पेशवे, तात्या टोपे व राणी लक्ष्मीबाई यांच्याकडे होतें. त्यानंतर हिंदुस्थानचे पहिले क्रांतिवीर वासुदेव बळवंत फडके यांनी इंग्रजांची सत्ता खिळखिळी करण्याचा प्रयत्न इ. स. १८७९ सालीं केला. पुढें इ. स. १८८५ मध्यें राष्ट्रीयसभा ऊर्फ कॉंग्रेसची स्थापना होऊन सनदशीर मार्गांनीं स्वराज्यप्राप्तीचे प्रयत्न सुरू झाले. एकीकडे लोकमान्य टिळक, महात्मा गांधी इत्यादिकांच्या पुढारीपणाखालीं स्वराज्याचा प्रचंड चळवळ सुरू असताना, दुसरीकडे भारतीय क्रांतिकारकांनीं परकीय राज्यकर्त्यांना दहशत वाटेल अशी चळवळ चालू ठेविली. दुसरें महायुद्ध सुरू होताच नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या आझाद फौजेनें सैन्यात देशभक्तीचें वारें भरून दिलें. या सर्वांचा एकत्रित परिणाम होऊन इंग्लंडमध्यें मजूर मंत्रिमंडळ असताना ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं पूर्वीच्या हिंदुस्थानाचे हिंदुस्थान व पाकिस्तान असे दोन भाग होऊन दोघानाहि ब्रिटिश राष्ट्रकुलांतर्गत स्वातंत्र्य प्राप्त झालें. त्यानंतर हिंदुस्थानची राज्यघटना तयार होऊन तिनें ता. २६ जानेवारी १९५० रोजीं भारतात सार्वभौम लोकसत्तात्मक राज्याची स्थापना केली मुंबईच्या द्विभाषिक राज्याची पुनर्रचना होऊन, महाराष्ट्र व गुजरात अशीं दोन राज्यें एप्रिल-मे १९६० मध्यें करण्यात आलीं

## मराठी भाषेची उत्पत्ति

महाराष्ट्रांत रूढ असलेल्या मराठी भाषेच्या उत्पत्तिसंबंधीं विद्वानामध्यें बराच मतभेद आहे. कांहीं लोक संस्कृत भाषेला मराठीची जननी मानतात, तर कांहीं पालीभाषेला हा मान देतात कांहींकांच्या मतें महाराष्ट्री नावाची प्राकृत भाषा ही मराठीची जननी होय तर उलट कांहींकांना वेदाच्याहि पुर्वी लोकांत चालू असलेल्या प्राकृत भाषेपासून मराठी निघाली असे वाटतें. अशा तऱ्हेनें मराठी भाषा ही निश्चित्पणें अमुक एका भाषेपासून निघाली असें सांगता येत नाहीं. गुजराती, बंगाली, हिंदी ह्या भाषांचें मूळ निश्चित् रीतीनें सांगता येतें. परंतु मराठी भाषेची तशी स्थिति नाहीं त्याचें कारण मराठी भाषेच्या व्याकरणाच्या निरनिराळ्या बाबतींत संस्कृत, पाली, पैशाची, महाराष्ट्री, अपभ्रंश इत्यादि भाषांचे अवशेष व त्यांचीं कांहीं चिन्हें आढळून येतात हें होय. मराठी भाषेंत जे शेंकडो तत्सम संस्कृत शब्द आहेत, त्याच्यावरून संस्कृतला मराठीची जननी ठरवायला जावें तों तिण, पाऊस, छकडा, गूळ, अस्वल, रूद इत्यादि अनेक पाली शब्द जे मराठींत ठाण देऊन बसले आहेत ते आपणाला तसें करण्यापासून परावृत्त करतात. पैशाची भाषेप्रमाणे 'ण' व 'न' ह्यासंबधीचे बदल मराठींत आढळनात. ऊन, तहान, कान, रान, जानवें इत्यादि शब्द पैशाची भाषेची लक्षणें दर्शवितात. मागधी प्राकृतांत 'र'कार व 'स'कार या दोहोंबद्दल 'ल'कार व 'श'कार हे वर्ण अनुक्रमें येतात, तसेच संस्कृत 'स्थ' अगर 'र्थ' ह्या बद्दल मागधींत 'स्त' होतो. मराठींतहि हा प्रकार आढळतो उदाहरणार्थ मिसळ (मिश्र), घोळतो (घूर्णते), जोशी (जोइसी, केशर (केसर). अशाच रीतीनें अर्ध मागधीच्याहि कांहीं लकबा (दीर्घस्वर ऱ्हस्व करणें इत्यादि) मराठीनें स्वीकारल्या आहेत. पण ह्या सर्व भाषांपेक्षा महाराष्ट्री व अपभ्रंश या दोन भाषांचें ऋण मराठीवर सर्वांत अधिक आहे अकारान्त नपुंसकलिंगी नामें जशीं महाराष्ट्रींत लिंग बदलत नाहींत, तशींच मराठींतहि बदलत नाहींत. मराठींतील द्वितीयेचा 'स' प्रत्यय महाराष्ट्रींतील षष्ठी व चतुर्थीच्या 'स्स' प्रत्ययापासून आला आहे. (उदा० हत्तींस < हत्तिस्स, आगीस < अग्गिस्स < अग्ने.) नामाला लागणारे

विभक्तींचे प्रत्यय मराठीनें अपभ्रंश भाषेपासून घेतले आहेत. मराठी कवितेंत सामान्यतः आढळणारें अन्त्य यमक अपभ्रंश भाषेपासून आलें आहे. संस्कृत किंवा पालीमध्यें तें नाहीं. जुन्या मराठींत जें उकारप्राचुर्य ( उदा० जीवु, निष्कामु, दमनकु ) आहे तें अपभ्रंश भाषेच्या परिणामामुळें होय.

ह्या सर्व पुराव्यावरून असें दिसतें कीं 'मराठी' ही कोणत्या तरी एका प्राकृतापासून-महाराष्ट्री किंवा अपभ्रंश-ह्यापासून निघाली असें म्हणवत नाहीं. महाराष्ट्री व अपभ्रंश ह्या दोन्हीं भाषांचीं चिन्हें-इतर भाषांपेक्षा-बरोबरीनें व बरींच मराठींत ज्याअर्थी आढळतात, त्याअर्थीं ती ह्या दोन्ही भाषांच्या मिश्रणानें तयार झाली असें ठरतें. महाराष्ट्रीपासून मराठीनें आख्यात विभक्तींचा भाग म्हणजे काळ, अर्थ वगैरे क्रियापदास लागणारे प्रत्यय उचलले, व अपभ्रंशापासून कारकविभक्तींचा किंवा नामाच्या प्रत्ययाचा भाग उचलला. अशा रीतीनें मराठीच्या उत्पत्तींत ह्या दोन्ही भाषांचा सारखाच वाटा आहे. मराठी ही महाराष्ट्री व अपभ्रंश ह्या दोन भाषांपासून उत्पन्न झाली. सातव्या शतकांतील शिलालेखांत मराठी शब्द आढळतात. त्यावरून मराठी भाषा ही इसवी सनाच्या सातव्या शतकांत जन्म पावली असें म्हणावयास हरकत नाहीं.

# २

# मराठी साहित्याची गंगोत्री

प्रस्तुत प्रकरणात मराठी साहित्याच्या प्राथमिक अवस्थेचा थोडक्यात विचार करण्याचें ठरविलें आहे. हा विचार करीत असताना प्रथमच आपणाला मराठीची स्थूलमानानें साक्षात् जननी अशी जी महाराष्ट्री भाषा, तिच्यांतील साहित्याचा निर्देश करणें प्राप्त आहे. शकपूर्व सातव्या शतकापासून तें शकोत्तर सहाव्या शतकापर्यंत म्हणजे सुमारें हजार बाराशें वर्षेपर्यंत महाराष्ट्रांत महाराष्ट्री भाषा सरसहा वापरली जात होती. इतकेंच नाहीं तर या भाषेनें अखिल भारतीय कीर्ति त्या काळात मिळविली होती. कात्यायन व वररुचि या दोघा प्राचीन ग्रंथकारांनीं आपल्या व्याकरणविषयक ग्रंथात महाराष्ट्री ही तत्कालीन इतर प्राकृताहून श्रेष्ठ प्रकारची भाषा होय, असें स्पष्ट म्हटलें आहे. महाराष्ट्री भाषा ही केवळ मराठीचीच जननी नसून अर्वाचीन हिंदी व गुजराती या भाषांचीहि जननी[1] आहे. गाथासु महाराष्ट्री म्हणजे गाथांची भाषा महाराष्ट्री असें आलंकारिक म्हणतात. यावरून गाण्याची भाषा प्राचीन काळीं महाराष्ट्रीच होती असें म्हणावें लागतें. असें असलें तरी महाराष्ट्री ही भाषा पाली किंवा अर्धमागधीप्रमाणें कोणत्याहि पंथाच्या धर्मग्रंथाची भाषा नसल्यामुळें केवळ महाराष्ट्री भाषेंत असें वाङ्मय फारसें आढळत नाहीं. सेतुबंध, सप्तशती व कर्पूरमंजरी हेच महाराष्ट्रीमधील उपलब्ध असलेले प्रमुख ग्रंथ होत. सेतुबंध ग्रंथाचा कर्ता प्रवरसेन होता. सप्तशतींत प्राकृत सुभाषितांचा संग्रह करण्यात आला असून, त्याचें कर्तृत्व शातवाहन राजा हाल यांजकडे जातें. हा ग्रंथ शकारंभीं किंवा शकपूर्व पहिल्या शतकांत लिहिला गेला. सप्तशती ग्रंथात हल्लींच्या मराठींत सापडणारें भण्डण

(माइग), चोल्लिसम् (चोळेन), गाहल्लअ (बाहुलें), वेल्लहळ (वेल्हाळ), वइ (वई), सआडि (सागाडि, सागड) इत्यादि अनेक शब्द बहुतेक जसेच्या तसेच सापडतात. कर्पूरमंजरीचा कर्ता राजशेखर (इसवी शतक आठवें) याला त्या प्रथाच्या हस्तलिखित प्रतींत अनेक ठिकाणीं महाराष्ट्रचूडामणि असें म्हटलेलें आहे. कर्पुरमंजरींतील श्लोक महाराष्ट्रींत आहेत. ह्या ग्रंथात पच्चराउज (पगराज) दिल्ल (दिला) इत्यादि बरेच शब्द हल्लींच्या मराठींत आढळतात तसे आहेत

इसवी सनाच्या सातव्या शतकापासून महाराष्ट्रीची कन्या मराठी भाषा ही महाराष्ट्रात बोलली जाऊ लागली. जरी ही बोलभाषा होती तरी तिच्यात जोरदार अशी ग्रंथरचना बाराव्या शतकापर्यंत झालेली दिसत नाहीं. याचे एक कारण संस्कृत भाषेचा पगडा. त्या काळात शिक्षण घेणारे फार थोडे लोक होते, व जे होते त्यांचा ओढा संस्कृताकडे होता. भवभूतिसारखा नाटककार, राजशेखरा 'सारखा कवि व भास्कराचार्यांसारखा ज्योतिषी व गणिती हे सर्व महाराष्ट्रीय होते. परंतु यांनीं ग्रंथरचना संस्कृतमध्यें केल्यानें साहजिकच या पाचशे वर्षांत शिलालेखांतील–सामान्य जनसमूहाला कळण्याकरिता म्हणून योजलेल्या काहीं वाक्यांखेरीज मराठी साहित्याचा संसार अन्यत्र आढळत नाहीं. अगदीं प्राचीन शिलालेख म्हैसूर संस्थानातील श्रवणबेळगोळा येथील असून, त्याचा लेखनकाल इ. स. ९८३ आहे ह्याला गोमतेश्वराचा शिलालेख म्हणतात. शिलेवर लिहिलेलं पहिलें मराठींतील वाक्य या लेखात जें आढळतें तें असें– "श्री चावुण्ड राजें करवियलें ॥ गंगराजे सुत्ताले करवियले."

(?) या शिलालेखानंतर सुमारें दीडशें वर्षांनीं चालुक्य वंशातील सोमेश्वर राजानें रचिलेला 'अभिलषितार्थ चिंतामणि' (शके १०५१) नावाचा ग्रंथ आहे या ग्रंथात मराठी रूपें व मराठी शब्द अनेक ठिकाणीं आले आहेत. शिवाय ग्रंथाच्या एका भागांत काहीं पद्यें आलीं आहेत त्यांपैकीं एक पद्य त्याच्या अर्थामुद्धा पुढें दिलें आहे – जेणें रसातळ उणु मत्स्यरूपें वेद आणियले

मनुशिवकं वाणियेले तो संसारसागरतारण मोह (ह) ता रावो नारायणु ॥४३॥ (अर्थ :–ज्याने रसातलाहून मत्स्यरूप धारण करून वेद आणिले, मनु आणि गिरा वर्णिले तो ससारसागरातून तारून नेणारा व मोह नाहींसा करणारा राजा नारायण आहे.) सोमेश्वराने महाराष्ट्रातील गायका काढताना ओव्या म्हणतात असें लिहिलें आहे, त्यावरून ओवी छंद याहि वेळीं चांगला प्रचलित होता असें दिसतें.

(३) या नंतरचा शिलालेख आंबे गावातील जोगाईच्या सभामंडप या नावानें ओळखल्या जाणाऱ्या एका लेण्यात डॉ. श. गो. तुळपुळे याना अलीकडेच प्राप्त झाला[१] प्रस्तुत लेखातील लिपी दक्षिणी वळणाची बाराव्या शतकातील नागरी आहे लेखात पृष्ठमात्रेचा उपयोग बहुतेक ठिकाणीं केल्याचें दिसतें. तीन चार ठिकाणीं शिरोमात्रा देखील आहेत. शिलालेख "सवतु (शक) १०६६ रक्ताक्षी संवत्सरांतर्गत अश्विन शुद्ध १ गुरुदिने"चा असून कालगणनेप्रमाणें तो बरोबर आहे. हा काल इंग्रजी पद्धतीप्रमाणें ३१ ऑगस्ट ११४४ इ. स. असा येतो प्रस्तुत शिलालेखात आठशे वर्षांमागील मराठी भाषेत सुमारे सहा ओळींचा व पाच पचवीस शब्दाचा मजकूर अभग व अखंड मिळतो हें त्याचें एक वैशिष्ट्य होय शके १०६६ अश्विन शुद्ध प्रतिपदेस गुरुवारीं आंबदेशाचा अधिष्ठाता महामडलेश्वर उदयादित्यदेव यानें नाथाच्या म्हणजे शिवाच्या देवळाच्या योग-क्षेमासाठीं जें वृत्तिपत्र केलें, त्याचें शासन हा प्रस्तुत शिलालेखाचा विषय आहे. या उदयादित्यदेवानें भूतनाथाच्या योगक्षेमासाठीं म्हणून परमभक्तीनें सेलू नावाच्या गावातून वीस गद्याण, काम नावाच्या जमिनीपैकीं बारा गद्याण, राडी नावाच्या गावातील भातशेतापैकीं काठीच्या मापानें मोजलेली तीन निवर्तनें व सिंघणदेवाच्या जवळगावातील जमीन इतकें दान दिलें आहे. तसेंच पूजाऱ्यासहि त्यानें बारा गद्याण, कुंभेफळ गावातील पाच गद्याणाची जमीन, तळ गावातून चागल्यापैकीं पसतीस बैल, गावातील प्रत्येक घाण्यामागें तेलाचें एक पात्र, दर हाटामागें एक करडा, फुलाची एक माळ व एक मळा याप्रमाणें वृत्ति करून दिली

१ साहित्यपत्रिका, वर्ष २४ अं ९९ (एप्रिल–सप्टेंबर १९५१)

आहे. हें शासन जो कोणी लुप्त करील त्यावर योगिनीचा वज्रदंड पडेल ही शपथ व एतत्सम शासनलेखाच्या शेवटीं नेहमीं येणारे दोन श्लोक खोदून हे शिला लिखित पूर्ण केलें आहे. शिलालेखातील महत्त्वाचा भाग पुढील प्रमाणें आहे :—

> ॐ ॥ स्वस्ति सक्तु १०६६ रक्ताक्षी संवत्सरान्तर्गत अश्विन
> शुद्ध १ गुरुदिने अद्येह श्रीभूचरनाथपदकमलभ्रम
> र श्रीरवदेवः गुरुश्चरणाराधनतत्परः अजासमाधिष्ठि
> त महामंडलेश्वर उदउदयादितदेवेनपरममतत्या ना
> था कामतु सेलुग्रामीं ग २० तथा धामाळ्ये भूमि ग १२
> राहिए सालिवग दाडेभाचीं निवर्त्तनें सिंघणदेवा
> जयल्ग्रामीं भुमि दत्त नाथपुजितेभा पुजारेआ ग १२
> कुंभसलीं भूमि ग ५ तलि मान्य बैल ३५ घाणआप्रति
> तेला डो १ हाट्प्रति करडा १ फूलमरी १ मथा १ जो फेडी
> लोपी तेआ योगिनीचा वज्रदंडु पडे ॥

(४) यानंतरचा शिलालेख शके १०७५-७९ मधील दौलताबादजवळील पळसदेव येथील देवळावर आहे. त्याच्या प्रारंभीचें वाक्य असें आहे :— श्री मगदेव दडनाके विष्णुगृह केलें ....ईश्वर सवऊरी नीपनलें प्रासादी .. तेहाचे पुत्र माइया... ।

(५) या पुढील शिलालेख शके ११०२ मधील असून तो मुंबई येथील परळ विभागात सापडलेला आहे त्यात कोंकणच्या अपरादित्य नावाच्या एका राजानें तीर्थीं स्नान करून श्री वैद्यनाथ देवास पंचोपचार पूजेसाठीं षट्पष्टि म्हणजे हल्लींची साष्टी यातील माहुली जवळील एका जमिनीचें उत्पन्नापैकीं २४ द्राम उत्पन्न दिल्याचें वर्णन आहे. शिलालेखातील देवगीच्या २१ ॥ ओळी संस्कृतात असून बहुजनसमाजास कळावें म्हणून शपथेच्या दोन ओळीं मराठींत आहेत त्या अशा :— अथ तु जो कोणु ति ए शासन लोपी तेया श्रीवैद्यनाथ देवाची माल सकुटुंबी आवडे ॥ तेहाची माय गाढवे × दिजे ।

(६) यानंतरचा खानदेशांतील पाटण येथील देवीच्या देवळाबाहेरील भिंतींत असलेला शिलालेख. हा लेख ज्ञानेश्वरीच्यापूर्वी सुमारें ८४ वर्षे म्हणजे शके ११२८ चा आहे. लीलावती नावाच्या ग्रंथाचा कर्ता जो सुप्रसिद्ध भास्कराचार्य त्याच्या नातवाच्या म्हणजे चांगदेवाच्या नावानें हा लेख खोदविला आहे. लेखाच्या २८ ओळी असून त्यांपैकीं २१ संस्कृतांत व उरलेल्या ओळी सामान्य लोकांना कळाव्यात म्हणून मराठींत आहेत त्या अशा :— इया पाटणीं जें जेणें उघटे तेहाचा असि आउं जो राउला होता ग्राहकापासीं तो मठा दीन्हला । ब्राह्मणा जें विकतेयासीं ब्रह्मोत्तर तें ब्राह्मणीं दीन्हलें ॥ ग्राहकापासीं दामाचा वीसोवा आसूपाठी नगरें दीन्हला । तुलाइया बैला सिद्धवे ॥ बाहीरिला आसूपाठी गिधवें ग्राहकापासीं। पाच पोफली ग्राहकापासीं ॥ पहिले आघाणे आडाणाची लोटि मठा दीन्हली ॥ जेती घाणे वाहति तेतीया प्रति पली पली तेल ॥ एथ जे मविजे ते मठीचेन मापें मवावें मापाउ मठा अर्द्ध ॥ अर्द्ध मापहारी । रूपाचे सूक । तथा भूमिः ॥ चतुराघाट निशुद्ध ७० डुमामु परड आलेआ कामतामध्यें चहवटा ॥ एकल वटा ॥ पडिताचा कामतु ॥ श्रीतेग्रामी चाउरा ॥ घामोजाचीअ खोडिआ ॥

(७) हा शिलालेखानंतरचा शिलालेख शके ११५० मधील आंबेजोगाई येथील होय. त्याला खोलेश्वराचा शिलालेख म्हणतात. यातील ४–५ ओळी मराठी आहेत

(८) यानंतरचा शके ११६१ मधील नेवासे येथील शिलालेख होय त्याची भाषा संस्कृत मराठी मिश्र आहे. "हे भूमि देवें पुरुषेंग जीवना दिधली" हें वाक्य लेखाच्या शेवटीं आहे

(९) यानंतरचा शके ११९५ मधील पंढरपूरच्या देवळांतील चौऱ्याशी शिळेवरील लेख होय. या शिळेवर देणग्या देणाऱ्यांचीं नावें आहेत. या लेखांत प्रशस्ति श्लोकानंतर असें वाक्य आहे : स्वस्ती श्री सकु ११९५ श्रीमुख संवत्सरे फागनिपूर श्रीविठ्ठलदेवरायासि तिसासिति फुलें दाडे आचंद्रार्क चालावेआ नानाभक्त मालीआं दत्त पैसाचा विवरू ॥ यांत अनेकांचीं नावें आहेत. यादवांचा

कारभारी हेमाडपंत याने शकु ११९८ धाता संवत्सरे माघ वदि तृतीयेस वर्गणी दिल्याचा उल्लेख यात आहे. पुढे श्रीरामदेवरायाच्या देणगीचा उल्लेख आदरपूर्वक केला आहे. तो असा :— श्री शकु ११९९ ईश्वर संवत्सरे मार्गशिर शुद्ध १५ शुक्रे । श्री विठ्ठल देवरायासि पादरी फड मुख्य समस्तान्हाग आचंद्रार्क श्री राय नारायण प्रौढ प्रताप चक्रवर्ति श्री रामचंद्रदेव राय ठ ॥ याप्रमाणे शके १२०० पर्यंत हा लेख कोरण्याचे काम चालू होते असे मानले तर या सुप्रसिद्ध व सुमंगल लेखानंतर थोडयाच वर्षांनी पांडुरंगभक्त ज्ञानेश्वरांनी आपल्या ज्ञानेश्वरीची शके १२१२ मध्ये पूर्तता केली असे म्हणण्यास हरकत नाही. महाराष्ट्र सारस्वतकार वि. ल. भावे म्हणतात त्याप्रमाणे "शिलालेखांच्या लहानसहान रचनेतून आपण मराठी भाषेतील अत्युत्कृष्ट ग्रंथरचनेच्या काळात येऊन पोचतो" विवेकसिंधुकर्ते मुकुंदराज, काही महानुभावीय कवी व ज्ञानेश्वरादिकांची रचना याच सुमारास झाली.[1]

---

१ मराठीच्या उत्पत्तिकालासंबंधी निर्णय करतांना पुढील पुरावा उपयोगी ठरावा. (१) कै. वि. का. राजवाडे मराठी भाषा शके ४०० च्या सुमारास सुरू झाली असे मंगळवेढे व चिकुर्डे येथील ताम्रपटावरून म्हणतात. त्यावर असा आक्षेप घेण्यात येतो की, हा शक शालिवाहन नसून शिलाहार होय. म्हणजे ताम्रपटाचा शक जरी ४१० असला तरी तो वस्तुतः ११२६ हा होय. (२) अलिबागेजवळच्या अक्षी येथील शिलालेख शके ९३४ चा असून त्यांत संस्कृत मराठी अशी वाक्ये आहेत. हा मराठीतील पहिला कालोल्लिखित शिलालेख होय. त्यातील एक वाक्य असे आहे

महजुंवाने ( देवीच्या ) बोडणासाठी नऊ कवली ( धान्य ) नेमून दिले

( डॉ. श. गो. तुळपुळे, मराठी संशोधन पत्रिका, वर्ष ५, अंक १ ला ) (३) नारदस्मृतीत ( ५ वे शतक ) प्राकृत भाषेची अमदानी संपल्यावर देशभाषा ( मराठी-गुजराती-हिन्दी ) सुरू झाल्या असे म्हटले आहे "संस्कृतैः प्राकृतैर्वाक्यैः यः शिष्यमनुरूपतः । देशभाषाद्युपायैश्च बोधयेत् स गुरुः स्मृतः ॥" (४) कै. चिं. वि. वैद्य यांच्या मते सातव्या शतकात धर्मक्रांति-विचारक्रांति झाली. त्यामुळे देशी भाषा उत्पन्न झाल्या. (५) कै. पां. दा. गुणे यांच्या मते भिन्न संस्कृतीचे, भिन्न भाषांचे लोक ( अरब वगैरे ) आठव्या नवव्या शतकात भारतात आले त्यावेळेस वर्तमान

यापैकीं मुकुंदराजादिकांचा उल्लेख येथेंच करून महानुभाव व ज्ञानेश्वर यांचा पुढील प्रकरणांत करणें इष्ट होईल. प्राचीन काळापासून मुकुंदराज हे मराठीचे आदिकवि म्हणून ओळखले गेले आहेत. जोंपर्यंत ऐतिहासिक पुराव्यानें दुसरा कवि त्याचें हें स्थान हिरावून घ्यायला पुढें येत नाहीं, तोंपर्यंत त्याच्याकडे आद्यकवित्व चालूं ठेवायला हरकत नाहीं. मुकुंदराजाची गुरुपरंपरा पुढील प्रमाणें आहे. :—हरिनाथ–रघुनाथ–मुकुंदराज. हरिनाथाची समाधि मध्यप्रांतात अंमोर येथें असून रघुनाथाची छिंदवाडा येथें आहे. मुकुंदराजाची समाधि बैतुल जवळील खेडलें या गावीं आहे. अशा रीतीनें मराठीचा आद्यकवि हा मराठीच्या माहेरघरचाच ठरतो हें योग्यच आहे. मुकुंदराजाचा सुप्रसिद्ध ग्रंथ विवेकसिंधु हा होय हा ग्रंथ त्यानें "शके अकरादाहोत्तर। साधारण संवत्सर। राजा शारंगधर। राज्य करी" अशा वेळीं रचिला. साधारण संवत्सर शके १११२ ला

---

( पान २२ वरून पुढें चालू )

कालिन थोड भापा नगार झाल्या (६) शक संवत ९८२ (इ स १०६०) मध्यें दिवे ( कोंकण ) या गावातील ताम्रपट उपलब्ध झाला असून, त्यात वासुदेव भट्टानें मावल-भट्टाजवळ हा ताम्रपट दिल्याचा उल्लेख आहे त्यांत सध्या प्रचलित असलेली घेनाम, देवल अशीं नावें आहेत (७) यशश्चंद्रकृत राजमति प्रबोध (१२ वें शतक) ग्रंथात एक महाराष्ट्रीय एका स्त्रीचें पुढील प्रमाणें वर्णन करीत आहे—'देव, चतुरांगुळाची जीहा, मा काई साधओ. गोमटी मुद, फापट निलाट, चापडु आखड्याची, ताहीची वीणे वाली, न छोटी न मोठी" (८) उद्योतनसूरी कृत कुवलयमाला या ग्रंथात मरहट्टाचें वर्णन आहे. तो बलहमील, बळकाय, ठेंगणा, सावळा असा आहे त्यावेळच्या मराठींत दिण्णलें, गहिलें, ही रूपें आलीं आहेत (९) शके ६०२ तें १०४९ पर्यंतचे १६ ताम्रपट उपलब्ध आहेत त्यातील शके ६०२ मधील ताम्रपटांत पव्राम, प्रिथिवी, इत्यादि मराठी शब्द आहेत. (१०) रामदेवराव यादवाच्या काळातील पुणें जवळील पूरगावातील शके १२०७ सालचा ११ ओळींच्या शिलालेखातील काहीं भाग–प्रभुणे नायक। रामचंद्र देवो नाडिलो सोडि. (११) शके १२११ (इ. स. १२८९) मधील ऊनकेश्वराचा शिलालेख यांत मराठी आठ ओळी आहेत. काहीं पुढील प्रमाणें "सरमगाचा आसमा आले। सरभग प्रीत्यर्थ हें उदक उत्पन्न केलें। तो राम प्रासादु संपुर्णु जाला। तेयाचा नमस्कार हरिहरा'

येतो. म्हणजे विवेकसिंधु हा ग्रंथ ज्ञानेश्वरीपूर्वी शभर वर्षे रचिला गेला असें दिसतें. मुकुंदराजाकडे आद्यकवित्व देणारी एक आख्यायिका आहे ती अशी. ज्ञानेश्वरी ग्रंथाची रचना झाल्यावर निवृत्तिनाथ ज्ञानेश्वरास म्हणाले कीं, "तू भाष्यानुसार गीतेवर टीका लिहिलीस, पण धन्य मुकुंदराज कीं ज्यानीं विवेकसिंधु सारखा ग्रंथ स्वमतीनें लिहिला." विवेकसिंधूंत याबाबत शब्द मुळींच नाहींत. त्यावरूनहि मुकुंदराज यानी उत्तेपूर्वी होऊन गेला हें नक्की ठरतें. विवेकसिंधूच्या आजच्या स्वरूपाकडे सामान्यतः वरवर पाहिलें तर तो ग्रंथ ज्ञानेश्वरीपूर्वीचा वाटत नाहीं. परंतु हें त्याचें स्वरूप नकलकाराच्या आधुनिकीकरणाच्या वृत्तिमुळे त्याला आलें असावें असें असलें तरी त्यात मातु, हुडे, आरोगु, वोनी, पोळी, निदार, कड्सणी, ऐणी, रोळू, दळवाडं, रेटमरुहाणी, वाशिपे, उपल्वग इत्यादि जे शब्द आले आहेत, त्याच्यावरून त्याचे प्राचीनत्व निर्विवाद आहे. विवेक सिंधूच्या यवतमाळ येथील शारदाश्रमाच्या जुन्या पोथींत नामाचीं ओकारान्त रूपें राजवाडे ज्ञानेश्वरीप्रमाणेंच पुढीलप्रमाणें आहेत :—थैमा शीक्षाचा सदेहो। आइकोनि उठिला स्नेहो. विवेकसिंधूतील विषयप्रतिपादन अध्यात्मपर असूनहि फार सुबोध झालें आहे. त्यात मूळ शंकराचार्यांच्या मायावादावर विवेचन करण्यात आलें असल्याचें श्री मुकुंदमुनीच सांगतात :—"शंकरोक्तिवरी। मी बोलिलीं मराठी वैखरी।" पण हे मराठी विवेचन कोठेंहि दुर्बोध झालेलें नाहीं. उलट गुरुशिष्याचे जे मधून मधून काल्पनिक संवाद दिले आहेत त्यानें ग्रंथाच्या गोडींत भरच पडली आहे. ग्रंथाचा विषय जागोजागीं घरगुती दृष्टांत देऊन सोपा केला आहे उदा० :—सोंग संपादिता तोपलेपणें। नरासी दीजे अलंकार भूषणें। सोंग मिथ्या परि पावणें। नरासीची॥ तैसे वीर मायिक अवतरण॥ तेथें कीजे जें भजन। तें होय समर्पण। जगदीश्वरीं॥ मुकुंदराजानीं विवेकसिंधूत राजयोगाची तरफदारी केली आहे. ते म्हणतात, "न लगे वेदशास्त्राचा याग। अभ्यासावा न लगे अष्टांग। जरी पाविजे राजयोग। श्रीगुरुप्रसादें॥" प्रपचात राहूनहि अध्यात्मयोगाचा अनुभव घेणें याच नाव राजयोग होय असें ग्रंथकारानें सांगितलें आहे सामान्य लोकांकरिता सगुणोपासनेचें महत्त्वहि मुकुंदराजानीं सांगितलें आहे.

"चित्त अवलंबनेविण । जरा न राहे स्थिरपण ॥ तरी देवाचें सगुण । स्वरूप चिंतावें ।" विवेकसिंधूची संस्कृत आवृत्तिहि आढळते. हें संस्कृत भाषांतर गोपाळ मुद्गल यानें केलें. मुकुंदराजानीं परमामृत, पवनविजय, पंचीकरण, मूलस्तंभ इत्यादि दुसरेहि अध्यात्मपर ग्रंथ रचीले आहेत. त्यापैकीं परमामृत हा ग्रंथ सुमारे तीनशें ओव्यांचा असून विशेष लोकप्रिय आहे.

याच काळातील दुसरा ग्रंथ म्हणजे श्रीपतिकृत (शके ९६१) रत्नमाला हा होय. श्रीपतीनें रत्नमाला व जातकपद्धति असे दोन ज्योतिषविषयक ग्रंथ प्रथम संस्कृतांत लिहून, नंतर त्यांपैकीं पहिल्याचें मराठींत भाषांतर केलें. खाण्यात बाजरी, राहण्यात बिनचुन्याच्या इमारती व लिहिण्यात मोडी लिपी यांचा महाराष्ट्रात प्रथम प्रचार करणाऱ्या हेमाद्रि उर्फ हेमाडपंताच्या नांवावर काहीं ग्रंथ प्रसिद्ध आहेत. महादेवराव व रामदेवराव जाधवांच्या दरबारात 'श्रीकरणाधिप' या हुद्यानें तो राज्यकारभाराचें काम पाहात असे. धर्म, अर्थ, काम, मोक्ष अशा चार पुरुषार्थांचें तसेच शेंकडो व्रतवैकल्यांचे विवेचन करणारा 'चतुर्वर्गचिंतामणि' नांवाचा ग्रंथ यानें संस्कृतांत लिहिला असून याशिवाय हेमाद्रिकृत कालनिर्णय, कैवल्यदीपिका (श्रीबोपदेवाच्या मुक्ताफल ग्रंथावरील टीका) आयुर्वेदरसायन (अष्टांगहृदयावरील टीका) दानवाक्यावलि, लक्षणसमुच्चय, नीतिबोध, लेखनकल्पतरु वगैरे इत्यादि प्रकरणेंहि याच्या नांवावर प्रसिद्ध आहेत. नाथपंथातील गोरक्षनाथाचीं 'गोरक्षअमरसंवाद', 'गोरक्षगीता' व काहीं पदें प्रकाशित झालीं आहेत. अद्वैतवेदांत व योगाभ्यासाची माहिती या प्रकरणात आली असून यातील कित्येक ओव्या आणि ज्ञानेश्वरीतील ओव्या यांच्यात विलक्षण साम्य आहे. ज्ञानेश्वर हे नाथपंथी असल्यानें असे होणें साहजिक आहे.

# ३

## महानुभाव साहित्य व तत्त्वज्ञान

मराठी साहित्याची गंगा सुरुवातीलाच पवित्र, भव्य आणि सुंदर बनविण्याचें श्रेय जर कोणाला द्यावयाचें असेल तर तें महानुभाव पंथालाच दिलें पाहिजे. या पंथाच्या अनुयायांनीं मराठी भाषेचा पाया अगदीं भक्कम रचून, वर उभारल्या जाणाऱ्या उत्तुंग इमारतीची चांगली कल्पना आणून दिली. 'महान् अनुभावस्तेजो बलं वा यस्य स महानुभावः' ह्या व्युत्पत्तिप्रमाणें मोठ्या तेजानें युक्त असलेल्या लोकांचा जो मार्ग त्याला महानुभाव पंथ असें म्हणतात.[1] या पंथाची स्थापना श्रीचक्रधर यांनीं बाराव्या शतकांत केली. चक्रधर यांचें मूळचें नांव हरपाळ. भडोच येथें सुमारें आठशें वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या विशालदेव नांवाच्या (मल्लदेव नांवाच्या भडोचच्या राजाला पुत्र नसल्यानें त्यानें मृत्युसमयीं त्याचा दिवाण विशालदेव यास राज्य दिलें) राजाचे ते पुत्र होते. त्यांचा जन्म शके १११६ मध्यें झाला. यादवराज सिंघणानें शके ११३८ मध्यें भडोचवर केलेल्या स्वारीच्या प्रसंगीं तसेंच त्यानें अनहिलवाडवर शके ११४१ मध्यें केलेल्या स्वारीच्या प्रसंगीं राजपुत्र हरपाळ त्याच्याशीं लढला होता. पुढें शके ११४३ वृषभ संवत्सर भाद्रपद शुद्ध द्वितीया या दिवशीं हरपालदेवाचें निधन झालें. त्याचें प्रेत स्मशानांत नेलें असतां श्रीचांगदेव ऊर्फ श्रीचक्रपाणी (महानुभाव पंथाचे पूज्य तिसरे अवतार) यांनीं द्वारकेंत कामाख्या नामक हठयोगिनीच्या दुराग्रहामुळें देहत्याग करून हरपालदेवाच्या मृतकायेंत प्रवेश केला. राजपुत्र हरपाळ यास द्यूतक्रीडेचा नाद लागून त्यापायीं त्याचें स्वतःजवळचें सर्व द्रव्य, त्याची पत्नी कमळादेवी हिच्याजवळचें सर्व द्रव्य नाहींसें होऊन, शिवाय

१ महानुभाव पंथ ले. बाळकृष्ण महानुभाव शास्त्री, १९४७, पृ. २९९.

पतिपत्नींत वेमनाय (द्युतात लावण्या करिता हरपालदेवानें दागिने मागीतले असता कमलदेवीनें नकार दिल्यानें) निर्माण झाला. यानें उपरति येऊन हरपाळ यात्रेनिमित्तानें रामटेकला गेला. तेथें वाटेंत ऋद्धिपूर येथ श्रीगोविंदप्रभु नावाच्या सत्पुरुषाची व त्याची गाठ पडली. गोविंदप्रभूनें त्यास मन्त्रोपदेश देऊन त्याचे नाव चक्रधर ("अरे जा, तू चक्र आहेस, तू चक्रधर आहेस" असे गुंडम प्रभु म्हणाले.) असे ठेविलें. यापुढें औरंगल शहरीं कमळ नाईक नावाच्या सामवेदी ब्राह्मणाच्या हंसाबा नामक रूपवती विदुषी कन्येशीं त्यानें लग्न केलें. पण वैराग्याच्या भरात त्यानें हें गाव व पत्नी यांचा त्याग करून देशपर्यटन सुरू केलें. ह्या पर्यटनात अचळपूर (एलिचपूर) येथील रामदेवराव दरणा या सरदाराच्या उमादेवी नावाच्या मुलीशीं लग्न लाविलें. लग्न लावूनहि हरपाळाचें मन वैराग्यातच रमत असे. तशात उमादेवीचा मृत्यु (चक्रधर चंद्रभागा नदींत बुडून मेल्याची वार्ता ऐकून दुःखानें मेली) झाल्यावर हरपाळानें गृहत्याग करून विदेही अवस्थेत भटकायला सुरुवात केली. अशा स्थितींत एकेवेळीं प्रत्यस्थानीं भोगावतीचे काठीं त्यास श्रीदत्तात्रेयाचें दर्शन घडलें. आणि त्यानें शके ११८५ कार्तिक महिन्यात गुरु सिंह राशीस असता सन्यासदीक्षा धारण केली. यानंतर तो शिष्य संप्रदाय वाढवून उपदेश करीत हिंडू लागला. श्रीचक्रधर हे गुजरातेंतील व गुजराती सामवेदी ब्राह्मण असूनहि त्यानीं आपल्या पंथाचा प्रसार केला तो महाराष्ट्रात. याचें कारण इतर देशापेक्षा ईश्वरोपासना करण्याच्या दृष्टीनें महाराष्ट्र अधिक सात्त्विक आहे अशी त्याची समजूत होती. (कानडदेसा तेलंगदेसा न वचावें: ते वीराए बहुल देसः तेथ अवधुत मान्यः महाराष्ट्रीं असावें: ॥२४॥ आचार प्रकरण, सूत्रपाठ.) चक्रधराचे सुमारे पाचशे शिष्य होते. या शिष्यापैकीं नागदेवाचार्य, महिंद्रभट्ट, जनार्दन, दामोदर, भांडारेकर इत्यादि प्रमुख होते. त्यात पंथप्रचाराचें कार्य मुख्यत: नागदेवाचार्य यानेंच केलें. आपलें कार्य उरकून समाधि घेण्याच्या उद्देशानें श्रीचक्रधर बदरीकाश्रमाच्या बाजूला गेले त्यावेळीं हाच त्याच्या बरोबर होता. शेवटीं यालाहि माग ठेवून श्रीचक्रधर एकटेच पुढें गेले. त्याचें पुढें काय झालें याची कोणालाच माहिती नाहीं. परंतु याचा प्रयाणकाल

शके ११९४ हा महानुभाव पंथात मानला जातो. नागदेवाचार्य यांनीं शके १२२४ मध्ये समाधि घेतली. नागदेवाच्या शिष्यांच्या प्रमुख तेरा शाखा किंवा आम्नाय झाले. हे आम्नाय आजहि चालू आहेत. यांत कवीश्वर, उपाध्याय, तळेगावकर आणि पारिमांडल्य यांचा विशेष प्रचार आहे. श्रीचक्रधरांनीं सांगितलेल्या सिद्धांतांना या आम्नायांनीं आपापल्या मगदुराप्रमाणें अर्थ लाविला आहे. तथापि उपाध्याय आम्नायांतील लेखकांनीं लिहून ठेविलेलें तत्त्वज्ञान म्हणूनच महानुभावाचें खरेखुरें तत्त्वज्ञान सामान्यपणें मानलें जातें.

श्रीचक्रधरांच्या काळीं महाराष्ट्रांत देवगिरीच्या यादव राजांची कारकीर्द सुरू होती. हा काळ अत्यंत भरभराटीचा व ऐश्वर्याचा होता. अर्थात् चैनबाजीकडे आणि विलासरागाकडे लोकांचें विशेष लक्ष असणें स्वाभाविक आहे. यज्ञयाग आणि अनेक देवतांच्या उपासनेला या काळांत अगदीं ऊत आला होता. सुप्रसिद्ध पंडित हेमाद्रि यांच्या चतुर्वर्गचिंतामणि या ग्रंथावरून त्याकाळीं शेकडों प्रकारच्या व्रतवैकल्यांत लोकांच्या शक्तीचा अपव्यय कसा होत होता हें समजतें. शंकराचार्यांचें अद्वैत तत्त्वज्ञान उत्तम असलें आणि त्याचा प्रसार होऊन तीन चारशें वर्षे झालीं असलीं तरी सामान्य लोकांना तें फारसें पटलेलें दिसत नव्हतें. याच उद्देशानें मध्वाचार्यांनीं भक्तिप्रधान अशा द्वैतमार्गाचा प्रसार केला. ईश्वर आणि जीव हे भिन्न असून, मोक्षावस्थेत देखील भिन्नच राहतात असें मध्वाचार्यांचें सांगणें होतें. मध्वाचार्य हे चक्रधराचे समकालीन होते. शंकराचार्यांची ज्ञाननिष्ठा व रामानुजाचार्य मध्वाचार्य यांची भक्तिनिष्ठा यांचा समन्वय करून चक्रधरांनीं आपल्या द्वैती तत्त्वज्ञानाचा प्रसार महाराष्ट्रांत केला. क्षुद्र देवतांच्या भक्तीचें बंड त्याकाळीं महाराष्ट्रांत खूप माजलें होतें. तें मोडून सर्वसाधारण जनतेला खऱ्या परमेश्वरी मार्गाकडे लावण्याच्या उद्देशानें चक्रधरांनीं देवतांची अवहेलना न करतां त्यांना कमी महत्त्वाच्या ठरविल्या. देवतांची उपासना करणारे देवतांना पावतात आणि ईश्वराची उपासना करणारे ईश्वराला पावतात, असें सामान्य माणसाला समजणारें तत्त्वज्ञान त्यांनीं सांगितलें. क्षुद्र देवतांचें जड प्रस्थ त्यांनीं कमी केलें, त्याचप्रमाणें जातींची शिवाशिवहि त्यांनीं नाहींशी केली. आपल्या पंथांत त्यांनीं

स्त्री, शूद्र, ब्राम्हण, क्षत्रिय अशा सर्वांनाच सन्यास घेण्याची सोय ठेवून, शिवाय सन्याशानें कोणाकडेहि भिक्षा घ्यावी असें सांगितलें मात्र एका गोष्टीवर त्यांनी फारच भर दिला ती म्हणजे संपूर्ण अहिंसा व कडकडीत वैराग्य हीं ज्यांना मान्य असतील, ते कोणत्याहि जातीचे असले, तरी त्यांना मग महानुभाव पंथात मुक्तद्वार असे. धर्म सोपा पण कल्याणकारक करण्याच्या दृष्टीनें श्रीचक्रधरांनीं द्वैतमताचा प्रसार करून देवतापूजनाचा निषेध केला असला, तरी आजमितीला बहुजन हिंदु समाज मनानें अद्वैती म्हणजे सर्वत्र एक ईश्वरच आहे असें मानणारा परन्तु पूजनाच्या बाबतींत अनेकांत एकत्व पाहून आपापल्या इच्छेप्रमाणें त्या त्या देवतेची पूजा करणारा असा आढळतो आणि याच कारणानें श्री चक्रधर यांचा धर्म आणि तत्त्वज्ञान हीं सोपीं व श्रेष्ठ असूनहि, आणि आज आठशें वर्षें तीं तावून सुलाखून निघालीं असूनहि, त्यांचे अनुयायी काहीं फारसे आढळत नाहींत

श्री चक्रधरांनीं स्थापन केलेल्या महानुभाव पंथात अनुयायी फारसे नसले तरी त्याचा प्रसार व विस्तार दूरदूर पर्यंत झाला अगदीं सुरुवातीलाच त्याला राजाश्रय मिळाला देवगिरीच्या यादव राजांनीं आपला संबंध यदुवंशीय श्रीकृष्णाशीं जोडला असल्यानें, श्रीकृष्ण उपास्यदैवत असलेल्या महानुभाव पंथाकडे त्यांचे साहजिकच लक्ष वेधलें गेलें रामदेवराव यादवाच्या दरबारात महानुभाव पंथाच्या ग्रंथकारांचे श्रीकृष्णाच्या लीला वर्णन करणारे अनेक ग्रंथ वाचले जाऊं लागले. पंधराव्या शतकात या पंथाचा प्रवेश पंजाब सारख्या यज्ञप्रधान व भक्ष्याभक्ष्याकडे फारसें लक्ष न देणाऱ्या प्रांतात झाला. सारंगकोट येथील कृष्णराज नावाच्या क्षत्रिय गृहस्थाचा दक्षिणेंत मालाची नेआण करण्याचा व्यापार होता व्यापारानिमित्त वऱ्हाडात फिरत असतांना त्याची कवीश्वर आम्नायातील मावेरायनुरायाची गांठ पडली त्याचा उपदेश ऐकून कृष्णराजाला उपरति झाली व त्यांनीं तात्काळ महानुभाव धर्माची दीक्षा घेतली सारंगकोट येथ परत गेल्यावर त्यांच्यात पडलेल्या बदलानें आकर्षित होऊन त्याच्या ज्ञातिपथीं धार्मिक भावानें त्यांच्याकडून या अहिंसा व वैराग्यप्रधान धर्माची दीक्षा घेतली.

अशा तऱ्हेने या पंथाचा प्रसार प्रथम पंजाबात लाहोर, अमृतसर वगैरे ठिकाणीं होऊन, पुढे तो काश्मीर, पेशावर, काबूल, कंदाहार पर्यंत झाला या पंथाला तिकडे त्यांच्या कृष्णोपासनेमुळें जयकृष्णी पंथ म्हणतात. या पंथाचीं त्या भागात कृष्णमंदिरें असून, त्यात महानुभावीय मराठी ग्रंथ मोठ्या पूज्यभावनेनें पठन केले जातात स्तोत्रें, आरत्या, सूत्रपाठ वगैरे मराठींतूनच म्हणण्याची तिकडे चाल आहे मंदिरनिवासी महंत व सन्याशी याना तर मराठी लिहिता व अस्खलित बोलता येतें काबूलात महानुभाव धर्माचा प्रवेश अमीर दोस्त महमद याच्या कारकीर्दीत झाला दोस्त महमदाचा दिवाण भगवानदास याच्या कुटुंबातील मंडळींनी प्रथम महानुभाव पंथाची दीक्षा घतली व नंतर तेथें या पंथाचा प्रसार झाला याच दुदुवाच्या प्रेरणेनें काबूल येथें श्रीकृष्ण मंदीर स्थापन झालें व तेथील पहिले महंत म्हणून नागेंद्रमुनि विजापूरकर नावाच्या महाराष्ट्रीय पुरुषाची नेमणूक झाली अशा रातीनें या विरागी, निरुपद्रवी, स्वार्थत्यागी, अल्पसंतुष्ट, ज्ञानमार्गीयाचा संघ जरी संख्येनें फार मोठा नसला तरी त्यानें आपला क्षेत्रविस्तार खूपच केला आणि मराठी भाषा व महाराष्ट्र देश याची कीर्ति दूरवर पसरविली

श्री चक्रधरानी पंथप्रसाराकरिता प्रथम ज्याप्रमाणें महाराष्ट्र देशाची पसंति केली, त्याचप्रमाणें मराठी भाषेची देखील पसंति केली त्याकाळीं पंडित मंडळी संस्कृतात ग्रंथरचना करीत तरीपण सामान्य लोकाना आपलीं धर्ममतें कळावीत म्हणून चक्रधरानीं तसेंच त्याचे पट्टशिष्य नागदेवाचार्य यानीं महानुभाव पंथी याना मराठींतच ग्रंथरचना मुद्दाम करावयास सांगितली केशवराजसूरी याच्या मनातून संस्कृतात ग्रंथरचना करावयाचे येऊन त्यानें त्यासंबधात नागदेवा-चार्यांची आज्ञा मागितली असता ते म्हणाले, "नको गा केशवदेया येणें माझिये स्वामीचा सामान्यु परिवारु नागवैल कीं परमेश्वरें तरी जीवाचेया मंदोचिता लागि अनेक व्यसना अयोग्यता जागौनी. ज्ञान काठिण्यता चुकवोनी मऱ्हाठासी अल्पाशन ब्रह्मविद्याचये ठायें निरुपिता येतोनि परमेश्वर लाभुत्रमा वाधु होआवा म्हणौनिची महाराष्ट्रीये निरोपिलें कीं गा एऱ्हवीं सवरा कार्दे

देववाणि निरोपू न लाहे की गा: भणौनि पेहावा सम्यूत सूत्रबद्ध प्रकरण न करी तूं की: नागदेवाचार्यचरित्र, पद्यागमस्मृत, कथा ४७ वी."

"सामन्यु परिवारु" नागवू नये म्हणून गुरुजनीला तरी मराठीत व देवनागरी लिपींत ग्रंथरचना झाली, तरी चक्रधराच्या मागून ६०-७० वर्षांनीं पंथेतरांना आपलीं धर्मपुस्तकें अगम्य व्हावींत या हेतूनें तीं सांकेतिक लिपींत लिहावयाला सुरुवात झाली. प्रथम गाथव ऊर्फ रवळ व्यास यानें सकळ लिपी नावाची एक सांकेतिक लिपी शके १२७५ च्या सुमारास तयार केली. नंतर सुंदर (श. १२८५) पारमांडल्य (श. १२९०) अंक, शून्य, सुभद्रा, श्री इत्यादि दुसऱ्या सांकेतिक लिप्या तयार होऊन त्यात महानुभावीय ग्रंथ लिहिले जाऊ लागले. सांकेतिक लिप्यांचीं कुलुपें महानुभावीय वाङ्मयाला लागताच त्याची शुद्धता जरी राखली गेली, तरी त्याचा प्रसार कमी होऊन, लोकांत गैरसमज मान झपाट्यानें वाढीस लागले. सांकेतिक लिपीचा एक नमुना म्हणून पुढे देवनागरी व सुंदरी अशा दोन लिप्यांत एकच मजकूर दिला आहे.

## देवनागरी लिपी

श्री. चक्रधराये नमः ॥ श्री पचकृष्णाये नमः ॥ ज्ञानभक्ति वैराग्य भेतु मोचकु भेतु अमोचकु ऐसा त्रिविध भेदुः ते भव्य व्याप्ति मागते ॥ १ ॥

## सुंदर लिपी

श्रीज्ञन्यमयारे भमः ॥ श्रीकंज्ञनुल्यारे भमा. ॥ क्षात्रधन्मि मैयाज्ञ भेनु योज्ञनु भेनु अवोज्ञनु भैता ॥ स्त्रिमिम ज्ञोभुः से भज्ञ प्रामुस्सिः ॥ १ ॥

श्रीचक्रधरानीं आपल्या शिष्यांना वेळोवेळीं प्रसंगानुसार उपदेश पुष्कळ केला परंतु स्वत. ग्रंथरचना कांहीं केली नाहीं त्यामुळें त्यांच्या या मौखिक उपदेशावर टीका प्रतिटीकात्मक पुष्कळच ग्रंथ तयार झाले चक्रधराची दिनचर्या व चरित्र ज्यात आलें आहे असें गद्य लीळाचरित्र त्यांचे शिष्य महिंद्रभट्ट ऊर्फ महीमभट्ट व्यास यांनीं तयार केलें.

महानुभावीय वाङ्मयाच्याच नव्हे तर मराठी गद्यवाङ्मयाच्या अग्रभागी पताकेप्रमाणें शोभणारे दोन ग्रंथ म्हणजे 'लीळाचरित्र' व 'सूत्रपाठ' हे होत. श्रीचक्रधरांनी बदरिकाश्रमाकडे शके ११९४ मध्ये प्रयाण[1] केल्यानंतर लागलीच पुढील पाच दहा वर्षांत हे दोन्ही ग्रंथ तयार झाले असे स्पष्ट दिसते. दोन्ही ग्रंथांत रचनाकाल किंवा वगैरे घटनेचा शक दिलेला नसला, तरी ग्रंथांच्या स्वरूपावरून व उद्देशावरून चक्रधरांच्या प्रयाणानंतर लगोलग ते तयार करण्यात आले हें निश्चित. मराठी गद्यवाङ्मयाचा श्रीगणेशा पंचतंत्र किंवा बखरी किंवा ऐतिहासिक पत्र यांपासून होतो असे काही काळापूर्वी मानण्यात येत होतें. महानुभावीय वाङ्मय उपलब्ध होऊं लागल्यापासून मराठी गद्याची परंपरा सहा शतकांपर्यंत मागे नेऊन पोचविता येते. आधुनिक भारतीय भाषांचा विचार केला असता मराठी गद्याइतकें प्राचीन व समृद्ध गद्य क्वचित्च एखाद्या भाषेंत असेल. या दृष्टीनें पाहता मराठी भाषाभिमान्याचें हृदय आनंदानें आणि अभिमानानें तुडुंब भरून जावें, अशा योग्यतेचे हे दोन्ही ग्रंथ निःसंशय आहेत.

"लीळाचरित्रकार" महीभट्ट यांना चक्रधरांच्या सान्निध्याचा लाभ झाल्यामुळें प्रस्तुत चरित्रास प्रत्यक्ष प्रमाणाचें साहजिकच महत्त्व लाभलें आहे. याशिवाय चक्रधरांचे प्रमुख शिष्य नागदेवाचार्य यांच्या प्रत्यक्ष देखरेखीखाली लीळाचरित्र तयार झालें असल्यानें त्याच्या विश्वसनीयतेविषयी शंका घेण्याचेंहि कारण नाहीं. इंग्रजी वाङ्मयांत बॉसवेलकृत डॉ. जॉनसनच्या चरित्राचें जें महत्त्व आहे, तेंच मराठी वाङ्मयांत प्रस्तुत चरित्राचें आहे, असें म्हटल्यास फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. बॉसवेलनें ज्या आस्थेनें, आदरानें, साक्षेपानें व व्यवस्थितपणें डॉ. जॉनसनच्या चरित्राची साधनें जुळविलीं, तशाच पद्धतीनें महीभट्टानें आपल्या गुरूच्या लीळा वर्णन केल्या आहेत. लीळाचरित्रांत एकंदर १५०९ लीळा किंवा कथा आलेल्या असून, त्यावरून श्रीचक्रधरासंबंधीं सर्व प्रकारची माहिती तर मिळतेच पण त्याशिवाय पाचपन्नास महत्त्वाच्या स्थळांची, व्यक्तींची

---

१ भास्करभट्ट बोरीकर, ले. प्रा. वि. भि. कोलते, प्र. ४ पृ. ७७

माहितीहि मिळते. यादवांच्या उत्तरकालातील महाराष्ट्राची परिस्थिति कशा प्रकारची होती, भावी विनाशाची बीजें तींत कशाप्रकारें पेरलीं गेलीं होतीं, याचाहि अंदाज ह्या चरित्रात लागतो. सर्व लीळा एक प्रकारच्या प्रेमळपणानें सांगण्यात आल्या असून त्या ऐकणे हा त्याचा प्राण आहे. भाषाविलासाकडे लक्ष न देता त्या सांगितल्या आहेत. वाक्यें लहान लहान असून, त्यात दीर्घ इकाराचें प्राचुर्य आहे. लीळाचरित्राचीं सुरुवातीचींच कांहीं वाक्यें आहेत तीं अशीं :–श्री परेशाय नमः ॥०॥ फल्ठेठाणीं कन्हाडेया ब्राह्मणाचा घरीं अवतारू स्वीकरीलाः मगः येतुलें एक दीस राज्य केलेंः एक दिनीं श्राध जालेंः ते गोसावीया भार्या रतीचीया चाडा विनविलें आणि. गोसावियासि तेव्हळिं ब्रह्मचर्याची प्रवृत्ति मग' तें निमीत्य करूनि' मातापुरा बीजें केलेः तेथ देवगीरीवरि बीजें करीता श्री दत्तात्रए प्रभुः व्याघ्राचा वेखु धरूनि जाळितळूनि बीजें केलें. हाक दीधलीः श्रीमुगुटीं चवडा ठेविलाः लोकू भीयाला तो पर्ता नेला. तेथ शक्ति स्वीकरिली ॥ अवतारू स्वीकरीला :

लीळाचरित्रकारानींच श्री चक्रधराचे गुरु श्री गुंडम राऊळ ऊर्फ श्री गोविंद प्रभू यांचे गद्य चरित्र (ऋद्धिपुरचरित्र) गोविंदप्रभूच्या मृत्युनंतर सहा महिन्याच्या आत म्हणजे साधारणपणें शके १२१० च्या पूर्वार्धात तयार केलें. (श्री गोविंद प्रभु चरित्र. संपादक प्रो. वि. भि कोल्ते पृ. १० ) बाजारात मिळणाऱ्या छापील प्रतीचा मूळ पाठ शके १२७४ ते शके १३१४ च्या दरम्यान तयार झाला असावा, असें प्रो. कोल्ते यांचें म्हणणें आहे. म्हाइंभटानीं लिहून घेतलेल्या गोविंदप्रभुविषयक आख्यायिका म्हणजे हें चरित्र होय याच कारणानें तें तत्कालीन वऱ्हाडी बोलींत व सुबोधपणें लिहिल्यासारखें दिसतें. सांप्रतच्या चरित्रग्रंथातील व्यवस्थितपणा यात अर्थातच नाहीं तत्कालीन सामाजिक चालीरीतींचा बोध या चरित्रावरून चांगलाच होतो शिवाय लीळाचरित्राप्रमाणें यातहि वऱ्हाडातील अनेक गावांचा जो उल्लेख आला आहे तो भौगोलिक व ऐतिहासिक असा दुहेरी महत्त्वाचा आहे

सूत्रपाठ हा ग्रंथ रामदेवराय जाधव यांचे कोशाधिकारी अनंतभट्ट यांचा नातू केशव व्यास यांनी रचिला. हाहि ग्रंथ लीळाचरित्राप्रमाणें नागदेवाचार्यांच्या देखरेखीखालीं तयार झाला. महींभटांनीं तयार केलेल्या लीळाचरित्रांत श्रीचक्रधरांच्या तोंडचीं जीं १८६२ सूत्रें आलीं आहेत, तीं एकत्र करून व क्रमवार लावून प्रस्तुत पाठ तयार करण्यांत आला आहे. लीळाचरित्राप्रमाणें याहि ग्रंथाचें पठन महानुभाव मंडळी अत्यंत आदरानें करतात. महानुभावीय तत्त्वज्ञान म्हणून जें कांहीं आहे तें या ग्रंथाधारेंच तयार झालें आहे. सूत्रपाठाची भाषा तत्कालीन जुनी मराठी असून, तींत तद्भव शब्दांचा सूर भरणा आहे. वाक्यें लहान लहान व साधीं आहेत. प्रस्तुत सूत्रपाठाचा आधार घेऊन त्यानंतर पुढें विपुल ग्रंथरचना महानुभावीय पंडितांनीं केली. खुद्द केशव व्यासांनीं त्या त्या सूत्रांच्या स्पष्टीकरणार्थ श्रीचक्रधरांनीं दृष्टांत दिले, तसेच सूत्रें त्यावरील दृष्टांतांसहित एकत्र करून दृष्टांत सूत्रपाठ तयार केला. चक्रधरकालीन समाजाचें यथार्थ दर्शन घडविणाऱ्या या दृष्टांतपाठांत एकेंचौरेंशी दृष्टांत घेतले असून, त्या दृष्टांतांवरून केशव व्यासांनीं सिद्धांत काढले आहेत. या सिद्धांतांनाच दार्ष्टांन्तिक म्हणतात. सूत्रें व दृष्टांत हे चक्रधरोक्त असल्यानें त्यांची भाषा व सिद्धांत किंवा दार्ष्टान्तिक यांच्या भाषेंत थोडा फरक आहे. केशव व्यास हे चांगले व्युत्पन्न असल्यानें त्यांच्या दार्ष्टांतिकांची भाषा ही अधिक प्रौढ, तत्सम शब्दांनीं मंडित व पंडिती थाटाची आहे. केशव व्यासांच्या दृष्टांतपाठाची कल्पना यावी म्हणून खालीं एक दृष्टांत दिला आहे.

सूत्रः–जो जें होऔनि असे तो तेंचि बोले ॥ १ ॥ अनंतशक्ति परमेश्वर सकळांसिही विषय व्यवस्था करीति ॥ २ ॥

दृष्टांत :–गावा हस्ति आला: तेथ आत्यंध हस्ती पाहों गेले: एकें पावो देखीला: एकें सोंड देखीली: एकें कानु देखीला: एकें पाठि देखिली: एकें पोट देखीलें: एकें पुस देखीलें। मग एकमेकां सवाडति: आरे तुम्हा हस्ती देखीला. पायो देखीला तो म्हणे हस्ती खांबासरीसा: सोंड देखीली तो म्हणे

(४) प्रकरणवश–म्हणौनि चित्रीची स्त्री न पाहावीः स्त्रीचेन नावे ठकारहि न पाहावाः

(५) वचनसंबंध–हो काः स्त्री दर्शनमात्रे माजवीः मा तरिः सपूर्ण दर्शनेंः संभाषणेंः स्पर्शः माजवीः ते साधावेचि न लगेः ऐसें म्हणीतलेंः तरि तयासि काइ उपाएः असेः कीना नसे पाः नाः उपाए न पवीजे ऐसे काही असेः म्हणीतलेया दृष्टादृष्टीं गुणदोषीं सस्त्वासिही उपाव असतः तरि तेचि उपाव सवग पाः नाः दर्शनादी तीन्ही चुकुनावेः हे काइ पाः परि स्त्रीचेनि नावें जडाचेंहीं दर्शन न घ्यावेंः तेंचि केविः नाः सर्वज्ञ म्हणीतलेंः चीत्रीची स्त्रीहीं न पाहावीः आणिः द्वापरीचा देवीं म्हणीतले काष्टाची पुतळी पायेंहीं न स्पर्शावीः एणे करूनिः स्त्रीची मुख्य आणि सप्तधातु आदिकरूनि जेतुकीं नव जाती स्त्रीचीं लेपेंः तेतुकेंहीं न पाहावेंः माः चेतन काइ पाहों येईलः एसें नीरूपीलें. हा एक संबंधः आता दुसरा संबंधः तरि तोचि केसाः नाः स्त्री दर्शनमात्रे माजवीः तरिः काइ चेतनचि माजवीः आणिः एराचेनि मात्र नुपजेः आणिः काइः नाः चीत्रींचीही स्त्री न पहावीः म्हणीतलेयाः चेतनाचेनि उपजे हें काइ म्हणावें असेः परि जडाचेनि उपजे एणें करुनि दोशाचा शेवट सांगीतला'

(६) आचार स्थळ :—चीत्र तें मनुष्याप्रसि चरवेंः अवयेव शुद्धिः वर्ण अळकारः भाव तारुण्य ऐसें जरि मनुष्य तरि काइ म्हणावें असेः चीत्रीची स्त्रीः भीतरील मनोधर्म वासुः तैसेचि येकामन द्रव्यातु स्त्री असे.

महानुभावीय तत्त्वज्ञानात्मक तसेंच कथात्मक वाङ्मय पुष्कळ वाढूनहि, बाहेरच्या जगाला त्याची मध्यन्तरीच्या काळांत मुळींच वार्ता नव्हती. गेल्या सुमारें पन्नास वर्षांपासून महानुभाव पथ व त्याचें साहित्य या गोष्टींकडे पंथेतरांचें लक्ष जाऊं लागलें आहे. ता. २१ नोव्हेंबर १८९९ च्या केसरींत लोकमान्य टिळकांनीं एक विस्तृत लेख लिहून या पंथासंबधानें पंथेतरांना प्रथमच कल्पना आणून दिली. त्यानंतर डॉ. भांडारकर, इतिहासाचार्य राजवाडे, गोविंद काशिनाथ चांदोरकर, विनायक लक्ष्मण भावे, केशव आप्पा पाध्ये, हरिभाऊ नेने, नी. ब.

मवाळकर, डॉ. यशवंत खुशाल देशपांडे, वा. ना. देशपांडे आणि प्रो. वि. मि. कोल्ते इत्यादि विद्वानांनीं निरलसपणें व परिश्रमपूर्वक माहिती जमा करून महानुभाव पंथ, त्याचें तत्त्वज्ञान व साहित्य यासंबंधीं सविस्तर माहिती मराठी वाचकांना करून दिली आहे. या त्यांच्या कामगिरींत माहूरच्या सुप्रसिद्ध महंत दत्तलक्षराज कवीश्वर महानुभाव, मुरारी यक्षदेव महंत, बाळकृष्ण महानुभाव शास्त्री, श्रीगौरव व्यास महानुभाव, श्रीगोपीराज, श्रीकृष्णराज दादा लासुरकर व श्री. मुरलीधरशास्त्री यांची मदत झाल्यानेंच सांकेतिक लिप्यांचीं कुलुपें उघडलीं जाऊन, महानुभावीय साहित्याचा खजीना त्यांना उपलब्ध झाला. महानुभावीय वाङ्मय व तत्त्वज्ञानासंबंधीं आपणाला आज जी माहिती उपलब्ध झाली आहे तिचें सर्वश्रेय या सर्व विद्वानांना आहे यात शंका नाहीं.

महानुभावांचे वेद म्हणा, शास्त्रें म्हणा, उपनिषदें म्हणा 'सूत्रपाठ' हा ग्रंथ होय. पुढें देण्यात आलेली माहिती या सूत्रपाठावरच मुख्यतः आधारलेली आहे. महानुभाव तत्त्वज्ञानात चार वस्तु नित्य मानलेल्या आहेत. जीव, देवता, प्रपंच व परमेश्वर ह्या त्या चार वस्तु होत. ह्या स्वतंत्र, नित्य, अनादि व अनंत आहेत. ह्यांचा थोडक्यात परिचय करून घ्यावयाचा तर तो नित्यबद्ध देवता, बद्धमुक्त जीव, नित्यमुक्त परमेश्वर व प्रपंच अनित्य या सूत्रानें करून देता येईल. त्यात प्रपंच अनित्य असें जें म्हटलें आहे तें कार्यरूप प्रपंचाला उद्देशून होय. कारणरूप प्रपंच हा नित्य व स्वतंत्रच आहे. इतर धर्मपंथांच्या तुलनेनें महानुभावीय तत्त्वज्ञानात देवतांना स्वतंत्र पदार्थ कल्पिला आहेत, हें त्यांचें एक वैशिष्ट्य आहे. जैनांच्या तत्त्वज्ञानात देवता ह्या जीवांची एक सुखसंपन्न अवस्था समजली जाते. विशिष्टाद्वैत प्रतिपादन करणारे रामानुजाचार्य देवता ही जीवयोनीच मानतात. द्वैती मध्वाचार्यांनीं देवतांना जीवयोनींतच स्थान दिलें आहे. सर्वं खल्विदं ब्रह्म मानणाऱ्या अद्वैती शंकराचार्यांच्या दृष्टीनें देवतांना स्वतंत्र स्थान असणें शक्यच नाहीं. महानुभावीय तत्त्वज्ञान हें पूर्ण द्वैताचें तत्त्वज्ञान असल्यानें जीव, देवता, प्रपंच व परमेश्वर ह्यांपैकीं कोणाचेंहि दुसऱ्याशीं किंवा सर्वांशीं मिळून असें ऐक्य होत नाहीं.

जीव हे अनंत आहेत. 'आनंतें ब्रह्मांडें: आनत जीवः आनंत देवताः आनत परमेश्वर (परमेश्वरावतार)' (विचार २१२). सूत्रपाठात जीवाचें लक्षण 'नित्यः केवलः आनादिः अविद्यायुक्तः वस्तु एकु आतिः ते जीव सब्दे जाणिजे' (महावाक्य २), असें दिलें आहे. जीवाला जडलेली अविद्या परमेश्वर सेवेनें नाहींशी झाल्यावर तो मुक्त होतो. परंतु मुक्तावस्थेंत देखील तो स्वतंत्र असतो. जीवाला ज्ञानमार्गानें ब्रह्मस्वरूप प्राप्त झालें किंवा भक्तिमार्गानें ईश्वरस्वरूप प्राप्त झालें तरी तो आपलें स्वतंत्र अस्तित्व कांहीं टाकीत नाहीं. एखाद्या विस्तीर्ण तलावातील पाण्यात तेलाचा थेंब पडला म्हणजे तो जसा आपला स्वतंत्रपणा कायम ठेवून त्यात हरपून जातो, त्याप्रमाणें जीव ब्रह्मस्वरूप किंवा ईश्वरस्वरूप प्राप्त करून घेतल्यावर जीवाचें होतें.[1] (यया तळ्यात तेलाचा थेंब घातला : तो हारपौनि गेला : उदकाचेनि बाहुल्ये : लक्षणस्थळ उद्धरण. ६४) जीव हा मुळात निष्क्रिय असतो. शुभाशुभ कर्में करण्याची इच्छा तोच करतो. परंतु जडभरतासारखा तो पडून राहिलेला असतो. त्याला प्रेरणा सल्माकडून मिळते. हा सल्म म्हणजे मायास्वरूपाचा अंश असून तो परमेश्वरी इच्छेनें जीवाला दिला जातो. जीवाच्या इच्छेप्रमाणें निरनिराळीं कर्में करण्याची प्रेरणा त्याला सल्माकडून मिळते. जीव भोगतो तीं सुखदुःखें संल्माला भोगावीं लागतात व जीवाच्या मोक्षावस्थेबरोबर सल्मही मुक्ति मिळवितो. हा संल्म जीवाला लागता क्षणीं त्या जीवाला वस्त्राची वासना होते. या वासनेमुळें संल्माला पाहताच मायेच्या प्रेरणेनें जीव 'चैतन्यमहं' म्हणजे 'मी माया आहे' असें म्हणतो. त्याचेंच अनुकरण करून सल्मही म्हणतो 'चैतन्यमहं' याप्रमाणें जीव व सल्म या उभयतांसहि व्यापण म्हणजे मायास्वरूप आहों असें मिथ्या ज्ञान झालें. हें होताच चैतन्याचा उर्फ मायेचा किंवा चैतन्य मायेचा 'मल' जीवाला व सल्माला लागतो. याला आद्यमल म्हणतात. मल याचा अर्थ सूक्ष्म शरीर. यानतर सल्माच्या प्रेरणेनें जीव 'मी विश्व आहे,' 'मी प्रकृति आहे' असें म्हणतो. त्याबरोबरच त्याला विश्व, प्रकृति वगैरे देवतांचा मल जडतो. म्हणजे विश्व,

१ महानुभाव तत्त्वज्ञान, प्रो वि. भि. कोलते, पृ. ४९७

प्रकृति वगैरे देवतांच्या सूक्ष्म शरीराची प्राप्ति होते. महानुभाव तत्त्वज्ञानात देवतांची संख्या ८१०१२५०१० येवढी आहे. अर्थात् जीवाला जडणाऱ्या मलाची किंवा सूक्ष्म शरीराची संख्या ८१०१२५०१० ही झाली. जीव हा मुळात अव्यक्त असल्यानें व जीवाला त्याच्या शुभाशुभ कर्मानुरूप फल देणें हें देवतांचें मुख्य कर्तव्य असल्यानें देवता जीवाला आपापले सूक्ष्मरूप देऊन त्याला व्यक्त करतात. इतक्या देवतांचे 'मल' जडूनहि जीवाची ब्रह्माची वासना तशीच राहते. शेवटी त्याला मनुष्य देहाची प्राप्ति होऊन ही वासना पूर्ण होते. यानंतर त्याला कर्माकर्मांप्रमाणें पुढील जन्माची प्राप्ति होते व दर खेपेस पहिल्यासारखी देवतांचे मल जडवून घेण्याची कसरत त्याला करावी लागते. ज्ञान प्राप्त होऊन मोक्ष मिळेपर्यंत जन्म आणि पुनर्जन्माच्या फेऱ्यात जीवाला राहावें लागतें. मोक्ष मिळाल्यावर जीव ब्रह्मस्वरूप किंवा ईश्वरस्वरूप प्राप्त करतो आणि सलग्न मूळ मायेंत किंवा चैतन्यात सामील होतो.

देवतांची संख्या वर सांगितलीच आहे. ह्या देवतांचे कर्मभूमीच्या देवता, अष्ट देवयोनि देवता, स्वर्गीच्या देवता, अष्ट भैरव इत्यादि नऊ प्रकार असून त्यांचें स्वरूप लक्षावधि योजनांचें आहे. ह्या देवता मुळात अव्यक्त असतात. परंतु परमेश्वराच्या आज्ञेनें साकार व परिमित बनतात. या साकार देवतांना 'ब्रह्मांडस्थ देवता' म्हणतात. मनुष्याला स्वर्गनरक देणाऱ्या याच देवता होत. मनुष्याच्या शरीरात मेदमान रूपानें सूक्ष्म शरीर धारण करून राहणाऱ्या देवतांना पिंडस्थ देवता म्हणतात. या देवतांत उच्च देवता नीच देवता असाहि भेद असून तो कायम स्वरूपाचा आहे. उच्च देवता उच्च राहतात व नीच देवता नीच राहतात. याच कारणानें देवतांना 'नित्यबद्ध' मानलें जातें. अविद्येनें जीव बद्ध व अविद्यानाशानें मुक्त होत असल्यानें जीवाला 'बद्धमुक्त' म्हटलें जातें.

प्रपंच म्हणजे जगत् किंवा सृष्टि. हा दोन प्रकारचा आहे. कारणरूप प्रपंच व कार्यरूप प्रपंच. 'कारणरूप प्रपंच अनादि सिद्ध असून अष्ट भैरवस्थित आहे. प्रत्येक भैरवस्वरूपापासून आठ आठ भूतांचा समूह उत्पन्न होतो. या आठ भूतांत

पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश या पंच महाभूतांचा आणि सत्व, रज व तम या तीन गुणांचा समावेश होतो. या आठ भूतामध्यें एक कारणभूत व सात समल्भूतें असतात. अष्टभैरवापासून प्रत्येकीं आठ आठ अशीं एकदर ६४ भूतें निर्माण होतात या ६४ भूतात सर्व मिळून ८ कारणभूतें व ५६ समल्भूतें असतात हीं कारणभूतें आधार असून त्यांचीं समल्भूतें हीं आधेय होत प्रत्येक भैरवापासून निघणाऱ्या आठ भूतांच्या गटात एक कारणभूत जरी नसल, तरी त्याच्याशिवाय बाकीचीं सात समल्भूतें निरूपयोगी होतात. वरील ६४ भूतां मधल्या ८ कारणभूतांचा मिळून विश्वरूपदेवतेचा मल ऊर्फ सूक्ष्म शरार बनतें. जीवाला ८ कारणभूतांचा झालेला विश्वरूप देवतेचा मल वहल्यावर तो कार्यरूप प्रपच उत्पन्न करतो कार्यरुप प्रपच सहारानतर कारणरूप होऊन राहतो [१]"

परमेश्वराला सूत्रपाठात त्र्यश म्हटलें आहे 'सत् सब्दें ब्रह्म जाणिजे चित् सब्दें माया जाणिजे आनद सब्दें ईश्वर जाणिजे ब्रह्म माया ईश्वर एसा त्र्यश परमेश्वर एकु आति ' (महावाक्य ५) परमेश्वराच्या ठिकाणीं नित्यत्व, व्यापकत्व, सर्व आत्मकत्व, सर्व ध्यानीतत्व, सर्वकर्तृत्व व सर्वसाक्षीत्व, (महावाक्य ९) आहे. निराकार व अव्यक्त परमेश्वराला जीवाचें कल्याण अकल्याण काहींच करता येत नसून जीवाला ज्ञान देण्यासाठीं त्याला मनुष्य देहच धारण करावा लागतो महानुभावात चार युगाचे चार अवतार मानतात कृतयुगात हंसावतार, त्रेतायुगात दत्तावतार, द्वापरयुगात कृष्णावतार व कलियुगात चक्रधरावतार. महानुभावाचा दत्तावतार भागवताच्या चतुर्थ स्कन्धाप्रमाणें एकमुखी व चतुर्बाहूच आहे. साकार परमेश्वराच्या सन्निधानानें देहधारी जीव आत्मकल्याण करून घेतात. अवतार विद्यमान असताना त्याच्या प्रत्यक्ष दर्शनानें व सेवेनें जीवाना आत्मकल्याण करता येतें व तो विद्यमान नसताना त्याच्या स्मरणानें ( आनुस्मरण ) व सबंधानें म्हणजे त्याच्याशीं स्पर्श झालेल्या माणसाचा किंवा वस्तूचा सहवास घडून आणल्यानेंहि आत्मकल्याण होतें

१ विचार समीक्षा, ले श्री वा ना देशपांडे, पृ. ४५-४६

मोक्षाचीं साधनें दोन मानली आहेत. एक ज्ञानमार्ग व एक भक्तिमार्ग. त्यातहि 'ज्ञानापसि प्रेम उत्तम' असें म्हणून भक्तिमार्गाचें श्रेष्ठत्व प्रतिपादन केलें आहे. ज्ञानियाला परमेश्वर आपल्या पाठिशीं घालतो व भक्ताला आपल्या पोटाशीं धरतो. देवताचें देणें हें चिरकाल ठिकाणीं नसतें. ईश्वर अवचकत्वानें, संपूर्णतेनें आनंद देतो देवताची उपासना न करता, ईश्वराची उपासना करावयाची ती याचकरिता. ज्ञान आणि भक्ति यापैकीं कोणत्याहि मार्गानें साधक गेला तरी त्याला उरलेल्या मार्गाची प्राप्ति होतेच. ज्ञानानें भक्ति प्राप्त होते तसेंच भक्तिनें ज्ञान प्राप्त होतें. या दोन्हीं गोष्टी ईश्वराच्या प्रसादानें मिळत असल्यानें व दोन्हींची आवश्यकता असल्यानें साधकाला त्या क्रमाक्रमानें मिळतात. या बाबतींत एका सूत्रांत असें म्हटलें आहे कीं, वेधूनि बोधीतिः का बोधूनि वेधीति. (विचार १११) याचा अर्थ असा कीं ईश्वरानें आधीं 'वेधलें' म्हणजे भक्ति दिली तर मागाहून तो बोधतो म्हणजे ज्ञान देतो आणि आधीं बोध दिला तर मागाहून तो वेधतो म्हणजे भक्ति देती. अशा रीतीनें भक्ति व ज्ञान याचा चक्रधरानें समन्वय केला आहे.

महानुभाव पंथ हा मुख्यतः साधकाचा, मुमुक्षुचा असल्यानें पंथाच्या अनुयायाचे नियम कडक आहेत. पंथात संन्यासी व गृहस्थ असे दोन वर्ग आहेत. संन्याशानें नित्याटन, भिक्षाभोजन, एकांतवास व परमेश्वर नामस्मरण करीत आपलें जीवन चालविलें पाहिजे. यात चान्दकल कोणत्याहि प्रकारची करता कामा नये सर्व प्रकारच्या वासनांचा, इच्छांचा, आवडींचा त्याग करून जीवतपणीं मेल्याप्रमाणें वागलें पाहिजे. (जीतेनि मृताचा धर्मा वर्तावें. आचार ७४) दुसरा वर्ग हा गृहस्थाश्रमी असल्यामुळें त्याला सांसारिक कर्में यथोचित पार पाडणें आवश्यक आहे. चातुर्वर्ण्य व्यवस्था ही परमेश्वरानेंच निर्माण केली असल्यानें त्याच्या आज्ञेनुसार ती गृहस्थाश्रमीयानें अमलात आणून आपला लोकव्यवहार चालविला पाहिजे. गृहस्थात तीन भेद आहेत परंपरागत गृहस्थ, संन्यासच्युत गृहस्थ (म्हणजे आधीं संन्यास घेऊन पुन: संसारात पडलेले) व भोपी गृहस्थ (म्हणजे देवस्थानाची सेवा करणारे) संपूर्ण अहिंसेचें पालन व द्युत, मद्य, मांस, वेश्या, शिकार, चोरी व परद्वारसेवा या सात दुर्व्यसनांचा

सर्वथा परित्याग करण्याची व देवीदेवताना शरण न जाता एका परमेश्वराचीच अनन्यभक्ति करण्याची दृढ प्रतिज्ञा गुरुच्या समोर परमेश्वरापुढें प्रत्येक महानुभावाला घ्यावी लागते. या बाबतीत त्याचें वारकऱ्याचें साम्य वारकरी पथाशी आहे. महानुभाव हे मूर्तिपूजक नि सदार आहेत परंतु त्यांच्यात मूर्तीना बुजबुजाट नाहीं. मूर्तीची ते अवहेलना करीत नाहीत. तर श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रेय यांच्याखेरीज इतर मूर्तीना उचलून ते एखाद्या देवी-देवताच्या देवळात नेऊन ठेवतात. ईश्वर किंवा ईश्वरावतारखेरीज इतरांची पूजा महानुभाव करीत नसल्यानें ईश्वराच्या किंवा ईश्वरावताराच्या (उदा० श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रेय इत्यादि) मूर्तीचीच पूजा ते करतात. यादि मूर्ती ते श्रीकृष्ण, श्रीदत्तात्रेय, श्रीचांगदेवराऊळ, श्रीगोविंदप्रभु व श्रीचक्रधर या पाच परमेश्वरापैकीं (यानाच पचकृष्ण असे म्हणतात.) कोणत्याहि परमेश्वरावताराच्या चरणस्पर्शानें पवित्र झालेल्या सवंगी पाषाणाची बनवितात. परमेश्वर चरणांकित पवित्र पाषाणाची किंवा त्यापासून बनविलेल्या मूर्तीची म्हणजे विशेषाची (याला विशेष म्हणण्याचें कारण असे कीं यातील पावित्र्य, कृपा, माया इत्यादि शक्ति सृष्टीचा संहार होईपर्यंत नष्ट होत नाहीत हें याचें वैशिष्ट्य आहे) स्थापना देव्हाऱ्यात केल्यानंतर दररोज सकाळीं, दुपारी व सध्याकाळीं त्याची पूजा अवश्य करावी लागते ती केल्याशिवाय अन्नपाणी कधीच ग्रहण करता येत नाहीं पूजेत ईश्वराच्या लीलाचें स्मरण, प्रार्थना व नमस्कार यांचा अतर्भाव होतो. प्रार्थनेत आपल्याकडे सर्व प्रकारचा कमीपणा घेऊन, ईश्वराची आळवणी केली जाते. महानुभावात ज्याप्रमाणें देवतांचा बुजबुजाट नाहीं, त्याचप्रमाणें गुरुबाजी देखील नाहीं. गुरुला परमेश्वर समजून त्याच्या ठिकाणीं परम प्रीति करावी पण त्याला परमेश्वर समजू नये असें चक्रधरानें सांगितलें आहे. गुरुच्या समाधीची पूजादि अर्थात्च वर्ज्य आहे. कारण समाधीची पूजा म्हणजे प्रेतपूजा होय व प्रेतपूजा करणारे नरकास जातात असे गीतेंत (यान्ति देवव्रता देवान्। पितॄन्यान्ति पितृव्रता । भूतानि यान्ति भूतेज्या । यान्ति मद्याजिनोऽपि माम्–गीता अ. ९, २५) सांगितलें आहे. महानुभाव ईश्वरखेरीज इतरांची उपासना करीत नसल्यानें राधा, रुक्मिणी इत्यादि देवींची किंवा मारुती, गजानन, विष्णू इत्यादि

देवाची पूजा किंवा एकादशी वगैरे सारखी देवताव्रतें ते करीत नाहींत. महानुभाव जातिभेद किंवा स्पर्शास्पर्श मानतात किंवा नाहींत, या बाबतींत असें सांगता येईल कीं, महानुभाव सन्यासी जातिभेद मानीत नाहींत. ते सर्वांकडची भीक्षा ग्रहण करितात. लीलाचरित्रात एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, जोगेश्वरी येथें एक मातंग श्रीचक्रधरस्वामींचें दर्शन घेत असता त्यानें एक लाडू त्याच्या हातावर ठेवला तो त्यांनी आपल्या सर्व भक्ताना वाटून दिला. अर्थात् महानुभावीय सन्यासी अस्पृश्यता मानीत नाहींत जे महानुभाव गृहस्थ आहेत, त्याच्यात जातिभेद, अस्पृश्यता मानणें इत्यादि गोष्टी आहेतच 'महानुभाव पथातील अनुग्रहीत आणि सन्यस्त या दोन वर्गांपैकीं पहिल्या अनुग्रहीत वर्गात इतर लोकाप्रमाणें रोटीव्यवहार व बेटीव्यवहार या सबंधानें सर्वच प्रतिबंध पाळले जातात"[1] सन्यासदीक्षा महानुभाव पथात स्त्री पुरुष, ब्राह्मण-शूद्र वगैरे सर्वांना घेण्याचा अधिकार आहे, हें त्याचें एक वैशिष्ट्य आहे. आद्य शंकराचार्यांनी ब्राह्मणाखेरीज इतराना सन्यासदीक्षेचा अधिकार ठेवलेला नाहीं

महानुभाव पंथ हा सनातन वैदिक धर्माचीच एक शाखा होय प्रत्यक्ष वेदपठण जरी महानुभाव करीत नसले, तरी त्याना वेद पूज्य वाटतात गीता व भागवत हे ग्रंथ ते आवडीनें व आदरानें वाचतात सर्व हिंदूना प्रिय असलेल्या श्रीकृष्णाची उपासना ते करतात. श्रीकृष्णाबरोबर श्रीदत्तात्रेयाचीहि पूजा ते करतात महानुभाव सन्यासी चातुर्वर्ण्य मानीत नसले, तरी महानुभाव गृहस्थ ते मानतात आत्मा व पुनर्जन्म याहि गोष्टींवर त्याचा पूर्ण विश्वास आहे. संपूर्ण अहिंसा व संपूर्ण शाकाहार यामुळें वागणुकीनें देखील ते सात्त्विक आहेत. असें असून त्याच्याविषयीं नामदेव एकनाथाच्या कालापासून ते अगदीं आजतागायत अकारणच गैरसमज पसरले आहेत. हे गैरसमज म्हणींत देखील समाविष्ट झाले आहेत, त्यावरून त्याची तीव्रता कळेल. करणी कसाबाची व बोलणी मानभावाची, या म्हणीवरून महाजन समाजाच्या मनात या थोर पंथाबद्दल किती अनुदारपणाची

१ महानुभाव पथ, ले. बाळकृष्ण महानुभाव शास्त्री, १९४७, पृ ३६५

भावना वसत होती किंवा आहे हें दिसतें. महानुभाव हे वेदविरोधी आहेत, वर्णाश्रमव्यवस्था त्याना मान्य नाहीं, ते सनातनी हिंदु नाहींत. त्यानीं यवन राजा कडून मोठ्या कुशलतेनें जिझिया कराची माफी मिळविली, गोसावी इत्यादि हिंदु साधु लोकावर जो गहजब यवनानीं उडविला त्यापासून अलिप्त राहता यावें म्हणून महानुभावानीं काषाय वस्त्रें टाकून देऊन काळीं वस्त्रें धारण केलीं, आपण मूर्ति पूजक नाहीं असे भासवून त्यानीं मुसल्मान बादशाहाची मर्जी संपादन केली इत्यादि आक्षेप त्याच्यावर अनेक विद्वानानीं आणले होते.[१] हे आक्षेप अज्ञान व गैरसमजावर आधारलेले असल्यानें मागाहून त्यापैकीं काहींनीं ते मागही घेतले. आता तर नागपूर हायकोर्टानें आपल्या तारीख २१-८-१९४४ च्या निकालानें असें जाहीर केलें आहे कीं, महानुभाव हे सनातन हिंदुहून कोणत्याहि प्रकारें भिन्न नाहींत जिझिया करापासून महानुभावानीं माफी मिळविली या म्हणण्यासहि पुरेसें सत्यकथन नाहीं. कारण औरंगजेब बादशहानें ता २८-३-१६८४ ई ला जी सनद गोविंद बाबो वगैरे महानुभाव महात्म्याना करून दिली तींत 'हिंदू फकीराना जिझिया कराची माफी द्यावी' असें म्हटलेलें आहे केवळ महानुभाव पंथीयाना ती माफी द्यावी असें कोठेंहि म्हटलेलें नाहीं[२] आपल्या राज्याच्या उत्कर्षासाठीं हे फकीर ईश्वराची प्रार्थना करतील या उद्देशानें औरंगजेब बादशहानें ही सनद दिली हें उघड आहे काळीं वस्त्र किंवा ब्रह्मपोश याचा या सनदेंत कोठेंच उल्लेख नाहीं.

महानुभाव पंथाचे अनुयायी हे सनातनी वैदिक हिंदु असूनहि त्याचा द्वेष इतर हिंदूनीं करण्याचें एक कारण म्हणजे हें कीं, अशा प्रकारचा आपल्यातीलच इतर पंथीयाचा द्वेष करण्याची प्रथा आपल्याकडे पूर्वीपासून आहे. शैवानीं

---

१ विष्णुबोवा जोग, गोविंद काशीनाथ चांदोरकर, इतिहासाचार्य राजवाडे विनायक लक्ष्मण भावे के ना पाध्ये, डॉ. शं दा. पेंडसे, कृष्णशास्त्री घुले, श. गो चद्रे, संतोष भारती हे ते गृहस्थ होत इंपीरियल गॅझेटियरच्या जुन्या आवृत्तीत अशीच चुकीची माहिती देण्यात आली होती.

२ महानुभाव पंथ, ले बाळकृष्ण महानुभाव शास्त्री १९४७, पृ ३८० ८१

वैष्णवास पाखंडी म्हणणें किंवा उलट वैष्णवानीं शैवास पाखंडी समजणें हें आपल्या इकडे पूर्वीपासून चालत आलें आहे. महानुभावाना याच पद्धतीनें इतर हिंदु पाखंडी म्हणत असावेत. दुसरें व मुख्य कारण म्हणजे महानुभावानीं केलेला देवताभक्तीचा निषेध. अनेक देवतांची भक्ति, त्या सर्व देवता एकाच परमेश्वराच्या निरनिराळ्या आकृति अशा समजुतीनें करणें, हें बहुजन हिंदुसमाजाला अधिक रूचतें. नद्यांचें पाणी जसें समुद्राला मिळतें तसे सर्व देवाना केलेले नमस्कार केशवालाच पोंचतात, अशी सामान्यपणें सर्व हिंदूंची समजूत आजपर्यंत चालत आलेली आहे. आणि म्हणून आपापल्या आवडीप्रमाणें राम, कृष्ण, विठ्ठल गजानन, मारुति, अंबाबाई, दुर्गादेवी, खंडोबा इत्यादि अनेक देवतांची पूजा आपले लोक करीत असतात. नेमक्या याच म्हणजे अनेक देवतापूजनाच्या विरुद्ध महानुभाव असल्यानें त्यांच्याविषयीं इतराच्या मनात अप्रीति निर्माण होणें साहजिकच होतें. एका ईश्वराची पूजा करावी, देवतांची करू नये याविषयीं महानुभाव ग्रथात उत्तम प्रमाणें दिलीं आहेत. हीं प्रमाणें जर इतर हिंदूंना कळलीं असतीं तर महानुभावाविषयीं पुढे जे गैरसमज निर्माण झाले ते झाले नसते. परतु चक्रधराच्या नतर आपली ब्रह्मविद्या गुप्त ठेवण्याच्या हेतूनें रवळोव्यास यानीं सकळलिपी नावाची सांकेतिक लिपी तयार करून, तिचीं कुलुपें सर्व ग्रंथाना ठोकून दिलीं यामुळे इतराना महानुभाव अमुक पद्धतीनें का वागतात हें कळेनासें झालें, आणि मग जसजसा काळ गेला तसतसा गैरसमज अधिकाधिक वाढत गेला. या बाबतींत महानुभाव अधिकारी श्री बाळकृष्ण महानुभाव शास्त्री म्हणतात, "कोणत्याहि पंथाचें खरें अंत स्वरूप त्या त्या पंथातील व्यक्तींच्या, आचरणावरून नव्हे, तर धार्मिक ग्रथातील तात्विक सिद्धातावरूनच ओळखलें जात असतें. पण महानुभाव पंथाचे धार्मिक ग्रथ पथीयानीं सांकेतिक लिपींत लिहून ठेविल्यानें महानुभाव पथाचें खरें अंत स्वरूप इतर पथीयास कळेनासें झालें शिवाय महानुभाव पथीयानीं स्वत ला सनातनधर्मी तर म्हणावयाचें, पण सनातनधर्मीयाच्या हाडींमासीं खिळलेल्या देवताभक्तीचा निषेधहि करावयाचा व देवतांच्या देवळातहि जावयाचें नाहीं, सन्यस्त तर म्हणावयाचें, पण सन्याशाचीं

भगवीं वस्त्र न नेसता काळींच वस्त्रें नेसावयाचीं इत्यादि श्रीचक्रधरस्वामींच्या नंतरच्या महानुभावाचे आचार इतर पंथीयास नोंचू लागले- तेव्हा वाटेल तशा वेड्या विकृतिमाची संधि त्यांना अनायासेंच प्राप्त झाली व त्याच्या हृदयात भलत्यान गैरसमजुती घर करून बसल्या .. जेव्हापासून महानुभाव पंथाचें वाङ्मय उजेडात येऊन वाचावयास मिळूं लागलें, तेव्हापासून महाराष्ट्रीय विद्वानाच्या मतात किती परिवर्तन घडून आलें, याचा प्रत्यक्ष अनुभव सर्वांस आलेलाच आहे.[१]"

महानुभाव पथाच्या स्थापनेपासून शभर वर्षांत झालेले व नवरचनाचा महत्त्वाचा ज्याच्या ऐसक्ताना घडला आहे, अशा प्रयात सातीं ग्रंथ' पवित्र मानलें जातात हे सर्व ओवीवृत्तात रचिले आहेत. बहुधा हीं सातीं काव्यें एकान्त पोथीत लिहिलेलीं आढळतात. हे "सातीं ग्रंथ" पुढीलप्रमाणें होत :—

वच्छहरण :—हें काव्य दामोदर पंडितानें शके १२०० च्या सुमारास रचिलें दामोदर पंडित व त्याची पत्नी हिरगा या दोघानींहि महानुभाव पथाची संन्यास दीक्षा नागदेवाचार्यांकडून घेतली होती. वच्छहरण ऊर्फ वत्सहरण या काव्यात श्रीकृष्णानें लहानपणीं केलेला अघासुरवध आणि कृष्णावतार हा खरा आहे किंवा नाहीं, हें पाहाण्याच्या उद्देशानें ब्रह्मदेवानें गोपाळांचें व त्याच्या वत्साचें केलेलें हरण असे दोन प्रसग वर्णिले आहेत मराठींत वत्सहरणाच्या प्रसंगावर कोणतेंहि काव्य रचलेलें नाहीं. यावरून पाहता 'वच्छहरण' हें काव्य प्राचीन, प्रथमच व स्वतंत्र असें सहजच ठरतें. काव्याच्या ओव्या पाचशें तीन असून त्यात 'भणे मुनी कवीश्वराजु' असा उल्लेख पाच वेळा आला आहे या उल्लेखावरून वच्छहरण हें काव्य कवीश्वराजानें केलें असें वाटण्याचा संभव आहे. परंतु वस्तुत तसें नाहीं वैद्यराज हा दामोदर पंडिताचा परम मित्र होता. मित्रगौरवाय त्यानें आपल्या काव्यात त्याचें नाव अनेक वेळा गोविलें आहे याच्या उलट 'रत्नमाला स्तोत्र' या शके १२०७ मध्यें लिहिलेल्या आपल्या ग्रंथात दामोदर पंडिताचें नाव

१ महानुभाव पथ, ले बाळकृष्ण महानुभाव शास्त्री, १९४७, पृ ३८५–३८६

केशवराजानें ग्रंथसमाप्तींत घातले आहे. प्रस्तुत काव्याची भाषा ज्ञानेश्वरीसारखी जुनी मराठी असून तींत प्राकृत किंवा तद्भव शब्दांचा भरणा पुष्कळ आहे. श्रीकृष्णाच्या सवगड्यानीं केलेल्या क्रीडा यात सुंदर रीतीनें वर्णिल्या आहेत. मुनिमंडित सरोवराचीं, यमुना तटाकाचीं आणि श्रीकृष्णाचीं यात आलेलीं वर्णनें काव्यपूर्ण आहेत. निसर्गाचें वर्णन करताना मात्र वास्तवतेकडे दुर्लक्ष करून वृंदावनात नारळी, पोफळी, फणस, खर्जुरी नारिंग इत्यादि वेगवेगळ्या हवामानात होणारे वृक्ष एकत्र आणले आहेत. ब्रह्मदेवानें गोपाळाचें हरण केल्यावर श्रीकृष्ण स्वतः गोपाळ व वत्स बनला याचें वर्णन असें केलें आहे. "गोकुळा जाती जाली वेळः तंव आपणची जालेवच्छे गोपाळः एन्हवीं गाई स्त्रियाचें मन व्याकुळः निन्दा होतें." १४९ ते १५१ या ओंव्यावरून दामोदर पंडिताला हठयोगाची माहिती असावी असें दिसते. याशिवाय उपमाउत्प्रेक्षादि अलंकारानी हें काव्य अगदीं हिरेजडित बनविलें गेलें आहे. त्यातील 'जैसी कुलस्त्रियेची गुप्त संपत्ति भोगावी एके चि पतीं ॥ तैसी हरिकथारसीं रतीः भक्ता वाचौनि नाहीं ॥२०॥ कालिंदीजल निर्मलः श्रीकृष्णकान्ति श्यामल ॥ प्रतिबिंबैली भणौनि सुनील होऔनि ठेली ॥ १६८ ॥ एकांगुष्ट तपिए बकः नामाग्री दृष्टी घालिनी टोंक ॥ यज्ञदीक्षीत तैसे चक्रवाकः प्रिया तें सांडिनीना ॥ १८१ ॥ दीपे अग्नाळिजे डिंगरुंः क्षीराब्धा दुधाचा पाहोनेरुं ॥ तैसा तुज पुढा मतीचा विस्तारुः आइके सर्वज्ञनाथा ॥४०८॥ या ओंया कोणालाहि आवडतील अशा आहेत.

**रुक्मिणीस्वयंवर** :–हें काव्य नरेंद्रानें शके १२१४ मध्यें लिहिलें. श्री. कृष्णराजशास्त्री पारमांडल्य यांच्याजवळ असलेल्या पोथींत या काव्याच्या २९३४ ओंव्या असल्या, तरीपण बऱ्याचशा सर्व महानुभावांच्या सांनीग्रथात या काव्याच्या ८७९ इतक्याच ओव्या आहेत. हें काव्य प्रा वि भि. कोलते यांनी इ. स. १९४० मध्यें संपादून प्रसिद्ध केलें. काव्याची रचना भागवताच्या दशमस्कंधाच्या व एका विशिष्ट पद्मपुराणाच्या आधारें करण्यात आली आहे.[१] भीमकाच्या मंभेत

१ नरेंद्रकृत रुक्मिणीस्वयंवर सं प्रा. वि. भि कोलते, पृ १७

कल्याणकीर्ति नावाचा एक भाट येतो. त्याच्या बरोबर असलेल्या किन्नरानें निरनिराळ्या देशांतील राजांचे गुणानुवाद केले तरी पण रुक्मिणीला आनंद झाला नाहीं. परंतु श्रीकृष्णाचें वर्णन ऐकतांच ती उल्हसित झाली. एकनाथ व विठ्ठल यांच्या रुक्मिणीस्वयंवरांत कीर्तिनामा ब्राह्मण किंवा कीर्तिनामा नटश्रेष्ठाचा उल्लेख असला, तरी नरेंद्रानें जीं निरनिराळ्या देशांच्या राजांचीं वर्णनें केलीं आहेत तीं त्यांत नाहींत. नरेंद्राच्या रुक्मिणीस्वयंवराचा हा एक उल्लेखनीय विशेष असून त्यावरून त्याचें रचनाचातुर्य चांगलें प्रत्ययास येतें. संगीतकला व वास्तुकला यांच्यासंबंधीं नरेंद्राला उत्तम ज्ञान होतें असें प्रस्तुत काव्यावरून दिसतें. रुक्मिणीस्वयंवरांत जागोजागीं आलेलीं निसर्गाचीं वर्णनें बहुविध व प्रकारांचीं आहेत. प्रतिपदेपासून तों पौर्णिमेपर्यंत चांदण्याच्या वाढण्यावर, कणीस तयार होऊन त्यानंतर पुढें सकाळ धान्याची रास पडेपर्यंतच्या अवस्थेची जी कल्पना केली आहे ती सुंदर नाहीं असें कोण म्हणेल ! (ओ. ४८९–९१) याशिवाय 'कीं चंद्र नव्हे तें स्वेनदीपः मासावि सावळें तें श्रीकृष्णाचें रूपः वरि टाकौनि पाहों आलें स्वरूपः श्रीचक्रधराचें (५००) कीं गोपिनाथु जोडानिया नौरंगः स्वर्गीचिया मिनल्या ताराः गगनमधें मोतियाचा चाउंमराः पुंजिल्ला निळोत्पळीं (५०२)' हें वर्णन सरस आहे. उपमा, उत्प्रेक्षा, दृष्टांत, रूपक व अपन्हुति या अलंकारांची योजना विपुल असून रसिकांना मोहविणारी आहे. रुक्मिणीच्या विरहावस्थेचें वर्णन तसेंच तिनें लिहिलेली प्रणयपत्रिका यांत भावनाचा परिपोष अगदीं उत्तम झाला आहे. विरहोपचारांत आलेल्या कल्पनाविलास व इतरत्र आलेली रसोत्कटता या दोन्ही दृष्टींनीं रुक्मिणीस्वयंवर हृद्य बनलें आहे. रामदेवराव जाधवाच्या दरबारांत नरेंद्रानें हा ग्रंथ वाचला असतां त्यांना तो इतका आवडला कीं त्यांनीं ग्रंथाचा मागणी करून त्यांत शेवटीं आपलें नांव घालण्यास मागितलें ! या प्रकारानें नरेंद्राच्या मनीं इतकें वैराग्य आलें कीं त्यानें गृहस्थाश्रम सोडला व नागदेवाचार्यांकडे येऊन संन्यासदीक्षा घेतली.

शिशुपालवध व एकादशस्कंध :—सुप्रसिद्ध सातीं ग्रंथांत भास्करभट्ट बोरीकर उर्फ कवीश्वर यांचा शिशुपालवध व एकादशस्कंध अथवा उद्धवगीता

याचा समावेश होतो. याचें कारण या ग्रंथात असलेले काव्यगुण आणि भास्कर भट्टाचें महानुभाव पंथातील तृतीय आचार्यत्व. शिशुपालवध व उद्धवगीता हीं काव्यें अनुक्रमें शके ११९५ व ११९६ सालीं लिहिलीं गेलीं असल्यानें तीं ज्ञानेश्वर पूर्वकालीन होत अशी समजूत बरेच दिवस होती. परंतु महानुभावीय वाङ्मयाचे चिकित्सक संशोधक प्रा. वि. भि. कोलते यांनीं ही समजूत सर्वस्वी चुकीची असल्याचें आता सिद्ध केलें आहे.[1] त्यांच्या मते हीं काव्यें शके १२२८ ते १२३१ च्या आत लिहिलीं गेलीं असावींत. शिशुपालवध हें मराठींतील पहिलें ललित काव्य आता न ठरताना, हा मान नरेंद्र कवीच्या रुक्मिणी स्वयंवराकडे जातो. तें कसेंहि असलें तरी काव्यदृष्ट्या कवीश्वर भास्करचे दोन्ही ग्रंथ पहिल्या श्रेणीचे आहेत यात शंका नाहीं. शिशुपालवधाची कथा भारतात, हरिवंशात व भागवतात आली आहे. तिच्याच आधारानें भास्करभट्टानें आपलें काव्य रचिलें असलं, तथापि त्याला काव्यरचनेला खरी स्फूर्ति सुप्रसिद्ध माघ कवीच्या शिशुपाल वधावरून उपलब्ध झालेली दिसते. नारदागमन, द्वारकावर्णन, ऋतुवर्णन, जलक्रीडावर्णन, युद्धवर्णन इत्यादि प्रसंगीं माघाच्या काव्याची सतत आठवण होण्याजोगे साम्य दोन्ही काव्यात आहे. असें असलें तरी हे सर्व प्रसंग भास्करानें आपल्या स्वतंत्र व सुंदर उपमा उत्प्रेक्षादि अलंकारांनीं सजविले आहेत. बलराम, श्रीकृष्ण, उद्धव यांचीं स्वभावचित्रें माघापेक्षा कितीतरी पटीनें भास्करानें चांगलीं रंगविलीं आहेत. याशिवाय नारद व उद्धवाचा विनोद, श्रीकृष्णरुक्मिणीचा प्रेमकलह, विरहिणी गोपींचीं वर्णनें हा सर्व भाग भास्करकवीच्या स्वतंत्र प्रतिभेचा विलास म्हणून दाखविता येईल. शिशुपालवधात हास्य व वीर हे रस आले आहेत परंतु त्यात खरा बहार रसराज शृंगाराचीच होय. भास्करानें या रसाचा परिपाक अगदीं तन्मयतेनें केला आहे. जलक्रीडा संपल्यानंतर बाहेर येऊन देवांगनांनीं आपापले मोकळे केस बांधले त्यावेळीं केसांतील पाण्याचे थेंब त्यांच्या नितंबावर पडू लागले. त्यावर भास्करानें "नितंब आलिंगना सुखावलं

[1] भास्करभट्ट बोरीकर, पृ. २६

भावता आमुवें गाळों लागे । तेंवि केशकलाप मीरवले उदकबिंदुन्वा (७२१)" अशी रमणीय उत्प्रेक्षा केली आहे

शिशुपालवध काव्यानंतर भास्करानें उद्धवगीता ऊर्फ एकादशस्कंध हें काव्य रचिलें. या काव्यानीत साम्प्रदायिक माहिती आहे ती अशा प्रकारची शिशुपालवध काव्य रचून झाल्यावर कवीनें ते महानुभाव पंथाचे द्वितीयाचार्य नागदेवराम (भानदेवव्यास) यांस वाचून दाखविलें. त्यावेळीं ते म्हणाले, "भटो हा मधु निका जाला. परी नीवृत्ताजोगा नव्हेचि. प्रवृत्ताजोगा जाला " त्यावर मग कवीनें एकादशस्कंधाची रचना करून ती आचार्यांस दाखविली तो परीसूनि नागदेवव्यासी म्हणितलें. आता होए कवीस्वर हें हा आता निवृत्ताजोगा जाला. ऐसें म्हणोनि थोर तोखले ॥ वृद्धाचार ९ ॥ व्यासानीं रचिलेल्या श्रीमद्भागवताच्या अकराव्या स्कंधाच्या आधारें भास्करकवीनें उद्धवगीतेची रचना केलेली आहे. 'एकादशीं सरिसीं' म्हणुनी साहित्य देशीः मिया आणारूं केलें जगासि ज्ञान अमृताचें (८२६)' असे खुद्द कवीच सांगत असला, तरी मूळग्रंथात त्यानें न्यूनच संक्षेप व विस्तार केला आहे पहिली १ ते १० प्रकरणें, ६४ ते ८० व १०३ ते १०७ हीं प्रकरणें मुळात नाहींत ऋष्यशृंगाचें कथानक व उद्धवाचा शोक हीं प्रकरणें विस्तारचें सुंदर नमुनें म्हणून दाखविण्याजोगी आहेत. उद्धवगीतेंत आलेलें तत्त्वज्ञान हें महानुभावीय सिद्धांत स्वरूपाला धरून असेच आहे. नागदेवराम याच्या शके १२०६ मध्यें रचिलेल्या 'मूर्तिप्रकाश' नामक तत्त्वज्ञानप्रधान काव्याचा प्रस्तुत काव्यावर विशेष परिणाम झालेला स्पष्ट दिसतो. दोन्हीं काव्यात साम्यस्थळें पुष्कळ आहेत [१] हें काव्य तयार करीत असताना कवीला आत्मविश्वास किती दांडगा वाटत होता तो पुढील ओव्यांवरून दिसतो. "पिळिलेया चंद्रबिंब सुटति अमृतधारांचे कंदें तैसे फुटति तुम्ह नवरसाचे ॥३०॥ ऐसिये कवितालत ब्रह्मविद्येचीं फुलें दिसति पाकतें तरि पसरतेनि हात कवण न तोडी ? ॥३१॥ ब्रह्मविद्येचेनि कसें कामनरया माझनीं दिसे तरि कवणाचें मन आपैसें

१ भास्करभट्ट बोरीकर, प्र ६ पृ १८०-१८६

अभिळाषु न करा ? ॥३४॥ तैसें साहित्याचा राणी शांतिरसा अंतरंग आणी तार माझी पवित्र आणि करुण नाईके ? ॥३५॥" उद्धवाचा शोक ५८ ते १५३ ओव्यांत आला असून तो हृदयाला चटका लावणारा आहे. उद्धव म्हणतो, "का आझुई हृदय न फुटे प्राणतनु न तुटे ? चाळाता न फुटे या क्लेशगचा ॥१४७॥ तो मृत्यु काई जाला ? का मात वीसरला ? किं हाथिएरू मोडला अतकाचा ? ॥१५०॥" ऋष्यशृंगकथानकाच्या रूपानें पुन एकदा याहि काव्यांत भास्करकवीने त्याला आवडणाऱ्या शृंगाररसाची मेजवानी वाचकांना घातली आहे. मुळात एक श्लोक असूनहि भास्करानें त्यावर सुमारे पन्नास ओव्यांचे शृंगारिक कथानक तयार केलें आहे

ज्ञानप्रबोध —पंडीत विश्वनाथ बाळापूरकर यानें हा ग्रंथ शके १२५३ मध्यें रचिला भगवद्गीतेच्या तेराव्या अध्यायांत अमानित्वादि जीं ज्ञानाचीं लक्षणें सांगितलीं आहेत, त्यांच्या स्पष्टीकरणार्थ एकशे पंचवीस ओव्यांचें हें लहानसें पण स्वतंत्र काव्य करण्यांत आलें आहे

सह्याद्रिवर्णन —(शके १२५४) हा ग्रंथ रवळो व्यास उर्फ रायवोपाध्ये यानीं लिहिला असून त्यांत श्रीदत्तात्रेयाचें लीलाचरित्र आलें आहे

श्रीऋद्धिपुर वर्णन : हें काव्य पंडीत नारायण व्यास बहाळिये यानीं शके १२८० मध्यें रचिलें महानुभावानीं पवित्र मानलेल्या ऋद्धिपुर क्षेत्राचें व तत्रस्थ देवतांचें वर्णन यांत आलें आहे. महाराष्ट्रांतील वारकऱ्यांना पंढरपूर क्षेत्राविषयीं जें प्रेम वाटतें, तें प्रेम महानुभावांना ऋद्धिपुराविषयीं वाटतें. प्रस्तुत काव्य हें मुख्यत स्थलवर्णनात्मक असूनहि कवीनें त मार्दवपूर्ण व रसाळ बनविलें आहे. ज्ञानेश्वरींत जशी उत्प्रेक्षांची मालिका लागलेली असते, तशी याहि काव्यांत पाहावयास सापडते विशेषत 'आपुलेनि प्रसन्नपणें दृष्टीसि माडीति धरणें अमृता आणीति उणें गोडिया आगीचिया ॥१४॥' अशा ओंव्या ज्ञानेश्वरीची आठवण करून दिल्याखेरीज रहात नाहींत. काव्याची रचना ओवीवृत्तांत असून, ओवीसदृश सहाशेपंचेचाळीस आहे मुरुवातीला धरा वाचा, नागांबिका, नागदेवा-

चार्य याना कवीनें वंदन करून नंतर ऋद्धिपूर क्षेत्राच्या वर्णनाला आरंभ केला आहे. त्यात 'मातुरवामें शोभली: तिये भेटे जैवि माउली: असों हे तैसी परि जाली: श्रीऋद्धिपुर देखिलेआ ॥ ४८ ॥' अशा प्रकारचें मुरवानीलाच भावपूर्ण वर्णन आहे. यात आलेलीं निसर्गाचीं वर्णनें अत्यंत बहारीचीं असून श्रीगोविंदप्रभूच्या मूर्तीचें वर्णन अत्यंत सूक्ष्म व सरस आहे.

महानुभावीय वाङ्मय विपुल आहे. या वाङ्मयाचें स्वरूप य. खु. देशपांडे यांच्या 'महानुभावीय मराठी वाङ्मय' या पुस्तकावरून बऱ्याच अंशानीं लक्षांत येऊं शकतें हें वाङ्मय अद्यापि सर्व छापलें गेलेलें नाहीं. श्रीचक्रधराच्या ह्यातींत व नंतर सुमारें पन्नास वर्षेंपर्यंत ललित वाङ्मय बरेंच तयार झालें त्यानंतरच्या काळांत टीकात्मक, विवरणात्मक, तत्त्वज्ञानपर साहित्यच अधिक तयार झालें. महत्त्वाच्या ग्रंथाचा व ग्रंथकाराचा उल्लेख यापूर्वी वर करण्यात आल्याच आहे. येथें त्यापैकीं न उरलेल्या थोड्यांचा निर्देश करतों.

दृष्टांतपाठकर्ते केशवव्यास यांचा मूर्तिप्रकाश ( शके १२०६ ) नांवाचा ओंवीवृत्तांत रचलेला ग्रंथ असून त्यांत श्रीचक्रधरांचें वर्णन आहे. केशव व्यासांनीं रत्नमाला नावाचें स्तोत्र संस्कृतांत लिहिलें असून त्यातहि चक्रधराच्याच लीला वर्णिल्या आहेत. केशव व्यासांचे बंधू गोपाळ पंडित ऊर्फ आनेराज व्यास (मृत्यु शके १२६२) यानीहि सूत्रपाठ तयार केला असून तोहि महानुभावीय लोक आदरानें वाचतात. यांचे दृष्टांतलक्षण व दृष्टांत व्याख्या हे दोन मराठी गद्यग्रंथ आणि लक्षणरत्नाकर व द्वात्रिंशल्लक्षण नांवाचे दोन संस्कृत ग्रंथ आहेत. यांचा समकालीन असा मावे देवव्यास नावाचा ग्रंथकार होऊन गेला. यानें पूजा अवसर पाचापुरचें मूर्तिज्ञान, नामाचें दस ठाव व साठ प्रश्न, असे चार गद्यग्रंथ लिहिले आहेत. नागदेवाचार्यांची नात नागंबा हिनें सूत्रमालिका, शय्यापालन, दृष्टांत व्याख्या, दुर्गमा प्रमेय, व उद्धरणपट असे चार गद्यग्रंथ लिहिले आहेत. गोपाळ पंडीत यांचे शिष्य हयग्रीव व्यास ( मृ. श. १२४६ ) यानीं श्रीमद्भागवताच्या दशमस्कंदावर २८० श्लोकांची मराठी टीका केली असून तिचें नांव 'गद्यराज' आहे. पंडित भीष्माचार्य यानीं लक्षण रत्नाकर भाष्य, मार्गमंजरी नावाची मराठी

पुरुषें व दिनकर प्रवधादि संस्कृत ग्रंथ रचिले आहेत व्याकरणाकार नामविभक्ति आणि भाषाशास्त्रावर पञ्चवार्तिक असे आणखी दोन ग्रंथ यानीं केले आहेत. दुर्बोध शब्दांचे अर्थ सांगणारा 'टीप' नावाचाहि ग्रंथ याचाच आहे. गुर्जर शिवव्यास आणि सिद्धांते हरिव्यास या उभयतानीं श्रीचक्रधराच्या मुखातून निघालेल्या सूत्ररूप वाक्याना आधारास घेऊन त्यावर आचार, विचार व लक्षण यावराल तिन्ही स्थळांची बांधणी शके १३२५ च्या सुमारास केली.[1] गीतेवर अनेक महानुभावीय पंडितानीं मराठी व संस्कृत टीकापर ग्रंथ लिहिले आहेत. अशा टीकात लक्ष्मिंद्री गीताटीका, गीतार्थबोधिनी ऊर्फ भिंगारकरी, गोपाळदासी, गोपी भास्करकृत भास्करी टीका, पंडीत शाङ्गधर पुसदेकरकृत कैवल्यदीपिका या गीताटीका विशेष प्रसिद्ध आहेत. भगवद्गीतेप्रमाणें 'रुक्मिणीस्वयंवर' हा महानुभावीय कवीचा आवडता विषय असून त्यावर सुप्रसिद्ध नरेंद्र कवीखेरीज इतरहि कवींनीं रचना केली आहे. अशात सतोषमुनि कृष्णदास ( १५ वें शतक ) याचे ओवीबद्ध १८ अध्यायी रुक्मिणी स्वयंवर विशेष प्रसिद्ध आहे. यानें आपल्या काव्यात मराठी भाषेची खूप प्रशसा केली आहे

महानुभावीय ग्रंथकार आपल्या वाङ्मयाची विभागणी श्रुति ( श्रीचक्रधराचे समकालीन अथवा प्रत्यक्ष त्याच्या मुखातून निघालेले शब्द), स्मृति (नागदेवाचार्यासबंधीं अथवा तत्कालीन ग्रंथ), वृद्धाचार (परशुरामाचार्य इत्यादिकाचे संबंधीं अथवा तत्कालीन आचारविचारासबंधीं ग्रंथसमूह), मार्गरूढि ( गुर्जर शिवव्यासाच्या काळातील ग्रंथ ) आणि वर्तमान (१६ व्या शतकानतरचे ग्रंथ) अशी करितात

जिच्या उल्लेखावाचून महानुभावी साहित्याला पूर्तता येणें अशक्य अशा महदाइसेचा विचार करून हें प्रकरण संपवू या. आद्य मराठी कवयित्री म्हणून महदाइसा ओळखिली जाते. रूपाई व महदबा अशीं हिचींच आणखी दोन नावें आहेत. महानुभाव पंथाचे संस्थापक श्रीचक्रधर याचा मुख्य शिष्य नागदेवाचार्य

१ महानुभाव मराठी वाङ्मय, य खु देशपांडे पृ. ५२

याची ही चुरस वाढीस. चक्रधराच्या शिष्यमालिकेत हिचीहि गणना होते. हिनें रचलेल्या धवळ्याबद्दल हिची मुख्यतः प्रसिद्धी आहे. धवळ्याचा अर्थ (धव+ळ) लग्नात गावयाची वरविषयक गीते असा होतो. श्रीचक्रधराचे गुरु श्रीगोविंदप्रभु यांच्या सांगण्यावरून महदाइसेनें धवळ्याचा पूर्वार्ध रचिला, आणि लीळाचरित्रकार म्हाइंभट व लक्ष्मींद्रभट यांच्या सांगण्यावरून व साहाय्यानें धवळ्याचा उत्तरार्ध रचिला. धवळ्याचा पूर्वार्ध शके १२०८ पूर्वी म्हणजे ज्ञानेश्वरी-रचनेपूर्वी चार वर्षे तयार झाला. उत्तरार्ध शके १२३४ पूर्वी केव्हा तरी रचिला गेला. धवळ्यात रुक्मिणीस्वयंवराची कथा गाण्यात आली आहे. साधेपणा व सरळपणा हे या काव्याचे विशेष होत. अलंकाररहित काव्यहि कसें चित्तवेधक बनूं शकतें, त्याचें प्रस्तुत धवळे हें उत्तम उदाहरण होय. कृष्णदर्शनानें बेभान बनून महालावरून उडी टाकावयास निघणाऱ्या तसेंच रुक्मवताऱ्याठीं कृष्णाला आवडणारे खाद्यपदार्थ स्वतः करणाऱ्या रुक्मिणीचें आणि तिच्या सख्यांचें यात आलेलें वर्णन बहारीचें आहे. हे धवळे सयमक असून त्यात दर कडव्यात चार चरण आहेत. त्याना गणमात्रांचाच नव्हे तर अक्षरसंख्येचाहि निर्बंध नाहीं. वृत्तशैथिल्य, विस्कळित रचना, पुनरुक्ति व ढिलाईचीं यमकें हे प्रस्तुत काव्यातील ठळक दोष होत. भाषा अर्थात् जुनी मराठी म्हणजे तेराव्या शतकातील ज्ञानेश्वरी इत्यादि ग्रंथातील भाषेसारखी आहे. मातृकी रुक्मिणीस्वयंवर हें महदाइसेनें रचिलेलें दुसरें काव्य असून तें ओवीवृत्तात आहे. यातील ओव्यांची सुरुवात अ पासून ह पर्यंतच्या वर्णांनीं किंवा मातृकानीं साधली असल्यानें याला मातृकीरुक्मिणीस्वयंवर असें नाव देण्यात आलें आहे. धवळ्याप्रमाणेंच यातील विषय रुक्मिणीस्वयंवर हा असला तरी धवळ्यापेक्षा हें काव्य निःसंशय अधिक सरस आहे. अगदीं थोड्या शब्दात वाचकाच्या मनावर कायमचा ठसा उमटवितील अशी 'उधातु क्षीरोदकं कासे वेढियेला परीवटी शोभला. रुक्मिणीचा ॥९२॥ उदीत काचोळी लेइली रुक्मिणी ठीकल्या लेणी प्रभा फाके ॥९३॥ डोळे अश्रुजळीं देह न सभाळीः झेंप तीये वेळीं घालू पाहे ॥३८॥ '—याप्रकारचीं सुंदर शब्दचित्रें यांत आहेत.

## ४

# ज्ञानेश्वर[१]

ज्ञानेश्वराच्या ग्रंथकर्तृत्वाचें मूळ त्यांच्या असामान्य जीवनांत आणि त्यांच्या काळाच्या विलक्षण लोकस्थितींत आहे. त्याना आणि त्यांच्या कुटुंबातील सर्वांना लोकांकडून खूपच त्रास झाला. त्यांचे वडील विठ्ठलपंत उद्वेग, वैराग्य आणि ईश्वरप्रेमाच्या भरात पत्नीची अर्धवट संमति मिळवून काशीला गेले व तेथें रामानंद (श्रीपाद) स्वामीकडून त्यांनीं संन्यास घेतला रामानंदांच्याच आज्ञेवरून अशास्त्रीय संन्यासाचें परिमार्जन करण्याच्या हेतूनें त्यांनीं परत गृहस्थाश्रम स्वीकारला. या कारणानें प्रथम आळंदीकर ब्राह्मणांनीं आणि नंतर आपेगांवकर ब्राह्मणांनीं त्याना वाळींत टाकलें. वाळींत टाकणें या गोष्टीचा अर्थ आज आपल्या लक्षांत येणें शक्य नाहीं. ज्ञानेश्वरांच्या काळीं एखाद्याला वाळींत टाकणें म्हणजे सर्व बाबतींत त्याच्यावर संपूर्ण बहिष्कार टाकणें असे समजलें जाई रोगजंतूपासून दूर राहण्याची जी आज आपली वृत्ति आहे, ती त्यावेळीं वाळींत टाकलेल्या व्यक्तींच्या बाबतींत अमलांत येई. वाळींत टाकलेल्या व्यक्तींना नुसते दूरच ठेवीत असत असे नाहीं, तर कुजकें बोलून त्याना मारहाणहि करण्यांत येई. विठ्ठलपंत सर्व प्रकारचा छळ मुकाट्यानें सहन करून, धर्मग्रंथाच्या वाचनांत आणि ईश्वर-भजनांत वेळ घालवीत असत. अशाच स्थितींत त्याना चार अपत्यें झालीं. तींच अनुक्रमें निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान आणि मुक्ताबाई हीं सुप्रसिद्ध भावंडें होत. यांच्यावरहि बहिष्कार पुकारण्यात येऊन निवृत्ति, ज्ञानदेव आणि सोपान यांची मुंज करण्याचीं वयें होऊनहि त्यांची मुंज यथाविधि होईना. तेव्हां विठ्ठलपंतांनीं त्र्यंबकेश्वरी जाऊन गैनीनाथाकडून सर्व कुटुंबाला नाथपंथाची दीक्षा

---

१ जन्म आळंदी येथें ११९७ (जनाबाईंच्या अभंगा प्रमाणें शके ११९३) श्रावण वद्य ८, समाधि शके १२१८ कार्तिक वद्य त्रयोदशी आळंदी येथें

देवविली. आळंदीला परत आल्यावर त्यांनीं पुन: एकदा तेथील ब्राह्मणांना आपल्यावरील बहिष्कार काढून घेण्याची व कांहीं प्रायश्चित्त असेल तर तें मागण्याची विनंति केली. धर्माचा फक्त शब्दार्थच जाणणाऱ्या ब्राह्मणांनीं त्यांना देहांत प्रायश्चित्त सुचविलें. आपल्या अपत्यांच्या कल्याणार्थ विठ्ठलपंत व रुक्मिणीबाई यांनीं या प्रायश्चित्ताचा स्वीकार करून व प्रयागक्षेत्रीं जाऊन गंगेला आपले देह अर्पण केले. या भयंकर घटनेमुळें निवृत्तिज्ञानदेवादि बालकांच्या कोंवळ्या अन्तःकरणावर किती जबरदस्त परिणाम झाला असेल याची कल्पनाच केलेली बरी. आलेल्या बिकट परिस्थितीला मन घट्ट करून त्यांनीं तोंड दिलें आणि वडिलांनीं दिलेल्या ज्ञानांत आपल्या अध्ययनानें भर घातली. फिरून एकदा त्यांनीं ब्राह्मणांना आपणाला पावन करून घेण्याची विनंति केली. यावेळीं या ब्राह्मणांनीं प्रति काशी समजल्या जाणाऱ्या पैठणक्षेत्रीं जाऊन तेथील ब्राह्मण कडून शुद्धिपत्र घेऊन येण्यास त्यांना सांगितलें. हें शुद्धिपत्र अर्थातच सहजासहजीं मिळालें नाहीं. त्याकरिता रेड्याच्या तोंडून वेद वदविण्यासारखे कांहीं चमत्कार ज्ञानदेवांना करावे लागले. आणि मग या चमत्कारामुळें कर्मठ ब्राह्मणांनीं त्यांना नमस्कार घालून शुद्धिपत्र लिहून दिलें. यानें या भावंडांवरील बहिष्कार उठला तरी त्यांच्या काळजांतील जखमा तशाच राहिल्या. धर्माची लोकांकडून होत असलेली विटंबना पाहून तीं अंतर्मुख बनलीं. धर्माचा भावार्थ न समजतां केवळ तांत्रिक कर्में करणाऱ्या लोकांची त्यांना किळस आली. असलीं धर्मकृत्यें करण्यानें मनुष्य माणुसकीला विसरतो, शुष्क व रूक्ष बनतो आणि खऱ्या ईश्वरी प्रेमाला आंचवतो. चमत्कारामुळें आणि सात्त्विक वर्तनामुळें आपल्या भोंवतीं जमा होणाऱ्या लोकांना खरा धर्म म्हणजे कोणता तो कळावा म्हणून ज्ञानेश्वरांनीं आपल्या ग्रंथाची रचना केली.

ज्ञानेश्वरकालीन विस्कळित लोकस्थिति संबंधानें इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे म्हणतात[1] "यादवांच्या अमदानींत म्हणजे इसवीच्या तेराव्या

१ वि. का. राजवाडेकृत मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड ८ वा. (१९०३) पृ ४६–४८

शतकाच्या उत्तरार्धात मराठ्यांचें सर्व लक्ष परमार्थाच्या नावावर ऐहिक उपभोग घेण्याकडे लागलें होतें. तेराव्या शतकातील अत्यंत मोठा असा मानिलेला ग्रंथ म्हटला म्हणजे हेमाद्रीचा[1] चतुर्वर्गचिंतामणि हा होय. ह्या ग्रंथात दर दिवसाला व दर तिथीला दहा दहा पांच पांच व्रतें सांगितलीं आहेत व त्या त्या व्रताला कोणत्या देवाची कोणतें पक्वान्न करून व किती ब्राह्मण घालून प्रीति संपादन करावी ह्याचा श्रुति स्मृति व पुराणें ह्यांतून उतारे देऊन, गंभीरपणें निर्णय केला आहे. हेमाद्रीच्या व्रतखंडावरून पाहतां वर्षाच्या ३६५ दिवसांत एकंदर २००० व्रतें व्हावीं असा अंदाज होतो. लोकांची व्रतें करण्याकडे, ब्राह्मणभोजनें घालण्याकडे, पक्वान्नें खाण्याकडे व तद्वारा मोक्ष मिळतो अशा मतांकडे अतोनात प्रवृत्ति असल्याविना हेमाद्रीनें हीं व्रतें केवळ पांडित्य दाखविण्याकरितां सांगितलीं असतील हें संभवत नाहीं. एकंदरीं दोन हजार व्रतें ज्या ग्रंथात सांगितलीं आहेत असा पृथ्वीवरील दुसऱ्या कोणत्याहि भाषेंत कोणत्याहि काळीं एकहि ग्रंथ अद्यापपर्यंत निर्माण झाला नाहीं ! ..सिंघणादि वीरांच्या विजयानें लोक अत्यंत धनसंपन्न होऊन व्रतें, उद्यापनें करण्याच्या मिषानें सुखैकपरायण व विलासनिमग्न झाले .. परमार्थाच्या नावाखालीं ही जी सुखैकपरायणता वाढत होती तिचा फायदा घेऊन मुसलमानांनीं मराठ्यांचा पराभव केला.'

याशिवाय जैन, लिंगायत व महानुभाव ह्यांच्याकडून वैदिक धर्म पोखरण्याचें काम याच सुमारास चालू होतें. जैनांनीं अहिंसा तत्त्वाचा अतिरेक करून लोकांना दुर्बल बनविलें. लिंगायतांनीं वर्णाश्रम धर्म अमान्य ठरवून वेदप्रामाण्य धुडकावून दिलें आणि महानुभावांनीं संन्यस्तवृत्तीवर भर देऊन आणि द्वैत प्रतिपादून लोकांना सामाजिक कर्तव्य करण्यात उत्तेजन दिलें नाहीं. अहिंसा, वैराग्य, द्वैतवाद, रूढिभंजन व रूढिपालन किंवा कर्मठपणा याचा एकांतिकपणा धर्माच्याच नावावर होत असलेला पाहून ज्ञानेश्वरांना वाईट वाटलें. स्वतःच्या दुःखानें आधीच मृदु

१ हा सुप्रसिद्ध पंडित कृष्ण, महादेव व रामचंद्र या यादवराजांच्या पदरीं करणाधिप या मोठ्या हुद्यावर होता.

बनलेल्या त्याच्या अन्तःकरणात लोकांची होत असलेली अवनति पाहून करुणा उत्पन्न झाली, आणि बहुजन समाजाला सन्मार्ग दाखवायला ते उद्युक्त झाले. लोकांना धार्मिक क्रिया अवगत होत्या, पण त्या क्रियांतील भावार्थ कळत नव्हता. लोक गीता वाचीत होते, पण तिच्यांतील रहस्य किंवा भावार्थ समजल्याशिवाय. लोकांची वेदावरील निष्ठा अढळ रहावी, त्यांनी स्वतःचा संसार नेटकेपणानें करावा, सामाजिक कर्तव्यें उल्हसितवृत्तीनें करावींत, उचनीचपणाच्या कल्पना सोडून सर्वत्र परमेश्वर आहे ही भावना अंगीं बाणून घ्यावी म्हणून श्रीमद्भगवद्गीतेचा भावार्थ स्पष्ट व सुबोध करून सांगणारी भावार्थदीपिका नांवाची टीका ज्ञानेश्वरांनीं मराठींत लिहिली. हीच ती सुप्रसिद्ध ज्ञानेश्वरी होय.

ज्ञानेश्वरी हें कांहीं श्रीमद्भगवद्गीतेचें मराठींत केलेलें सुबोध भाषांतर नव्हे. तसें असतें तर गीतेच्या सातशें श्लोकांकरितां ज्ञानेश्वरांनीं फार तर एक हजार ओव्या रचिल्या असत्या. ज्ञानेश्वरींत नऊ हजारांवर ओव्या आहेत. आणि असें असून ज्ञानेश्वर या विस्ताराला भावार्थच म्हणतात. याचा अर्थच असा कीं, गीतेचा जो भाग किंवा जे श्लोक भावार्थरूप त्यांना वाटले, त्या भागाचें किंवा श्लोकांचें निमित्त करून ज्ञानेश्वरांनीं स्वतःचीं ठाम बनलेलीं मतें लोकांना समजतील, पटतील, रुचतील अशा शैलींत मांडिलीं. गीतेंत ज्ञान, कर्म भक्ति आणि योग यांच्यावर विवेचन आलें असलें तरी ज्ञानेश्वरांनीं त्यांपैकीं ज्ञान, कर्म आणि योग यांच्यावर विशेष भर दिलेला आढळतो. आंधळ्या भक्तिपेक्षा डोळसभक्ति त्यांना अधिक प्रिय होती. ते स्वतः योगी असल्यानें सहाव्या अध्यायांत मूळ गीतेंत थोडेसें निमित्त सांपडतांच त्यांनीं स्वतःच्या अनुभवांतील हठयोगाची सर्व प्रक्रिया मोठ्या बहारीनें वर्णन केली आहे. हीच तऱ्हा कर्मयोगाची. सभोंवतालच्या कर्तव्यपराङ्मुख बनलेला समाज पाहून आणि त्याचें निमित्त करून स्वधर्म आणि निवृत्ति या नांवाखालीं त्यांनीं प्राप्त आणि विहित कर्तव्य करण्यावर भर दिला आहे. ईश्वराला "स्वकर्म कुसुमाची पूजा। केली होय अपारा तोषालागीं" असें त्यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे. ज्ञानेश्वराच्या काळीं महाराष्ट्रांत प्रत्यक्ष नसलें तरी बाकीच्या हिंदुस्थानांत धर्म आणि देवळें यांच्यावर मोठें संकट मुसलमानांनीं

आणिलें होत. हे सकट महाराष्ट्रामध्ये चालून येईल अशी साधार भीति ज्ञानेश्वरांना वाटत होती. क्षुद्र देवता आणि मत याच्या नादीं लागलेला समाज विस्कळित बनला होता हा समाज सुसघटित व्हावा, एकरूप व्हावा म्हणून ज्ञानेश्वरांनी कर्मयोगावर सहजच भार दिला या बाबतीत सुप्रसिद्ध व चिकित्सक विद्वान प्रो न र. फाटक म्हणतात,[१] "ज्ञानदेवांनीं गीतेवर टीका लिहिताना कर्मयोगाचे निरूपण इतके ठासून केले आहे कीं ते निवृत्तिमार्गी होते कीं प्रवृत्तिमार्गी, हा वादच खरोखरी उपस्थित होऊ नये ..कर्म टळत नाहीं, ते करावच लागते तर ते कसे करावे हा प्रश्न ज्ञानेश्वरांनीं स्वधर्म या एका शब्दानें सोडविला आहे. तिसऱ्या अध्यायामध्यें या शब्दाचा त्यांनीं पुन पुन' उच्चार केला आहे देवे अनुक्रमाधारें। स्वधर्म जो आचरे। तो मोक्ष तेणें व्यापारें। निश्चित पावे ॥८०॥ कुळ, जाति, देश, अधिकार, परंपरा, वगैरे गोष्टींचा अंतर्भाव अनुक्रम शब्दाच्या अर्थात करावा लागतो. अशा अनुक्रमाच्या आधाराचा जो स्वधर्म त्याचें आचरण केल्यानें माणसाला निश्चित मोक्ष मिळतो असें ज्ञानेश्वरांचें येथें प्रतिज्ञावाक्य आहे. तुम्हा वर्णा विशेषंवीं। आम्हीं हा स्वधर्म निर्मिला असे ॥ (३-८८)" याशिवाय अजातवाद आणि मायावाद याचा स्वतत्रपणें पुरस्कार ज्ञानेश्वरांनीं दुसऱ्या अध्यायात केला आहे यावरून हें स्पष्ट होईल कीं, ज्ञानेश्वरांनी अद्वैतवाद, अजातवाद, मायावाद, कर्मयोग, ज्ञानयोग व हठयोग यासबधीं आपलीं स्वतत्र व ठाम मतें ज्ञानेश्वरींत प्रतिपादन केलीं आहेत

शालिवाहन शके १२१२ मध्ये ज्ञानेश्वरीची रचना केल्यानतर ज्ञानेश्वरांनीं अमृतानुभव किंवा अनुभवामृत नावाचा स्वतत्र ग्रंथ लिहिला ज्ञानेश्वरी लिहिताना गीतेचें बधन थोडे फार होतेंच. परतु स्वत ची पूर्णाद्वैतविषयक मत नि संदेहपणे मांडायला ज्ञानेश्वरांना भरपूर वाव या ग्रंथात मिळाला अनुभवामृत हे नाव योगवासिष्ठातील अनास्तमलद्रूप नित्य च अनुभवामृत। अह नि शेषचक्राणि चिद्ब्रह्माहमलेपकम्॥ यो वा. ६ १० ७१ यावरून सुचलें असावें. सुमारे

१ ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी, १९४७, पृ. २५–२६

आठशें ओव्यांच्या या प्रधान ग्रंथाचा परब्रह्मविषयींचा अनुभव सांगितला आहे ज्ञानी पुरुषाला सर्वत्र चिद्‌द्वैताचा अनुभव येतो त्याच्या दृष्टीनें माया, अज्ञान व तन्मूलक विश्वाभास हीं अस्तित्वातच नसतात. परमात्मा, शिव, शक्ति आणि जीव यांचे ऐक्य, गुरु आणि शिष्य यांचें ऐक्य, ज्ञान अज्ञान यांतील भेद, सत् चित् व आनंद यांचें ऐक्य, अज्ञानखंडन, ज्ञानखंडन इत्यादि विषय यांत तत्त्वरूपानें वर्णिले आहेत. अन्वय आणि व्यतिरेक अशा दुहेरी पद्धतीनें मुख्यतः अद्वैताचेंच प्रतिपादन करण्यात आलें आहे. परतत्त्वाचे अंतिम व निरपेक्ष स्वरूप 'निजराचा आत्मभावो' (प्र. ७ १९२) या शब्दांत ज्ञानेश्वरांनी वर्णिलें आहे. एक भाग स्वप्न आहे, दुसरा घेतलेला नाहीं किंवा सर्वेंद्रियांनीं सर्व विषय घेतल्यानंतरचा जो क्षण आहे, अशा संधिकाळांत जी निरपेक्ष निर्विशेष अशी अवस्था असते तिला 'निजराचा आत्ममान', परतत्त्वाचें अंतिम स्वरूप म्हणता येईल

ज्ञानेश्वरांच्या स्फुटरचनेंत हरिपाठ (ओव्या २७,) चांगदेवपासष्टि (ओव्या ६५), नमन (ओव्या १०८), व अभंग (संख्या ९७२) यांची गणना होते. वारकरीमंडळांत हरिपाठाला मोठीच योग्यता आहे. चांगदेवपासष्टींत योगी चांगदेव यांना ज्ञानेश्वरांनीं जो उपदेश केला तो देण्यात आला आहे. दोन्ही ग्रंथांत भक्ति आणि पूर्णाद्वैत यांवर सुबोध विवेचन आलें आहे. ज्ञानेश्वरांनीं अभंग मधून मधून परंतु आयुष्याच्या शेवटीं मुख्यतः रचिले, असें समजलें जातें. यांशिवाय योगवासिष्ठ, उत्तरगीता प्राकृतगीता, पंचीकरण, गायत्रीटीका, शुकाष्टक, स्वात्मानुभव आणि समास हेहि ग्रंथ ज्ञानेश्वरांच्या नांवावर खपतात परंतु ते ज्ञानेश्वरांचे नाहींत, असें अधिकारी पुरुषांचें म्हणणें आहे.[1]

ज्ञानदेव एक होते कीं दोन होते, असा वाद मधून मधून निघत असतो, डॉ भांडारकर प्रभृति कांहीं पंडितांच्या मतें अभंग व हरिपाठ ज्ञानेश्वरीकर्त्या ज्ञानदेवांचे नसून त्यांचा कर्ता कोणी दुसरा ज्ञानदेव असावा ज्ञानदेव दोन होऊन गेले अशा पूर्वपक्ष सुधारक पत्रांतून इ सन १८९८ मध्यें भारद्वाज हे

१ श्रीज्ञानदेव, ले प्रो श वा दांडेकर, प्रकरण ४ थें

दोघण नाव धारण करून कै. भारदे यांनी सविस्तर केला होता.[1] ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेवपासष्टि व हरिपाठ हे ग्रंथ एकाच ग्रंथकाराचे निःसंशय दिसतात. यात आलेल्या विवेचनात एकसूत्रीपणा आढळतो स्फुट अभंगांचे तसे नाही. त्यांतील काही ज्ञानेश्वरीकर्त्या ज्ञानदेवाचे आहेत व दुसरे काही त्याचे नसावेत असे वाटते. दुसऱ्या ज्ञानेश्वराचे हे अभंग असावेत व मागाहून कोणीतरी ते सुप्रसिद्ध ज्ञानेश्वराच्या अभंगांत घुसडून दिले असावेत.

ज्ञानेश्वर हे महान् आत्मानुभवी संत व प्रखर तत्त्वज्ञानी होते. योगवासिष्ठ, उपनिषदे व शंकराचार्यांचे ग्रंथ यांचा त्यांनी गाढ अभ्यास केला होता. ज्ञानेश्वरींतील तत्त्वज्ञानाची बरीच घडण 'भाष्यकाराते वाट पुसतु' (१८-१७२२) म्हणजे आद्य[2] शंकराचार्यांच्या प्रथाधारे करण्यात आली आहे. असे असूनहि ज्या नाथपंथीय गुरुपरंपरेत ज्ञानेश्वराचे पणजे, आजे आणि गुरु व बंधू असे निवृत्तिनाथ वाढले त्या परंपरेचा त्याच्या तत्त्वज्ञानावर विशेष परिणाम होणे साहजिकच आहे. ज्ञानेश्वराचे पणजोबा त्र्यंबकपंत यांना गोरक्षनाथाकडून दीक्षा मिळाली होती व त्याचे आजोबा गोविंदपंत व वडीलबंधु निवृत्तिनाथ यांना गैनीनाथाकडून दीक्षा प्राप्त झाली होती. स्वतः ज्ञानेश्वरांना नाथपंथाची दीक्षा निवृत्तिथांनी दिली होती. हा नाथ पंथ पूर्ण अद्वैती व शिवोपासक असून गैनीनाथाच्या शाखेत कृष्णोपासना चालू असे. गुरुपरंपरेत प्राप्त झालेली अद्वया नंदाची अनुभूति हेच ज्ञानेश्वराच्या अद्वैतमताचें मुख्य कारण होय. "एक आत्माच सर्व रूपानी नटलेला आहे. शिवापासून तृणापर्यंत अथवा महादेवापासून मुंगीपर्यंत एक आत्माच स्फुरत आहे, किंबहुना विश्व व त्यात भरलेला आत्मा एवढें देखील द्वैत संभवत नाही, तर अवघा एक आत्माच आहे असे ज्ञानदेवाच्या पूर्णाद्वैताचें स्वरूप सांगता येईल."[3] उदाहरणार्थ :–

---

१ श्रीज्ञानदेव,

२ श्रीज्ञानेश्वराचें तत्त्वज्ञान, ले- डॉ श. दा पेंडसे, १९४१, प्रकरण तिसरें.

३ श्रीज्ञानदेव, ले श. वा दांडेकर, १९२२, प्र. सहावें.

तया आन्दयाचा मागा । न पडेचि दुसरा रेगा ।
जगें विश्वा अनेगा । भरले आहे ॥ अमृ. प्र ७।१४६

तेवीं शिरोनि पृथ्वीवरी । भासती पदार्थांचिया परी ।
प्रकाशे तें एकसरी । सविचि हें ॥ चांगदेवपासष्टी, ओ. १२

जालेंनि जगें मी झांकें । तरी जगत्वें कां न फाके ।
किळेवरी माणिकें । लोपिजे काई ॥ ज्ञाने. अ. १४. १२४

अळंकारातें आलें । तरी सोनेपण काइ गेलें ।
कीं कमळ फाकलें । कमळत्वा मुकें ॥ ज्ञाने. अ. १४-१२५

म्हणोनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें ।
तैसा नोहे उरितें । आघवें मीचि ॥ ज्ञाने. अ. १४-१२७

मी ये परीचा भूत भावनु । परि सर्व भुतांसि अभिन्नु ।
जैसी प्रभा आणि भानु । एकचि ते ॥ ज्ञाने. अ. ९-८६

हा आमुचा ऐश्वर्य योगु । तुवां देखिला कीं चांगु ।
आता सांगें काहीं एथ लागु । भूतभेदाचा असे कान ॥ ज्ञाने. अ. ९-८७

ब्रह्म खरें आहे व जग हें मिथ्या आहे, हा जो शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा मुख्य सिद्धांत आहे, तो ज्ञानेश्वरांना मनापासून मान्य नाहीं. ब्रह्म आणि जग असा वेगळेपणा ते मानीतच नाहींत. सर्वत्र एक आत्माच आहे असें ते मानतात. ज्ञानेश्वरांच्या मतानें जग हें अज्ञानकार्य-मायाकार्य नाहीं. ते शुद्ध अद्वैतवादी असल्यानें ब्रह्मच जगत् आहे असें मानतात. हाच ज्ञानेश्वरांचा चिद्वाद होय. “जगताचा निरास करावयाचा व ब्रह्म पाहावयाचें म्हणजे ज्ञानदेवांचाच दृष्टांत घ्यावयाचा तर चंद्राच्या कला सोडून काढून चंद्रबिंब पाहण्यासारखें आहे, अथवा ज्ञानेश्वरभक्त कै. गु. विष्णुबोवा जोग यांचा दृष्टांत घ्यावयाचा तर पेढा

सांगण्यासारखें आहे."[1] एकनाथ एकाजनार्दनाच्या आरतीतहि ज्ञानेश्वराचें मुख्य कार्य म्हणजे "प्रकट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें" असें आहे.

"आणखी एका मुद्याचा विचार करणें अवश्य आहे. ज्ञानदेव हे जगतास भ्रम म्हणावयास तयार नाहींत. याचा अर्थ ते जगत् सत्य मानतात, असा कदाचित् समजला जाण्याचा संभव आहे. परन्तु तशी वस्तुस्थिति नाहीं. जडवादी चार्वाक ज्याप्रमाणें जगतास सत्य मानतो, त्याप्रमाणें ज्ञानदेव काहीं मानीत नाहींत तथापि ते जगतास मायाकार्य म्हणावयास तयार नाहींत. सर्व विश्व हा आत्मच आहे असा त्याचा सिद्धांत आहे. विश्व एक वेगळें झालें, असें जर ते मानीत असते तर विश्व उर्फ जगत् सत्य अथवा मिथ्या हा प्रश्न उद्भवला असता. परन्तु विश्व आत्म्याहून काहीं वेगळें झालें असे ज्ञानदेव मानीतच नाहींत. या विषयीं त्यांचे मत गौडपादाचार्यांच्या 'न निरोधो नचोत्पत्ति.' ( माण्डूक्यकारिका प्र. २। ३२ ) या मताशीं अतिशय जुळतें आहे."[2]

ज्ञानेश्वरीतील अध्यात्माविषयीं डॉ. श. दा. पेंडसे ह्यांनीं "ज्ञानेशांनीं परमात्मतत्त्व हें सर्व शून्याचा निष्कर्ष आहे असें वर्णन केलें आहे.[3]" असें जे म्हटलें आहे तें योग्य व साधार आहे. शंकराचार्यांनी असें वर्णन केलेलें नाहीं. ज्ञानेश्वरांनीं स्वतंत्र रीतीनें हें वर्णन केलें आहे. ज्ञानेश्वर हें एक चांगलें वैशिष्ट्य त्यांनीं दाखविलें आहे. प्रो. श. वा. दांडेकर यांचीं ज्ञानेश्वराच्या तत्त्वज्ञानाविषयींचीं मतें डॉ. पेंडसे यांनीं आमच्या मतात खोडून काढलीं आहेत.[4] परंतु यात त्यांना फारसें यश आलें आहे असें आम्हाला वाटत नाहीं. शांकर आणि ज्ञानेशाचें अद्वैत वरवर दिसायला एक असलें तरी त्यात ज्ञानेशाची मेख म्हणून वेगळी आहेच. विविध योग्यतेच्या श्रोत्यांना आपला अद्वैतवाद पूर्णपणें समजावा

१ श्री ज्ञानदेव ले. प्रो. शं. वा. दांडेकर, प्र. सहावें.
२ „ „ „
३ श्री ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान, १९४१, प्र. चौथें
४ „ „ „

म्हणून माया, अज्ञान इत्यादि शब्दांचा उपयोग शंकराचार्यांप्रमाणेंच ज्ञानेश्वरांनीं केला आहे ही गोष्ट खरी आहे. परंतु त्यांचें निश्चित् मत म्हणजे सर्वत्र एक आत्माच होय हें होय. सोन्यांत सोनेंपण असतें, तसेंच तें सोन्याच्या अलंकारांतहि असतें. येथें अद्वैत आलें. परंतु ज्यांना सोनें दिसत नाहीं आणि फक्त अलंकार किंवा आकार दिसतो त्यांना तो अज्ञानामुळें किंवा मायेमुळें दिसतो असें म्हणणें भागच आहे. या दोन्हीं विधानांत काहींच विरोध नाहीं. ईश्वरच जगदाकार घेत असल्यानें ईश्वर आणि जगत् यांत पूर्णाद्वैत आहे. परंतु ज्या जडबाद्यांना फक्त जगत् दिसतें, त्यांतील किंवा त्यामागील ईश्वर दिसत नाहीं, तो अज्ञानानें मायेमुळें होय हें म्हणणें क्रमप्राप्तच आहे. अभिनयसम्राट सुप्रसिद्ध बालगंधर्व यांचें उदाहरण आपण घेऊं. रुक्मिणी, द्रौपदी, मेनका, सिंधु, देवयानी, रेवती अशा विविध भूमिका ते घेत असत. या सर्व भूमिका ते घेत असल्यानें त्यांच्यांत आणि त्या त्या भूमिकांत पूर्ण द्वैत होतें. रुक्मिणी म्हटली तरी बालगंधर्वच आणि सिंधु म्हटली तरी ते बालगंधर्वच. किंबहुना बालगंधर्वांच्यामुळेंच रुक्मिणी, सिंधु या भूमिका आपणाला खऱ्याखुऱ्या वाटत. ज्यांना बालगंधर्व आणि या भूमिका यांच्यांत अभेदप्रतीति होत असे त्यांना पूर्णाद्वैताचें सुख सहजच अनुभवितां येत असे. परंतु ज्यांना रुक्मिणी आणि सिंधु याच खऱ्या वाटत (आणि त्यांच्या मागील बालगंधर्व दिसत नसे) त्यांना हें सुख मिळणें शक्य नाहीं. रुक्मिणी आणि सिंधु यांचें खरें रूप त्यांना दिसत नसे तें अज्ञानामुळें किंवा मायेमुळेंच होय. नुसतें जग खरें वाटतें ते मायेमुळें, येरवीं किंवा वस्तुतः जग आणि ईश्वर हीं भिन्न नाहींत असें जें ज्ञानेश्वर म्हणतात तें यांचमुळें होय.

योगी, तत्त्वज्ञानी, पंडित या नात्यानीं ज्ञानेश्वरांची योग्यता जशी उच्च कोटींतील होती, तशीच ती कवि या नात्यानेंहि होती. केवळ काव्य किंवा केवळ साहित्यनिर्मितीच्या दृष्टीनें जरी त्यांनीं आपल्या ग्रंथांची रचना केली नसली, तरी त्यांच्या ग्रंथांना उत्तम काव्याचें स्वरूप सहजच प्राप्त झालें आहे. अंतःकरणांतील प्रबल भावनांचा सहज उद्रेक म्हणजे काव्य होय, अशी काव्याची व्याख्या सुप्रसिद्ध इंग्रज कवि वर्ड्स्वर्थ यानें केली आहे. जीव, जगत् आणि ईश्वर यांच्या संबंधींच्या

किंवा व्यक्ति, समाज आणि ईश्वर यांच्यासंबंधींच्या विशिष्ट भावनांनीं आणि विचारांनीं ज्ञानेश्वराचें हृदय काठोकाठ भरलें होतें. एका उच्च समानतेच्या आणि अद्वैताच्या पातळीवरून ते जगाकडे बघत होते. जगात काय आहे किंवा जग कसें आहे ह्याचा स्वानुभव त्यांना चांगलाच होता. जग कसें असावें याचीं मनोहर चित्रें त्यांनीं आपल्या अन्तःकरणांत तयार केलीं होतीं. ज्ञानेश्वर ऐन तारुण्याच्या वसंतकाळात होते. अद्वयानंदाचा अनुभव ते अहर्निश घेत होते. त्यायोगें पृथ्वीचें पालन करणाऱ्या श्रीरामचंद्रराव यादवाच्या स्वराज्यात ते राहात होते. वैयक्तिक किंवा कौटुंबिक दुःखांचीं 'कटकटल्यें' त्यांचीं नेहमींच 'जोघटलीं' असल्यानें एक प्रकारच्या अपूर्व प्रसन्नतेनें ते आपल्या भोंवतालच्या समाजाकडे पाहात होते. वसंत ग्रीष्माच्या संधिकालांत भोंवताली उन्हाच्या ज्वाळा निघत असतांना कोकिळानें आम्रमंजरीकडे पाहात कुहूकुहू असा खोल नि शांत ध्वनि काढून सृष्टिजाताला निववावें त्याप्रमाणें ज्ञानेश्वरांनीं तापत्रयानीं तापलेल्या मानव जातीला आपल्या ग्रंथांतील शांतरसानीं भरलेल्या ओव्या ऐकवून अक्षरशः निववलें आहे. विविध जातींच्या आणि विविध धंदे करणाऱ्या श्रोत्यांना गीतेंतील अद्वैत आणि समत्व, कर्मयोग आणि भक्तियोग, हीं कळलीं पाहिजेत, सहज कळलीं पाहिजेत, म्हणून दृष्टांतामागून दृष्टांत देऊन आणि उपमा उत्प्रेक्षांचा पाऊस पाडून ज्ञानेश्वरांनीं ग्रंथरचना केली आहे. एक प्रकारच्या प्रसन्नतेंत, आधुनिक शब्द वापरायचा तर एक प्रकारच्या दिव्य मस्तींत त्यांनीं हें कार्य केलें आहे. उपमा कालिदासस्य असें आपण परंपरेनें म्हणत आलों असलों तरी उपमा ज्ञानदेवस्य असेंच यापुढें आपण म्हणावें इतक्या सरस उपमा ज्ञानेश्वरांनीं दिल्या आहेत. प्रसाद, माधुर्य, ध्वनि आणि रस या ज्या काव्याला अत्यंत आवश्यक अशा गोष्टी आहेत त्यांचा नुसता सुकाळ ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांत आणि विशेषतः ज्ञानेश्वरींत झाला आहे. कवित्व, रसिकत्व आणि परतत्त्वस्पर्श असा त्रिवेणीसंगम ज्ञानेश्वरींत पाहावयास सापडतो. ज्ञानेश्वरांच्या आधीं होऊन गेलेल्या मुकुंदराजासारख्या कवींत किंवा त्यांच्या समकालीन अशा महानुभाव कवींत किंवा त्यांच्या उत्तरकालीन आजपर्यंतच्या मराठी कवींत, त्यांच्या तोडीचा कवि झालाच नाहीं असें निःसंदिग्ध

पणें म्हणावेसें वाटतें. मुकुंदराजांत परतत्त्वस्पर्श आहे पण रसिकत्व नाहीं. महानुभाव कवींत कवित्व व रसिकत्व भरपूर असलें तरी वैचारिक उदात्तता नाहीं. आधुनिक कांहीं श्रेष्ठ कवींत कवित्व, रसिकत्व व विचारांची बैठकहि असली, तरी ज्ञानेश्वराच्या तुलनेनें ते फिके वाटतात. ज्ञानेश्वराची वाणी दिव्य आणि दिलखुलास वाटते. प्रस्तुत ग्रंथांत स्थलाभावामुळें आम्हांला उतारे देऊन आमचें म्हणणें सिद्ध करतां येत नाहीं. तरी पण ज्ञानेश्वरीच्या शेवटीं आलेल्या प्रसाददानांत केवढें औदार्य आणि उदात्तता भरली आहे ती पहा :—

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥
जे खळांची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मीं रती वाढो ।
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवांचें ॥
दुरितांचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥
वर्षत सकळ मंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूतळीं । भेटो तयां भूतां ॥
चलां कल्पतरूंचे आरव । चेतनाचिंतामणींचें गांव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥
चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥
किंबहुना सर्व सुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदि पुरुखीं । अखंडित ॥

साहित्याच्या दृष्टीनें वाचकाचें लक्ष वेधून घेणारी आणखी एक गोष्ट म्हणजे ज्ञानेश्वराचें कथनकौशल्य. सद्गुरु निवृत्तिनाथ आपल्यासमोर बसले असून, [illegible] संतांचे रसिक श्रोते दोन बाजूला बसले आहेत, अशा कल्पनेनें

ज्ञानेश्वरी ग्रंथ ज्ञानेश्वरांनी रचिला आहे. भारतीय युद्धप्रसंगी अर्जुनाला पडलेला व्यामोह श्रीकृष्णानें तत्त्वज्ञान सांगून दूर केला, हा कथाप्रसंग संजयानें धृतराष्ट्राला सांगितला. या कारणानें तत्त्वज्ञानासारखा रुक्ष विषय सुबोधपणानें सांगत असताना ज्ञानेश्वरांना त्यात गोष्टीची गोडी निर्माण करता आली आहे. निवृत्तिनाथ-ज्ञानेश्वर, ज्ञानेश्वर श्रोते, कृष्ण-अर्जुन, संजय धृतराष्ट्र अशा जोड्या ज्ञानेश्वरींत येऊन त्यांच्या भावभावना संवादाच्या रूपानें अत्यंत मनोरम पद्धतीनें वर्णिल्या आहेत. या सर्व ठिकाणीं रसोत्कटता आहे. प्रेम, आदर, सख्य या भावना अगदीं दुथडी वाहत आहेत. आपल्याकडे सर्व प्रकारें कमीपणा घेऊन गुरु आणि श्रोते यांचा अपूर्व गौरव ज्ञानेश्वरांनीं केला आहे. वक्ता हा वक्ताचि नोहे श्रोतेनविण, असें म्हणून श्रोत्यांचीं अन्तःकरणें ज्ञानेश्वरांनी अगदीं काबीज केलीं आहेत. धृतराष्ट्राचा कौरवांविषयींचा पक्षपात आणि त्याचें अज्ञान यामुळें कृष्णार्जुनसंवादाची गोडी त्याला चाखतां येईना, म्हणून त्याची जी थट्टा संजयानें केली आहे ती सर्वथैव स्वतंत्र व बहारीची आहे. येथें विनोदहि चांगला आहे. याहिपेक्षां अकराव्या अध्यायांत विश्वरूपदर्शनाची इच्छा करून अर्जुनानें स्वतःची जी घाबरगुंडी करून घेतली आणि श्रीकृष्णाला सौम्य स्वरूपांत दर्शन देण्याची जी विनति केली तो प्रसंग तर उपरोधपूर्ण विनोद आणि प्रेम यानें ओतप्रोत भरला आहे. या व अशासारख्या दुसऱ्या गुणधर्मांमुळें ज्ञानेश्वरी हा ग्रंथ अत्यंत सजीव वाटतो. निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, श्रीकृष्ण, अर्जुन, संजय, धृतराष्ट्र आणि ज्ञानेश्वरांचे तुम्ही आम्ही श्रोते किंवा वाचक या सर्व सजीव व्यक्ति वाटतात. व त्या सर्वांचा मधुर मेळावा किंवा हृद्य हृदयसंवाद म्हणजेच ज्ञानेश्वरी होय असें म्हणावेंसें वाटतें

ज्ञानेश्वरीचें सौंदर्य तींत जागोजागीं आलेल्या रूपकांनीं वाढलें आहे. या बाबतींत संतप्रेमी ह. भ. प. पांगारकर म्हणतात[१]—"ज्ञानेश्वरींत रूपकें फार बहारीचीं आहेत. मूळ गीतेंतेंच क्षेत्रक्षेत्रज्ञाचें व अश्वत्थाचें अशीं दोन सुन्दर

१ मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड पहिला, १९३२, पृ. ६६२

रूपकें दिलीं आहेत तथापि त्या रूपकाचेहि विस्तृत, मनोवेधक व विशद स्पष्टीकरण ज्ञानेश्वरामारखें कोणीहि केलेलें नाहीं. या शिवाय त्याची स्वतंत्र रहानमोठीं अशीं 'कितीतरी रूपकें ज्ञानेश्वरीभर विखुरलीं आहेत. यापैकीं चार ठळक स्थळें येथे दाखवितों. पहिल्या व सतराव्या अध्यायाच्या मंगलाचरणाचीं गणेशाचीं रूपकें, तिसऱ्या अध्यायांतील काम एप क्रोध एप या श्लोकावरील रूपक, सातव्या अध्यायांतील मायानदीचें व तेराव्यांतील प्रकृति पुरुषाचें रूपक, पधराव्याच्या प्रारंभीच्या गुरुपूजेच्या ओंव्या, अठराव्यांतील गुरुरूप चिंतामणीचें रूपक अशीं कांहीं रूपकें मूळांतूनच पाहिलीं पाहिजेत. हीं सर्व रूपकें इतकीं सर्वांगपरिपूर्ण आहेत कीं तीं पाहतांना ज्ञानेश्वराच्या स्फूर्तीची, कल्पनाचातुर्याची व भाषाप्रभुत्वाची धन्यता वाटते. याच अर्थानें दात्यासाहेब केळकरांनीं आपल्या 'ज्ञानेश्वरी सर्वस्व' या ग्रंथात "उपमा व दृष्टांत यांत भी ज्ञानेश्वराचा हात धरणारा कवि मराठींत झालाच नाहीं" असें म्हटलें आहे.

ज्ञानेश्वरी ज्या काळात लिहिली गेली त्या काळाच्या दृष्टीनें पाहता निवी मराठी भाषेंतील रचना हीहि एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट होय. मुकुंदराज आणि महानुभावीय कवि यांनीं अनुक्रमें बाराव्या तेराव्या शतकांत मराठी भाषेंत कांहीं ग्रंथ लिहिले असले तरी सर्वसामान्यपणें महाराष्ट्रीय पंडित मराठीकडे नाक मुरडूनच पाहत असत. मराठीला भाषा न समजता बोली समजण्याचा प्रघात या पंडितांचा होता. भाषा हें नामाभिधान व ऐश्वर्य फक्त संस्कृतलाच त्या काळात असे. त्यामुळें महाराष्ट्रीय पंडित काव्य, अध्यात्म, ज्योतिष, संगीत, धर्म इत्यादि विषयावर संस्कृतमध्यें रचना करीत. भवभूति, राजशेखर, शार्ङ्गदेव, वोपदेव, हेमाद्रि आणि भास्कराचार्य हे सर्व महाराष्ट्रीयच कवि व पंडित होते. हेमाद्रि व वोपदेव हे तर ज्ञानेश्वराचे समकालीन पंडित असून दोघांनीहि संस्कृतमध्यें ग्रंथरचना केली आहे. हेमाद्रीला ज्या ग्रंथानें अखिल भारतीय कीर्ति मिळवून दिली तो 'चतुर्वर्गचिंतामणि' हा ग्रंथ संस्कृतात आहे. वोपदेवाचा मुक्ताफल हा ग्रंथहि संस्कृतात आहे. पंडितांनीं व कवींनीं ग्रंथरचना करावयाची म्हणजे संस्कृत भाषेंतच अशी त्या काळीं समजूत होती. याला इंग्लंड देशाचाहि दृष्टांत

देता येईल. सोळाव्या शतकापर्यंत तेथील विद्वान इंग्रजी भाषेत ग्रंथरचना करणें कमीपणाचें समजत असत. याच कारणानें युरोपीय कीर्ति मिळालेले युटोपिया (इ. स. १५१६) व इन्स्टॉरेशिया मॅग्ना (इ. स. १६२०) हे ग्रंथ अनुक्रमें सर टॉमस मर व बेकन ह्या दोन आंग्ल पंडितांनीं लॅटिन भाषेंत रचिले. या दृष्टीनें पाहता ज्ञानेश्वरासारख्या प्रज्ञा व प्रतिभा याचा वरदहस्त असलेल्या पंडितानें आपली गीताटीका मराठींत करावी ही अपूर्व गोष्ट आहे. असें करण्यात दोन प्रमुख कारणें होतीं. व्रतवैकल्यें आणि अनेक देवतापूजनाच्या मार्गे लागलेला बहुजनसमाज हा संस्कृत भाषा जाणत नव्हता. इतकेंच नव्हे तर या समाजाला आपल्याकडे ओढून घेण्याची कामगिरी महानुभावीय ग्रंथकारांनीं मराठींत ग्रंथरचना करून आरंभिली होती. अशा वेळीं खऱ्या वैदिक धर्माचें आणि तत्त्वज्ञानाचें ज्ञान बहुजनसमाजाला समजेल अशा मराठी भाषेंत देण्याची अत्यंत आवश्यकता होती. पांडित्यानें मनुष्य किती अनुदार बनतो याचें उदाहरण ज्ञानेश्वरांनीं आपेगाव, आळंदी, पैठण या गावांतील भूदेवांनीं त्यांच्यावर जो बहिष्कार पुकारला होता त्यावरून जाणलें होतें. बहुजनसमाजाला काय ? तो या शुष्क पंडितांचेंच अनुकरण करणार. कारण त्याला संस्कृताचें काहीं ज्ञान नव्हतें. ही स्थिति पालटण्याच्या हेतूनें ज्ञानेश्वरांनीं आपले ग्रंथ मराठींत लिहिले. दुसरें कारण म्हणजे मराठी भाषेवरील त्यांचें अपरंपार असें प्रेम. या प्रेमाचें प्रत्यंतर ज्ञानेश्वरींत एक दोन नाहीं तर तेरा ठिकाणीं त्यांनीं दाखविलें आहे. मराठी भाषेची थोरवी वर्णन करून त्यांनीं तिचें समर्थन अगदीं प्रासादिक वाणीनें केलें आहे. हें समर्थन मूळांतूनच बघितलें पाहिजे. प्रस्तुत ग्रंथाच्या स्वरूपाकडे पाहून आम्ही वानगीदाखल त्यापैकीं ल्हानसा उतारा देतो: —

माझा मऱ्हाठाचि बोल कौतुकें । परि अमृतातेंहि पैजा जिंके ।
ऐसीं अक्षरें रसिकें मेळवीन ।

जिये कोवळिकेचेनि पाडें । दिसती नादींचे रंग थोडे ।
वेधे परिमळाचें बीक मोडे । जयाचेनि ॥ अ. ६ ओ. १४ १५

तरी संस्कृताचीं गहनें । तोडोनि मऱ्हाठिया शब्द-सोपानें ।
रचिलीं धर्मविधानें । श्रीनिवृत्तिदेवें ॥

म्हणोनि भलतेणें एथ सद्भावें नहावें । प्रयाग माधव विश्वरूप पाहावें ।
येतुलेनी संसारासी द्यावें । तिळोदक ॥ अ. ११ ओ. ९-१०

ज्ञानेश्वरांच्या ग्रंथरचनेला आज आता साडेसाहाशें वर्षे होऊन गेलीं असल्यानें, त्यांच्या ग्रंथात योजिलेली मराठी भाषा आपणाला आजच्या मराठीसारखी वाटणें अशक्य आहे. तरीदेखील ज्ञानेश्वरानीं आपला ग्रंथ संस्कृतच्या तोडीचा करण्याच्या हेतूनें तत्सम किंवा संस्कृत शब्दांचा चांगलाच भरणा ज्ञानेश्वरींत केला आहे. ज्ञानेश्वरीच्या भाषेची आजच्या दृष्टीनें कांहीं वैशिष्ट्यें सांगण्यासारखीं आहेत. हल्लींच्या मराठींत प्रथमाविभक्तीचे प्रत्यय नाहींत. ज्ञानेश्वरानीं प्रथमेचा 'उ' प्रत्यय सर्वत्र व क्वचित् 'ओ' प्रत्यय वापरला आहे. (तेया विखयो ना स्वर्गु मिळे १६·४५२). पंचमीचा औनि प्रत्यय हें ज्ञानेश्वरीचें खास वैशिष्ट्य आहे (तैसे मनौनि धन वेन्ही १६·८७) हल्लीं आपले पंचमीचे प्रत्यय ऊन, हून हे आहेत. द्वितीया विभक्तीचे सांप्रतचे लोकप्रिय प्रत्यय ला आणि ना हे आहेत. ज्ञानेश्वरींत हे प्रत्यय ते, एया, आ, सि असे आहेत. याशिवाय क्ष व प या बद्दल ख, (तोख, दोख, विख, खीर), ख, ष, थ, घ व भ यांच्या जागीं ह (मेहुण, बहिरा, बहीण, कहाणी) असेहि वर्ण आले आहेत. यामुळें ज्ञानेश्वरी वाचायला प्रथम कठिणच वाटते. परंतु दुसरें तिसरें वाचन होताच भाषेची लवकर लक्षात येऊन ज्ञानेश्वरीचें गंगेप्रमाणें निर्मल असलेलें अन्तःकरण तेव्हांच दिसू लागतें

आपल्या ग्रंथात प्रतीत होणारे ज्ञानेश्वर विद्याविनयसंपन्न, मानमानिमामाडित, जीवन्मुक्तावस्था आणि अद्वयानंद याचा अनुभव घेत असलेले योगी, आणि अगाऊहि अत्यंत सहानुभूतीनें व प्रसन्नतेनें बघणारे तरुण वाटतात. नामदेवाच्या आणि आपल्या भावंडांच्या बरोबर तीर्थयात्रा करून झाल्यानंतर त्यांनीं आळंदी येथें वयाच्या अवघ्या एकवीसाव्या वर्षी शके १२१८ मध्यें समाधि घेतली. त्यानंतर

एका वर्षाच्या आत अनुक्रमें सोपानदेव, मुक्ताबाई व निवृत्तिनाथ या तिघांहि भावंडांना निरनिराळ्या ठिकाणीं हिंडत असतां मृत्यु आला. साडेसहाशें वर्षे होऊन गेलीं असूनहि ह्या अलौकिक चार भावंडांचा कीर्तिपरिमल आजहि उभ्या महाराष्ट्रांत दरवळत आहे.

ज्ञानेश्वरांची चार गुरुपरंपरा पुढीलप्रमाणें आढळते*—आदिनाथ–मच्छिंद्रनाथ–गोरक्षनाथ–गैनीनाथ–निवृत्तिनाथ–ज्ञाननाथ ऊर्फ ज्ञानेश्वर. ह्या नाथपरंपरेतील पुरुषांनीं अध्यात्मविद्येचा प्रसार तेराव्या शतकापासून तें एकोणिसाव्या शतकापर्यंत अव्याहत चालू ठेवला. ज्ञानेश्वरांचे शिष्य विसोबा खेचर, विसोबांचे शिष्य नामदेव व नामदेवांचे शिष्य चोखामेळा अशी एक परंपरा आहे. निवृत्तिनाथांची बहीण मुक्ताबाई व मुक्ताबाईंचे शिष्य चांगदेव अशी दुसरी एक परंपरा आहे. मुक्ताबाईंचे अभंग, पदें, कल्याणपत्रिका व हरिपाठ अशी रचना प्रसिद्ध आहे. त्यांतहि "मजवरी दया करा। ताटी उघडा ज्ञानेश्वरा" या ओळीनें सुरू होणारे ताटीचे अभंग फार प्रेमळ व प्रासादिक आहेत. चांगदेव यांचा 'तत्त्वसार' नांवाचा वेदांतविषयक ग्रंथ चांगला आहे. याहिपेक्षां दीर्घकाळ चाललेली तिसरी एक परंपरा आहे: ज्ञाननाथ–सत्यामलनाथ–गैनीनाथ–गुप्तनाथ–उद्बोधनाथ–केसरीनाथ–(एक शाखा मल्हारीनाथ राशीन येथील व दुसरी पैठण येथील) शिवदिनानाथ ऊर्फ शिवदिन केसरी–नरहरिनाथ–महिपति अशी ती परंपरा होय. सत्यामलनाथांनीं सिद्धांतरहस्य ऊर्फ ललितप्रबंध नांवाचा स्वतंत्र वेदांतविषयक ग्रंथ रचिला असून, त्यांत बारा हजारांवर अभंग असून एकंदर दहा प्रकरणें आहेत. सत्यामलनाथांना ज्ञानेश्वरांचा अनुग्रह स्वप्नांत झाला होता. सत्यामलनाथांचा शिष्य गैनीनाथ (शके १५२०–१५८०) यांनीं पंचीकृतविवेक नांवाचा ग्रंथ, कांहीं अभंग व पदें लिहिलीं आहेत. गैनीनाथांची शिष्या गुप्तनाथ हिचें मूळचें नांव गंगाबाई. गुप्तनाथांचा शिष्य उद्बोधनाथ, यांनीं कांहीं योगमार्गाचीं पदें लिहिलीं आहेत. यांनीं शके १६०९ वैशाख वद्य ९ मीस राशीन येथ समाधि घेतली. उद्बोधनाथांचे शिष्य केसरीनाथ (समाधि शके १६४६ मार्गशीर्ष शु. २

आळंदी येथें । यांनी सिद्धान्तसार ( शके १६३८ ) नांवाचा अध्यात्मपर ग्रंथ लिहिला. वैराग्यनाथाचे दोन शिष्य होते. एक उद्बोधनाथाचे चिरंजीव मल्हारीनाथ व दुसरे शिवदिननाथ ऊर्फ शिवदिन केसरी ( जन्म शके १६२० व समाधि शके १६९६ माघ वद्य १३ ) यांनी विवेकदर्पण (१६९२) ज्ञानप्रदीप, भक्तिरहस्य इत्यादि ग्रंथ व कांहीं श्लोक व अष्टकें लिहिलीं आहेत. पैठण येथें गंगेच्या काठावर शिवदिननाथाचा भव्य मठ अजूनहि आहे. शिवदिननाथांनी मराठेशाहीचे बरे दिवस जसे अनुभविले, तसेंच पानपत येथें घडलेला जबर धक्काहि पाहिला होता. एका पदांत याविषयीं ते म्हणतात — सोळा शतें चौऱ्यांशीत झाली धुम्धानी । दैत्यराज दुष्टबुद्धी नासिले मधानीं ॥धृ०॥ भोसल्यांचा गेले भाऊ नाना दोनी । तैसी योगि योगाची मानीना निशानी । सारा दगा जसा पट्टी क्रूर ग्रहस्थानीं । मंत्रादिक कुवाकुड मांडिली तापत्रय दुष्टानीं देशग्रामपरत्वी ओस पाडिल्या पेठान्यांनीं । . तीर्थें क्षेत्रें गाईंब्राह्मण फार कष्टली क्लेशानीं । भक्त विरक्त साधु संत सारी योगति वाणि । शिवदिनकेसरी भगवंता तूं यासी पार निर्वाणि ॥ सोळा० ॥ शिवदिननाथाचा शिष्य त्याचा पुत्र नरहरिनाथ. यांचीं कांहीं पदें आहेत. त्याचे दोन शिष्य. एक त्याचा विलासी पुत्र लक्ष्मण व दुसरा महिपति. यांची प्रसिद्धि उत्तर हिंदुस्थानांत फार आहे. ग्वाल्हेर येथें याचा मठ व शिष्यपरंपरा आहे. यानें कडाका छंदांत पुष्कळ पद्यरचना केली आहे. यांनी शके १७८४ पौष शु ११ स समाधि घेतली. योगमार्गांत असणाऱ्यांना येणाऱ्या रंग, ध्वनि इत्यादि अनुभवांचीं वर्णनें याच्या पदांत आहेत. 'शिमगा' नांवाच्या पदांतील कांहीं भाग पुढीलप्रमाणें आहे :—सावध व्हा गडे हो नीट उमगा । शिमगा निघुन जाईल कीं ।...त्रिगुण मोळी बांधुन होळी ऐट पिटावर न्यावी कीं । सत्त्वांच्या लोट घोटुन लक्ष सुनीळा लावी कीं । फटफटित चांदणें ज्योतिज्वाळा त्यांत भासा येईल कीं । नवरंगाचा येकच गोळा चक्षुत्रयाला भासेल कीं । चंद्रसूर्य देखणें गेलें. पाहतो पाहणें नासेल कीं । रुपेल दवळें दिसेल पिवळें यांत कांहीं बाही असेल कीं । त्यांत मिळावें तन्मय व्हावें साधनिं मन हें भावेल कीं । गुरुची सेवा घडेल जेव्हां समाधि लागुन जाईल कीं ॥

योगविद्या, वैराग्य व अद्वयानंद हीं नाथपरंपरेचीं प्रधानलक्षणें असून, या परंपरेचा शिवसंप्रदाय होता हें निर्विवाद आहे. बाराव्या शतकात या पंथानें महाराष्ट्रात धर्मजागृति केली. ज्ञानेश्वरांनीं नाथपरंपरेनें आलेला योग व अद्वैत-सिद्धांत हे दोन्ही घेतले आणि त्यात भक्ति-प्रेमानंदाची भर घालून अद्वैतभक्तीचा म्हणजे भागवत धर्माचा पंथ महाराष्ट्रात निर्माण केला. या पंथाची एक शाखा वारकरी संप्रदायात परिणतावस्था पावली व तिच्यांत नामदेव, एकनाथ, तुकारामा-सारखे भगवद्भक्त झळकले. दुसरी शाखा मत्स्यमल्लनाथ-केसरीनाथ-शिवदिन-केसरी सारख्या योग्यांकडून परिपुष्ट झाली.

# ५

## नामदेव

धर्मठपणाच्या नादीं लागून रुक्ष, जड, हृदयशून्य, यांत्रिक बनलेल्या तत्कालीन महाराष्ट्रीय समाजाला ज्ञानेश्वरांनीं कर्तव्यबुद्धीची जाणीव, ज्याप्रमाणें ज्ञानेश्वरांनीं करून दिली, त्याचप्रमाणें त्यांच्या समकालीन परंतु त्यांच्यामागें पुष्कळ वर्षे जगलेल्या नामदेवांनीं[1] ईश्वरप्राप्तीचा भक्तियुक्त नामस्मरणरूपी सुलभ मार्ग सर्वांना दाखवून दिला. नामदेवांच्या काळांत यादवांचें स्वराज्य नाहींसें होऊन, त्याची जागा यावनी राज्यानें घेतली होती. मुसलमानांच्या टोळधाडी महाराष्ट्रावर पडून, लोकांना नकोनकोसें झालें होतें. सुलतानांत नांदत असलेला महाराष्ट्र दुःखाच्या वणव्यांत सापडल्यासारखा झाला होता. बेचैन, अस्वस्थ, उद्विग्न, संत्रस्त, वैतागलेल्या अशा बहुजनसमाजाला समाधानाचा आणि शांतीचा मार्ग दाखवून कार्योन्मुख करण्याच्या दृष्टीनें नामदेवांनीं नामभक्तीचा सोपा मार्ग दाखवून पंढरपुरांत एकत्र केलें. शैववैष्णवांचे झगडे महाराष्ट्राच्या दक्षिणेकडे जोरांत चालू होते व त्यांचा थोडाबहुत परिणाम महाराष्ट्रावरहि झाला होता. परचक्रांत आणि परदास्यांत सापडलेल्या समाजाचें धर्माच्या नांवावर

---

१ जन्मकाल शके ११८५ प्रभवसंवत्सर कार्तिक शुद्ध एकादशी रविवार समाधिकाल शके १२७२ आषाढ वद्य त्रयोदशी. परभणी जिल्ह्यांतील नरसीब्राह्मणी येथें राहात असत. पंढरपुरास वारीच्या निमित्तानें जात. समाधि नरसी येथेंच आहे. अशी पंढरपुरांत महाद्वाराजवळ. वडिल दामाशेट. आई गोणाई. ज्ञानेश्वरांबरोबर व पुढेंहि अनेक यात्रा. पंजाबांतहि नामभक्तीचा प्रसार त्यांनीं केला. गुरुदासपूर जिल्ह्यांतील घोमान गांवीं नामदेवांचें स्मारक आहे. सुमारें चाळीस हजार 'नामावंसी' नामदेव संप्रदायी तिकडे आहेत. पहा 'पंजाबांतील नामदेव' के. शंकर पुरुषोत्तम जोशी

अधिक तुकडे होऊ नयेत म्हणून हरिहराची उपासना म्हणजेच पांडुरंगाची उपासना होय हे तत्त्व ज्या संतांनीं महाराष्ट्रात रुजविलें त्यात नामदेव हे अग्रेसर होते.

प्रेममय भक्तिचा एक प्रकारच्या गंभीर अद्भुत दगदार भक्तिचा, जिला इंग्रजींत 'रोमँटिक डिव्होशन' म्हणता येईल तिचा प्रवेश मराठी साहित्यात (किंवा अधिक रास्त्या अर्थानें मराठी भक्तिसाहित्यात) जर कोणी मोठ्या प्रमाणावर प्रथम केला असेल तर तो नामदेवानीं. बालकवि ठोंमरे हे ज्याप्रमाणें बालपणापासून निसर्गाचे भक्त व कवि होते, त्याप्रमाणें नामदेव हे लहानपणापासून ईश्वराचे भक्त व कवि होते वयाच्या पाचव्या वर्षापासून त्यानीं देवाला प्रसन्न करून घेतलें होतें नरसीबामणी येथील केशवराजाच्या मूर्तीला त्यानीं पाचव्या वर्षी प्रेमाचा हट्ट धरून दूध प्यायला लाविलें होतें. नरसीबामणीचा केशवराज व पंढरपूरचा विठोबा यांच्याशीं त्याचें बोलणें चालणें, त्याच्या गुजगोष्टी तें वयात येताच सुरु झाल्या. होत्या. नामदेवानीं रुसावें आणि पांडुरंगानें त्याची समजूत घालावी, नामदेवानीं उद्विग्न व्हावें आणि पांडुरंगानें त्याना विसोबा खेचराचा[1] गुरुपदेश घ्यायला सागावें, ज्ञानदेवाबरोबर यात्रेला नामदेव निघाले असताना विठोबानें त्याचा निरोप घ्यावा, यात्रेहून परत आल्यावर रुक्मिणी-पांडुरंगानीं नामदेवाच्या वतीनें ब्राह्मणभोजन घालून यात्रेची सांगता करावी, नामदेवाच्या विनंतीवरुन पांडुरंगानें बेदर येथील मेलेली गाय व मेलेलीं माणसें जीवंत करावीत, आई आणि बायको रागावली असताना पांडुरंगानें नामदेवाची विनवणी करून त्याना घरीं लावावेत—अशा एक कीं दोन अनेक प्रकारें त्याचें व देवाचें हितगुज चालें. दोन मित्रात, मायलेकरात, मित्रमैत्रिणींत ज्या प्रकारचे रुसवेफुगवे, प्रेमालाप, विनवण्यासुनावण्या, अडवणूक सोडवणूक हीं चालतात, त्याप्रकारचे रुसवे फुगवे वगैरे नामदेव व ईश्वर यात चालत.

---

१ पैठणाजवळील मुंगी येथील राहणारे. पेशा व्यापाऱ्याचा यांचें हरिश्चंद्राख्यान, कांहीं अभंग व पदें उपलब्ध आहेत शके १३३१ श्रावण शु. ११ स काशी येथे हे समाधिस्थ झाले

*नामदेवाच्या अभंगात अमर्ती स्थळें पुष्कळ आहेत. अभंगातील पुढील* भाग या दृष्टीने नित्य आहे (१) पतितपावन नाम ऐकुनी आलों मी द्वारा। पतितपावन न होसि म्हणुनी जातों माघारा ॥धृ॥ सोडीं देवा ब्रीद आता न होसि अभिमानी। पतितपावन नाम तुझला ठेवियलें कोणी ? ॥ १ ॥ घेसी तेव्हा देसी ऐसा असशी उदार। काय देवा शोधू तुमचे कृपणाचे द्वार (२) मुक्ताफळ नथ नाकीं। नग्रीं ल्याली वाळे वाकी। पीतांबरें अंग झाकी। कृष्णम्मा माझी ॥ (३) विठ्ठल माऊली कृपेची कांसरी। आठविता घाली प्रेमपान्हा ॥ तू माझी माऊली मी वो तुझा वत्स। परतां परतां वाट पाहें तुझी। (४) हालुले दिसलें पाहतां वाढुनी ॥ अवस्था दाटली हृदयामाझी। तू माझी जननी सरसीये मागातिणी, विठ्ठले धावोनी देईं क्षेम ॥ तू माझी पक्षिणी मी तुझें अंडज। क्षुधे पीडलों मज विसरलीसी ॥ तू माझी कुरंगी मी तुझें पाडस। तुटा भवपाश तोडी माझा ॥ (५) जननिये जिवलगे येवो पांडुरंग। दिसलों भेटी दे गे एक वेळा ॥ नामा म्हणे आई धावे लवलाही। बुडतां चिंताडोहीं काढी मज ॥ (६) आम्ही शरणागतीं केल्यामें सरता। येरव्ही अनंता कोण जाणे ॥ वेदशास्त्री पुराणीं ठकगोनि साडिलासी। तो आम्ही धरिलासी हृदयकमळीं ॥ (७) नेत्र माझे रोडले आठवे माहेर। कैं भेटेन निरंतर आईयाने ॥ चतुर्भुज विठ्ठल कैं देखेन डोळा। मस्ताचा जिव्हाळा जीव माझा ॥ (८) गात्र काळी घागर काळी। यमुनाजळें हीं काळीं वो माय ॥ बुंथ काळी बिल्वर काळी। गळा मोती एकावळी काळी वो माय ॥ मी काळी कांचोळी काळी। कास कासली ते काळी वो माय ॥ एकली पाणाया नव जाय साजणी। सवें पाठवा मूर्ति सावळी वो माय ॥ विष्णुदास नाम्याची स्वामिणी काळी। कृष्णमूर्ति बहुकाळी वो माय ॥

रागवायचाच असल्यास देवावर रागवावें, प्रेम करावयाचें असल्यास देवावर प्रेम करावें, सख्य करावयाचें असल्यात देवाशीं सख्य करावें असा जो भागवतात[१]

१ काम क्रोध भय ऐश्वर्य स्नेह सौहार्दमेवच।
एवं विदधतो नित्यं यान्ति तन्मयतामहि ते। भागवत स्क ७

ईश्वरभक्तीचा प्रकार सांगितला आहे, आणि ज्याचें एकरूप सुफी पंथियांत पहावयास सांपडतें तो नामदेवाच्या प्रस्तुत अभंगांत उत्तम प्रकारें आढळतो.[१] या अभंगांतील प्रेमळपणा, लडिवाळपणा, जि व्हाळा इतका अप्रतिम आहे कीं नामदेव हे ईश्वराचे लाडके भक्त का होते याचा उलगडा आपणास सहज होतो.

नामदेवांना पांडुरंगाच्या ग्वालेग्वाल पंढरपुरचें वेड होतें. पंढरपुरास जावें, सर्वांनीं पंढरपुरांत जमावें, ऐक्यभावना वाढवावी, परस्परांची सेवा करावी, पांडुरंगाचा जयघोष करावा, आणि अशा रीतीनें पंढरपुरास स्फुर्तिस्थान शांतिस्थान बनवावें असें त्यांना वाटे. ते म्हणतात:—पंढरीचें प्रेम आहे ज्याचे जीवीं। त्याची नित्यनवी करिन आशा॥ ते माझे सोइरे सुयाचे सद्गुरु। भवसिंधूचा पार उतरिती॥ पंढरीच्या सुखा अंत पार नाहीं लेखा। शेषा सहस्रमुखा न वर्णवेचि॥ पंढरीच्या सुखा तोचि अधिकारी। जन्मोजन्मीं वारी घडली ज्या॥ नामा म्हणे धन्य धन्य ते संसारीं। चालविती वारी पंढरीची॥ सपदा सोहळा नावडे मनाला। छंद लागला पंढरीचा॥ नित्य हे दिवाळी असे पंढरपुरीं। आनंदलिनी नारी विठ्ठलासी॥ अनघी हे पंढरी सुखाची मादुस। माझा स्वप्रकाश रत्न हरी॥ धन्य संतजन तेथींचे पारखी। ज्या झाली ओळखी विठ्ठलनामीं॥ पंढरीची वारी जयाचिये कुळीं। त्याची पायधुळी लागो मज॥ देव मज सांग पंढरीसी यारे। प्रेम चित्तीं ध्यारे नाम माझें॥ कायाचा मन दृढ धरा जीवीं। सर्व मी चालवीं भार त्याचा॥ भवसिंधु तारीन ध्यारे माझी भाक। साक्ष पुंडलीक करुनी बोले। ल्टकें बरीं असे नामयासी पुसा। आहे त्या भरवसा नामीं माझा॥

नामस्मरण हेंच सर्वसुखाचें सार होय त्यानेंच ईश्वरप्राप्ति व शांति हीं प्राप्त होतात. असा पूर्णविश्वास नामदेव महाराजांचा होता. या विषयीं ते म्हणतात,

[१] यावेळीं सुफीपंथी साधु महाराष्ट्रांत संचार करीत होते तसेंच नामदेव उत्तरेकडील यात्रा करीत असतांना तेथील सुफी साधुंच्या सहवासांत ते आले असतील. सुफी पंथाचा कांहीं परिणाम नामदेवांवर होणें अपरिहार्य आहे

"न पढावे वेद नको शास्त्रबोध । नामाचें प्रबंध पाठ करा ॥ नव्हे ब्रह्मज्ञान न होय वैराग्य । साधा भक्तिभाग्य मतमग ॥ हरि हरि भजन जनीं जनार्दन । सर्वत्रीं समान भूतदया ॥ भावेंचि भजावें हरितें पुजावें । नित्य हें सेवावें रामनाम ॥ न करीं कायाक्लेश इंद्रिया निरोध । मोक्ष आहे बोध वेगळाचि ॥ नामा म्हणे नाम गाऊन निर्विकल्प येसी आपोआप गिनसीत ॥ भवसिंधुचा पार तरावयालागीं ॥ साधन कलियुगीं आणिक नाहीं ॥ अहर्निशीं नाम जपा श्रीरामाचें । जें सकळ धर्मांचें मुगुटमणी ॥"

जीवोद्धाराकरिता नामस्मरणाबरोबरच सत्संगतीचें महत्त्वहि नामदेवांनीं प्रतिपादन केलें आहे. ते म्हणतात, "संतांच्या चरणा द्यावें आलिंगन । जीवें निंबलोण उतरावें ॥ संत चरणरज सेवितां सहज । वासनेचें बीज जळुनी जाय । मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडी वाढों लागे ॥" बरें, हे संत कोण ते ? त्या बाबतींत ते सांगतात, "सर्वांभूतीं पाहे एक वासुदेव । पुसोनिया ठाव अहंतेचा ॥ तोचि संतसाधु ओळखावा निका । येर ते आइका मायाबद्ध ॥"

नामदेव हे लहानपणापासून ईश्वराची उपासना करीत असत हें आपण वर पाहिलेंच. तत्कालीन रीतरिवाजाप्रमाणें त्यांचें वडील दामाशेट यांनी त्यांचें लग्न राजाई नावाच्या मुलीशीं लहानपणींच करून दिलें होतें. त्यांना जगरहाटीप्रमाणें कांहीं मुलेंहि झालीं होतीं. पुढें हा संसार वाढून त्यांना सुना आल्या व नातवंडेंहि झालीं इतकें असलें तरी मनातून ते संसाराला कंटाळले होते, त्रिविध तापांनीं पोळलेले होते, आणि म्हणूनच सतत विठ्ठलाच्या नामस्मरणांत ते वेळ घालवीत असत. ईश्वराला आळवितांना त्यांची आर्तता किती वाढत असे ती पहा :–
"त्रिताप तापलों दु:खें आहाळलों । कासावीस झालों दयासिंधु ॥ तुजवीण आतां कोणातें मी सांगूं तोडीं हा उद्वेगु नारायणा ॥ नामा म्हणे आतां नको पाहूं अंत । उद्धरीं त्वरित पांडुरंगा । तुझा विष्णुदास म्हणवितों जगीं । नाहीं माझे अंगीं प्रेमभावो ॥ जननिये जिवलगे ये वो पांडुरंगे । शिणलों भेटी दे गे एक वेळा । धांवें धांवें धांवें कृपादृष्टी पाहें । येउनिया राहें हृदयामाजीं ॥ नामा म्हणे आई धांवें लवलाहीं । बुडतां निवाडों काढीं मज ॥"

आतापर्यंत आपण जे अभंग पाहिले त्यावरून नामदेवाच्या कवितेचें स्वरूप किती साधें, जिव्हाळ्यानें भरलेलें, भावपूर्ण व प्रेमळ आहे याची खात्री पटेल. वाल्मिकीनें शतकोटी ग्रंथ केला त्या धर्तीवर शतकोटी अभग करण्याची प्रतिज्ञा नामदेवानीं घेतली होती. परंतु सांप्रदायिक माहिती खरी मानली तरी त्याच्या हातून ही प्रतिज्ञा पूर्ण झाली नाहीं असें ठरतें. सुमारें ९६ कोटी अभग नामदेवाच्या सर्व कुटुंबानें मिळून तयार केले व उरलेले चार कोटी पुढें तुकोबांनीं केले असे मानतात. वस्तुस्थिति अशी आहे कीं, आज नामदेवाचे सुमारें अडीच हजारच अभग उपलब्ध आहेत. त्यांच्या ऐंशी वर्षांच्या दीर्घ आयुष्याकडे पाहताना अडीच हजार अभग थोडे वाटतात. काहीं अभग नाहींसे झाले असावेत. माझा असा तर्क आहे कीं, नामदेवानीं पुष्कळ परिभ्रमण करून जागोजाग उपदेश केला असावा मुसलमानांचा अमल उत्तरेकडे व दक्षिणेकडे फैलावत चालला होता. अशा वेळीं लोकांना स्वधर्मांत राहून, स्वोन्नति करण्याचा उपदेश त्यानीं जरूर केला असावा. समाज बलिष्ठ करायला लागणारे, समाजैक्य घडवून आणायला लागणारे अभंग, त्यांच्या कवितेंत अवश्य असायला हवे होते हे अभंग त्याच्या राजकीय स्वरूपामुळें नाहींसे झाले कीं काय? शीखासारख्या बलोपासक समाजाच्या पूज्य धर्मग्रंथात ज्या नामदेवाचीं ६१ पदें आहेत, त्याची कविता केवळ नामस्मरण करायला सांगण्यात धन्यता मानीत असेल असें वाटत नाहीं. तुकोबांपेक्षा जवळ जवळ दुप्पट व ज्ञानेश्वरापेक्षा सुमारें चौपट आयुष्य लाभलेल्या ह्या लोकप्रिय संताच्या हातून, आपणाला आज उपलब्ध असलेल्या कवितेहून अधिक कविता तयार झाली असावी असे वाटतें. या कवितेचें काय झालें हें एक कोडेंच आहे. नामदेवाची जी आहे ती कविता मात्र साधी आहे तुकोबाच्या अभगातील काव्यात्मकता व तत्त्वज्ञान या दोन्ही गोष्टींचा जवळ जवळ अभावच तिच्यात आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. तरीपण तिच्यातील प्रेमळपणामुळें ती वाचणाऱ्याला निरंतर रमवील यांत शंका नाहीं. "युगें अठ्ठावीस विटेवरी उभा" ही नामदेवानीं तयार केलेली आरती आज महाशें वर्षें झालीं महाराष्ट्रीय लोक म्हणत आले आहेत. या एका गोष्टी-

वरूनहि जनमनावरील त्याची पकड सिद्ध होते. त्याच्या अभंगाची भाषा ज्ञानेश्वरी इतकी जुनी वाटत नाही. याचे कारण आज इतकी शतकें ते लोकांच्या जिव्हाग्रीं वसत आल्याने त्याचे आधुनिकीकरण आपोआपच होत आलें आहे. तरी देखील दाखवटा, पढियते, सावळे, आइघ इत्यादि शब्द त्याचा जुनेपणा सिद्ध करतातच.

'नामदेव' या नावाचे साधु आणि कवि महाराष्ट्रात एकदर पाच होऊन गले, असें श्रीनामदेवचरित्रकार ज. र. आजगावकर यांचें म्हणणें आहे. एक सुप्रसिद्ध संत व ज्ञानदेव-निवृत्तिनाथांचे समकालीन असे नामदेव याच नामदेवाचे अभंग लोकप्रिय आहेत. याच्या काहीं अभंगात 'नामा', काहींत 'नामया स्वामी', काहींत 'केशवाचा नामा', व काहींत 'विष्णुदास नामा', अशीं नावें येतात. नाभाजीनें आपल्या 'भक्तमाला' ग्रंथात व मर्हीपतीबुवा यानीं आपल्या 'हारमाळा' काव्यात याचा उल्लेख केला आहे. याचे गुरु विसोबा खेचर हे होत. (२) दुसरे नामदेव विष्णुदास नामा या नावानें ओळखले जातात. याचे ओवीबद्ध महाभारत प्रसिद्ध आहे. एकादशी माहात्म्य, तुळसीमाहात्म्य, उपमन्यूची कथा इत्यादि काहीं स्फुट कविताहि याची आहे. महानुभावाच्या ग्रंथात ज्या नामदेवाचा उल्लेख आहे तो याचाच असावा असें वाटतें (३) तिसरे नामदेव नामा पाठक हे होत. हे ज्ञानदेवसमकालीन कान्हा पाठक याचे चिरंजीव यानीं जैमिनीअश्वमेधावर प्राकृत ओवीबद्ध रचना केली आहे. (४) चवथे नामदेव महानुभावपंथी नामदेव होत 'महिकावतीची बखर' ह्या जुन्या ग्रंथात याचा उल्लेख आढळतो. (५) पाचवे नामदेव नामा शिंपी या नावानें ओळखले जात. हे तुकोबाच्या पश्चात् झालेले एक सामान्य लेखक असत त्यांनी अनेक संताचीं चरित्रें अभंगवृत्तात वर्णिलीं आहेत 'नामा', 'शिंपीनामा', व 'नामदेव' अशीं आपलीं तीन नावें यानीं आपल्या काव्यांत घातलीं आहेत.

नामदेवाचा काळ म्हणजे एक प्रकारें संताचा काळ किंवा संताचा वसंत काळच म्हटला पाहिजे वसंतऋतूत जसे सर्व पक्षी गोड किंवा गाऊ लागतात, तसे या काळांतील सर्व भगवद्भक्ताचे दिसते ते सर्वच अभंग करतात.

अठरापगड जातीचे हे संत होते. त्यात चोखोबा व बंकासारखे महार होते, गोरोबा व राकासारखे कुंभार होते, सावतासारखे माळी होते, नरहरीसारखे सोनार होते, जोगा परमानंदासारखे तेली होते, नामदेवासारखे शिंपी होते, कान्होपात्रा जनाबाईसारख्या स्त्रिया होत्या, तर ज्ञानदेव सोपानदेवांसारखे ब्राह्मणहि त्यात होते. यापैकी काहींकाचा उल्लेख पूर्वी आला आहे. काहींकाचा येथे केला पाहिजे. गोरोबा (तेरढोकीला राहात शके १२००चा सुमार) हे सर्वांत वयाने मोठे होते नामदेव हें कच्चें मडकें आहे, असें त्यानींच जाहीर केलें होतें. मानी तुडवीत असताना यानीं आपल्या लहानशा मुलाला पायाखालीं तुडविलें. पण विठ्ठलाच्या भजनात त्याना त्याची दादहि नव्हती ! यांनीं काहीं अभंग लिहिले आहेत. परिसा भागवत हे लोकाना 'परिसा भागवत' म्हणत, म्हणून त्यांना हें नाव मिळालें. कोणी म्हणतात रुक्मिणीनें प्रसन्न होऊन याना एक परीस दिला होता, म्हणून हे नाव त्याना प्राप्त झालें. हे प्रथम नामदेवाची निंदा करीत. पुढे त्याचे ते चाहते बनले. सकलसंतगाथ्यात याचे काहीं अभंग असून ते फार प्रेमळ आहेत. 'अणूमाजी राम, रेणूमाजी राम । तृणकाष्ठीं राम वर्ततसे' हा त्याचा अभंग सरस आहे. विसोबा खेचर (प्रथम वास्तव्य आळंदी, पुढें औंढ्या नागनाथ या गावीं (समाधि शके १२३१ श्रावण शु. ११) हे नामदेवाचे गुरु. (जेथें नाहीं देव । तेथें ठेवी पाय । सर्वत्र सदैव । तूंचि असशी) सर्वत्र ईश्वर आहे, अशा अर्थाचे त्याचे थोडेसे अभंग आहेत नामदेवाची बहीण म्हणा, दासी म्हणा, जनाबाई (समाधि आषाढ वद्य १३, शके १२७२) हिचे अभंग फारच प्रेमळ व बहारीचे आहेत. गाथ्यात सुमारे तीनशे अभंग जनाबाईचे दिले असून, त्यापैकीं बहुतेक सरस आहेत येग येग विठाबाई । माझे पंढरीचे आई गंगा गेली सिंधुपाशीं । त्यानें अव्हेरीलें तिसी ॥ नोवरीयामागें वऱ्हाडिया सोहळा ॥ इत्यादि तिचे अभंग काबुली द्राक्षाप्रमाणें अंतर्बाह्य गोड आहेत. मंगळवेढ्याच्या श्यामा नायकिणीची मुलगी कान्होपात्रा (काळ शके १३९० राजवाड्यांच्या मतें) हिचा पांडुरंगाचे ठिकाणीं दृढभाव होता. तिचेहि अभंग छापले आहेत. चांगदेव (समाधि शके १२२७ पुणतांबे येथे) हे कोठले होते

जगले अशी मान्यता आहे) हे योगी होते. तत्त्वसार नावाचा त्यांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यांचे सुमारें पाउणशें अभंग गाथ्यांत आहेत त्यांतील भाषा योगसंप्रदायातील असल्यानें, अर्थाला जरा दुर्बोध वाटते. चोखोबाचा (मृ. शके १२६० वैशाख वद्य ५) धाव घाली विठो आतां चालूं नको मंद हा अभंग प्रसिद्ध आहे. त्याचे अभंग चांगलेच असून सुंदर आहेत. ऊस डोंगा परि रस नोहे डोंगा । काय भुललासी वरलिया सोंगा ॥ नदी डोंगी परी नीर नोहे डोंगें । काय भुललासी वरलिया सोंगें ॥ चोखा डोंगा परी भाव नाहीं डोंगा ॥" हा त्याचा अभंगहि फार लोकप्रिय आहे. त्याची पत्नी सोयराबाई हीहि अभंग रचना करी देहासी विटाळ म्हणती सकळ । आत्मा तो निर्मळ शुद्ध बुद्ध-हा तिचा अभंग सुरेख आहे. चोखोबाची धाकटी बहीण निर्मळा हिचेहि कांहीं अभंग असून ते सोपे व रसाळ आहेत. सावतामाळी (मृ. शके १२१७ आषाढ कृ. १४) याचे थोडे अभंग गाथ्यांत आहेत. "कांदा मुळा भाजी । अवघी विठाबाई माझी ॥ लसूण मिरच्या कोथिंबिरी । अवघा झाला माझा हरि"-हा त्याचा अभंग त्याचें व्यक्तिमत्व दर्शविणारा नाहीं असें कोण म्हणेल ! नरहरी सोनार (मृ. शके १२३५ माघ कृ. ३) हे पंढरपुरांत राहात असूनहि शिवभक्त असल्यानें पांडुरंगाचें दर्शन घेत नसत. पुढें एका गिऱ्हाईकानें पांडुरंगाचा करगोटा करावयास सांगितला व खुद्द देवाचें माप घेण्याची विनंति केली. तेव्हां डोळे झाकून नरहरीनें माप घेतलें ! त्यावेळीं शंकराच्या मूर्तीला आपण हात लावतो आहोंत असे त्यांना वाटलें त्यांनीं डोळे उघडले तर तो पांडुरंग. पुन: त्यांनीं डोळे मिटले, तो शंकराच्या खाणाखुणा ! तेव्हां त्यांची खात्री पटली कीं, हरि व हर हे एकच आहेत. त्यांनींहि कांहीं अभंग लिहिले आहेत साध्या रसाळ, परमग कूर्मदास, कान्हो पाठक, भानुदास इत्यादि दुसरेहि सामान्य कवि व भक्त या काळांत झाले. नामदेवानंतरच्या परंतु एकनाथ पूर्वकालीन कवींचा येथेच उल्लेख करणें सोयीचें होईल. पैठणच्या नृहरिभट किंवा नरहरि पिसा ऊर्फ जातवेद यानें श्रीभागवताच्या दशमस्कंधावर पाउणलाख मराठी ओंवी टीका लिहिली असून, त्याच्याजवळ वर्णनात्मक प्रतिभा चांगली आढळते. यशोदेला इतर गोपिकांनीं जो बाळंतविडा

केला त्याचें वर्णन सरस आलें आहे. नामा पाठक या कवीचे नामरत्नमाला, भरतभेट व अश्वमेध हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. ग्रंथाचे ९५ प्रसंग असून भाषा व रचना अगदीं साधारण प्रतीची आहे. नामा पाठकाचा आजा कान्हो पाठक हा ज्ञानेश्वरांचा समकालीन असून, त्याचे कांहीं अभंग व 'गीतासार' नामक एक लहानसें प्रकरण उपलब्ध आहे. चोंभा कवीचे 'उपाहरण' ओंवीवृत्तात असून, त्याची ओंवी थोडी विचित्र आहे त्याच्या ओंवीच्या चरणापैकीं पहिल्या, दुसऱ्या व चौथ्या चरणाच्या शेवटीं यमक असतें व मधलाच तिसरा चरण निर्यमक असतो. उदा० "गीताचेन नादें । चरीं विसरलीं श्वापदें । हरणीं नोहविलें कर्ण। तींयें राहिलीं नादवेधें ॥ " मैराळ सतीदासु नांवाचा आणखी याच काळातील कवि असून त्याचें द्रोणपर्व उपलब्ध आहे. कान्हो निमल्दास, भास्कर व नवरस नारायण हेहि एकनाथापूर्वींच होऊन गेले. जोगा परमानंद तेली हा आर्शीचा गाइणारा असून त्यानें कांहीं अभंग रचले आहेत. बंका महार (मृ शके १२४० माघ शु. १५) याचे कांहीं अभंग आहेत.

या सर्व संतांनीं समानतेचा व भगवद्भक्तीचा संदेश महाराष्ट्राला दिला. 'देव भावाचा भुकेला । याति कुळ नाहीं त्याला' अशी यांची दृढ श्रद्धा होती. यांची कविता भक्तिभावानें ओथंबली असून, तिची भाषा साधी व गोड अशी आहे. ही साधु मंडळी प्रेमळपणाचा पाऊस त्यावेळीं महाराष्ट्रावर पाडीत होती. यावनी अमल सुरू झाल्यानें वेदील बनलेल्या बहुजनसमाजाला यांची अभंगवाणी अमृतासारखी तचित् वाटली असेल. यांची नम्रवृत्ति, समाधान, समभावना व साधुता हीं पाहून त्याकाळच्या लोकाना चिंतामणीचें आगर प्राप्त झाल्यासारखें वाटलें असेल. याच मंडळींनीं सर्वत्र फिरून भागवतधर्माचा प्रसार केला, लोकाना पंढरपूरच्या अध्यात्मपीठात एकत्र आणिलें, आणि भावी स्वराज्याला ज्या ऐक्याची जरूरी होती त्या ऐक्याचा पाया भरभक्कम तयार केला. संताना निव्वळ टाळकुटे म्हणणाऱ्यांनीं या त्यांच्या कामगिरीकडे दुर्लक्ष केलेलें दिसतें.

# ६

## एकनाथ

आचार आणि विचार, वाणी आणि वर्तन यांत मेळ साधणाऱ्या ज्या काहीं व्यक्ति आहेत, त्यांत संत एकनाथांचा[१] क्रमांक बराच वर लागेल. संसारांत राहून त्यांनीं संत पदवी मिळविली. तुकाराम महाराजांसारखे ते संसाराला कंटाळलेले नव्हते. संसार उत्तम प्रकारें करून त्यांनीं आत्मकल्याण व लोककल्याण साधलें. ज्या भागवतधर्माचा प्रसार त्यांनीं केला, त्यांत सर्व गोष्टी ईश्वराला अर्पण अर्पण केल्या आहेत, अशा बुद्धीनें जगांत व्यवहार करावयास सांगितलें आहे. स्वतः नाथांचें जीवन आणि संसार हीं दोन्हीं परोपकारार्थ होतीं. अतिथी-अभ्यागतांना ते सदैव आसरा देत. ब्राह्मण महार हा भेद त्यांना कधीं शिवला नाहीं. (तैसा काया वाचा मनें प्राणें। साधु यादला उपकारा कारणें। आपलें पारखें म्हणों नेणें। उपकारू करणें सर्वांसी॥ (एक भा. ११ अ.) ब्राह्मणांकरितां शिजविलेलें अन्न त्यांनीं त्यांच्या महार पाहुण्यांना वाढलें, एका महारासमवेत ते एकाच बिछान्यावर झोपले, काशीहून रामेश्वराला गंगेची कावड ते घेऊन जात असतांना त्यांतील गंगोदक पाजून एका गाढवाचे प्राण त्यांनीं वाचविले, गंगास्नान करून

१ एकनाथांचा जन्म शके १४७० (पांगारकरांच्या मतें जन्म शके १४५५) व मृत्यु शके १५२१. हे पैठणचे राहणारे. यांचे पणजे सुप्रसिद्ध संत भानुदास (शके १३७०) हे होत. जनार्दनस्वामींजवळ यांनीं शके १४८० मध्यें उपदेश घेतला. दत्तपरंपरा व भागवतपरंपरा अशा दोन परंपरा एकनाथांत एकवटल्या आहेत. दत्तपरंपरेप्रमाणें यांनीं हिंदुमुसलमानांत ऐक्याचे प्रयत्न केले व भागवत परंपरेप्रमाणें भक्तिमार्गाचा प्रसार केला. दत्तपरंपरेंत शिव व विष्णु ह्या उपासना एकरूप आहेत. नाथांनीं ज्ञानेश्वरीच्या अनेक प्रती मिळवून शके १५०६ मध्यें एक शुद्ध प्रत तयार केली

ते परत येत असताना एक यवन त्याच्या अंगावर वारंवार थुंकला. तरी त्यांची शांति ढळली नाहीं, या व अशा त्यांच्या चरित्रातील काहीं हकिगतींवरून 'सर्वत्र समभाव' हें जे भागवतधर्माचें मुख्य लक्षण तें त्यांनीं किती आत्मसात् केलें होतें हें दिसतें. ज्ञानेश्वरी, रामायण व भागवत या ग्रंथांवर ते प्रवचनें करीत. आपापलीं कर्तव्यें करूनहि, संसारात उत्तम नागरिक या नात्यानें राहूनहि, मनुष्याला आत्मोन्नति कशी करता येते हें त्यांनीं उत्तम प्रकारें दाखवून दिलें

ज्या क्षेत्रात एकनाथ राहात तें पैठण क्षेत्र विद्वत्तेचें आणि कर्मठपणाचें माहेरघर होतें. शालिवाहन व आंध्र राजाच्या ह्या एका काळच्या राजधानींत विद्वत्तेचा व कर्मकांडाचा खूपच बडेजाव होता. पैठणाला त्याकाळीं दक्षिणकाशी म्हणत. अशा क्षेत्रात राहून त्यांनीं अत्यंत सोप्या अशा भागवतधर्माचा किंवा भक्तिप्रधान धर्माचा प्रसार केला हं विशेष होय "वेदांत सिद्धांत पाहता खटपट। वाउगा बोभाट नामाविण । नामें होय भुक्ति नामें होय मुक्ति । नामें वैकुंठ प्राप्ति सर्व जीवा," "नाम पाठ सोपा भोळ्या भाविकासी । मतवादीयासी न रुचे नाम" असा त्यांचा ठाम सिद्धांत होता आद्य शंकराचार्यांनीं "सारूनि कर्मठतेचा विचारू" ज्ञान मार्ग पसरविला, असे नाथ म्हणतात. त्यातच थोडा बदल करून आपणाला असें म्हणता येईल कीं, "सारूनि कर्मठतेचा विचारू" एकनाथांनीं भक्तिमार्गाचा किंवा भागवतधर्माचा प्रसार केला.

नाथांच्या काळीं महाराष्ट्रात मुसलमान राज्यकर्त्यांचा अमल होता. उत्तरेकडील मोंगल राजाचा कडवेपणा व क्रूरपणा जरी दक्षिणेंतील बहामनी राजांत नसला, तरी मुसल्मानी धर्माचा प्रसार करण्याचा त्यांचा प्रयत्न चालूच होता अशा काळात हिंदुमुसलमानात ऐक्य निर्माण करण्याचा एकनाथांनीं प्रयत्न केला हें त्यास भूषणावह होय सर्वत्र समताबुद्धीनें वागणाऱ्या नाथांना हिंदुधर्म व मुसल्मानी धर्म यात समता न आढळली तरच नवल हिंदु तुर्क संवाद, ह्मसी, फकीर, दरवेश इत्यादि त्यांच्या भारूडात ही समता स्पष्टपणें आढळते. आपापल्या धर्माचा मोठेपणा अहंकार बुद्धीनें गाणाऱ्या एका हिंदु व एका तुर्क अशा दोन

मागमाचा सजाट काव्यमय भाषेत वर्णन करून, शेवटीं दोघांची मैत्री झाल्याच हिंदुतुर्कसंवादात आहे हाएसी भारूडात पुढील ओळी आढळतात — "ख्याल वींया मच्छलीवाले वर्ले । दयोंव धुंडे गोविंद महमद । खेळ खिलाने आरा महमद ॥ १ ॥ .. नक्का घरका कान्हा वर्ले । खेले जमुना तीर महमद । कंस मामाकु मारिये वर्ले । राज्य दिया उग्रसेन महमद ॥" फकीराच्या भारूडात रामरहीमाचें ऐक्य पुढील शब्दात वर्णिलें आहे, "हजरत मौला मौला । सब दुनया पालनवाला ॥१॥ सब घटमो साई बिराजे । करत इय बोलबाला ॥२॥ जीन रूपसे है जगत पसारा । वोही सलाल अल्ला ॥५॥ एका जनार्दनीं निज यद अल्ला । आखल वोही विस्पर अल्ला ॥६॥"

मराठींत ग्रंथरचना करावयाची ज्ञानेश्वरापासून चालत आलेली परंपरा एकनाथानीं जोमानें चालू ठेविली. त्यांचा भक्तिमार्ग बहुजनसमाजाकरिता होता त्या समाजाला संस्कृत भाषेचें ज्ञान नव्हतें तेव्हा जरी एकनाथ पैठणसारख्या संस्कृत पंडितांच्या नगरींत राहात असले आणि स्वत चांगले व्युत्पन्न पंडित असले, तरी त्यानीं आपले ग्रंथ 'भाळ्याभोळ्या' लोकाना समजतील अशा सुबोध मराठींत लिहिले. मराठीविषयीं त्याना किती जाज्वल्य अभिमान वाटत होता तो भागवतातील पुढील आधारावरून दिसून येईल "संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवी । मा प्राकृतीं काय उणीवी । नवीं जुनीं म्हणावीं । कैसेनि कवीं सुवर्णसुमनें ॥ कपिलेचें म्हणावें क्षीर । मा इतरांचें तें काय नीर । वर्णस्वाद एकचि मधुर । दिसे साकार सारिखें ॥ जें पाविजे संस्कृत अर्थे । तेंचि लाभे प्राकृतें । तरी न मनावया येथ । विषमचि तें कायी ॥ संस्कृतवाणी देवें केली । तरी प्राकृत काय चोरापासोनि झाली । असोतु या अभिमान भुली । वृथा बोलीं काय काज ॥" हस्तामलकाच्या प्रारंभीं एकनाथ म्हणतात, 'ऐका माझी हे मऱ्हाटी । जनार्दनकृपापरिपाटीं । नि शब्दाच्या साग गाठी । चिन्मात्रीं मिठी घाऽली ॥" नि शब्दाच्या गोष्टी सांगणाऱ्या मराठीच्या सामर्थ्याविषयीं नाथाना किती विश्वास वाटत होता तो या उताऱ्यावरून दिसतो

एकनाथानीं ग्रथरचना बरीच केली. त्यापैकीं चतुःश्लोकी भागवत, हस्तामलक शुकाष्टक, स्वात्मसुख, आनंदलहरी, भागवताच्या एकादशस्कंधावरील टीका, रुक्मिणीस्वयंवर, पौराणिक आख्यानें, भावार्थरामायण, संतांचीं चरित्रें, अभंग व भारुडें हीं मुख्य होत. चतुःश्लोकी भागवत हें मूळ भागवताच्या दुसऱ्या स्कंधाच्या नवव्या अध्यायात असून त्याचे ४५ श्लोक आहेत. नाथानीं त्याच्या स्पष्टीकरणार्थ १०३६ ओंव्या रचिल्या नाथाचे गुरु जनार्दनस्वामी याच्याबरोबर हिंडत असताना चंद्रावती नगरींत गुर्वाज्ञेवरुन त्यानीं ही सुरुवातीची रचना केली. हा छोटा ग्रथ अध्यात्मपर असून तो जनार्दनस्वामींना इतका आवडला कीं, त्यानीं त्याची तारीफ करुन एकनाथाना एकादशस्कंधावर मोठा ग्रथ रचावयास सांगितलें. हस्तामलक हें आद्य शंकराचार्यविरचित १४ श्लोकाचें अध्यात्मपर स्तोत्र असून त्यावर नाथानीं ६७४ ओव्यांचें विस्तृत भाष्य केलें आहे. "जग भासे जें सकळ। तो जगदात्माचि निखळ।" अशा प्रकारचा सिद्धात यात मांडिला आहे. शुकाष्टक नावाच्या लहान अध्यात्मपर अष्टकावर एकनाथानीं ४४७ ओव्या रचिल्या आहेत हीं छोटीं प्रकरणें आपापल्या परीनें मधुर असलीं तरी नाथाची कीर्ति अजरामर व्हायला त्याचें भागवतच कारणीभूत झालें आहे. भागवताच्या एकादशस्कधात ३१ अध्याय असून १५०० श्लोक आहेत नाथानीं भागवतधर्माचें भाष्य करण्याच्या हेतूनें त्यावर वीस हजार ओव्याचा प्रासादिक ग्रथ तयार केला. गुरुवर्णनात, भक्तिच्या स्वानुभव वर्णनात, ईश्वराच्या सगुणरुपाच्या वर्णनात, नाथाची काव्यशक्ति बहरते, भाषेला ओज चढते, आणि ओवीच्या रचनेंत सफाई व नादमधुरता येते. या ग्रंथाचा आरंभ पैठणात झाला असला तरी ग्रथाचा चार पचमाश भाग काशींत तयार झाला. ग्रथाचा समाप्तिकाल विक्रम शके १६३० कार्तिक शुद्ध पौर्णिमा किंवा शालिवाहन शक १४९५ असा आहे. उपसंहाराच्या शेवटल्या भागात नाथ म्हणतात, "जनार्दनें नवल केलें। मूर्खाहातीं ज्ञान बोलविलें। ग्रंथीं परमार्थरुप आणिलें। वाखाणिलें एकादश॥ .. ग्रथ देशभाषा व्युत्पत्ती। म्हणोनि नुपेक्षावा पंडितीं। अर्थ पहावा यथार्थी। परमात्मस्थितीं

निजनिष्ठा ॥...ग्रंथारंभ प्रतिष्ठानीं। तेथ पंचाध्यायी संपादूनी। इतर ग्रंथाची करणी। आनंदवनीं विस्तारिली ॥ ...भाळे भोळे विषयीजन। याचें करितां श्रवण पठण। हरिभक्त होती जाण। सन्मार्गी पूर्ण चहुत होती ॥ हे टीका तरी मराठी। परी ज्ञानदानें होईल लाठी। ऐसें निजगुरें बोलोनि गोठी। कृपादृष्टि पाहिलें ॥ .. जनीं जनार्दन एक। जाणे तो सुटला नि शेख। ईचि नेणोनिया लोक। गुंतले अनेक भवचक्रीं ॥" यात आपलें गुरुप्रेम, स्वभाषाप्रेम जसें त्यानीं व्यक्त केलें आहे, तसेंच जनी जनार्दन पाहण्याचें ग्रंथाचें सारहि सांगितलें आहे. डॉ. श्री र. कुलकर्णी म्हणतात त्याप्रमाणें ऋतरक्षणार्थ धर्म (ऋतविश्वविकासाचे नियम) धर्मार्थ कर्म, कर्मदोष परिहारार्थ भक्ति, भक्तीच्या साफल्यासाठीं निष्काम कर्म आणि ब्रह्मप्राप्ति साठीं कर्मब्रह्माची एकरूपता नाथ-वाङ्मयानें उपदेशिली आहे.

भागवतधर्मांची सुलभता व सर्वसंग्राहकता विशद करून सांगत असतांना नाथ म्हणतात., "भागवतधर्मांची व्याप्ती। सप्रेम आदरितां प्रीतीं। तेणें तुष्टोनिया श्रीपती। दे सेवकाहातीं आपणियां ॥ इंद्रियें कोंडितां न कोंडिती। विषय सांडितां न सांडती। पुढत पुढती बाधों येती। या लागीं हरिभक्ती बोलिली वेदें ॥ दारा सुत गृह प्राण। करावे भगवंतासी अर्पण। हे भागवतधर्म पूर्ण। मुख्यत्वें भजन या नांव ॥ न करितां नाना व्युत्पत्ति। सुगमोपायें ब्रह्मप्राप्ती। अनळें तारावया निश्चितीं। भगवंतें निजभक्ति प्रगट केली ॥ स्त्रीशूद्रादि आघवे। धांवूनिया ये नावे। येरेंचि खेपे स्वयें न्यावे। भजन भावे पलतीरा ॥ भागवत धर्मांचिये स्थिती बाळीं भोळीं भवाब्धि तरती। सुखोपायें ब्रह्मप्राप्ती। होय निश्चितीं मवळिकां ॥ अध्याय दुसरा ॥ महाराष्ट्रातील अशिक्षित बहुजन समाजाची काळजी नाथांना वाटत होती. त्यामुळें त्यांच्या पारमार्थिक कल्याणा करितां भक्तीचा सुलभ उपाय त्यानीं आपल्या भागवतात निवेदन केला आहे. सर्वांभूतीं भगवद्भाव हा भागवतधर्मांचा आत्मा आहे, आणि तो अनन्य भावानें ईश्वराची भक्ति केली असतांना प्राप्त होतो असा नाथांचा निश्चय आहे.

नाथाचा सर्वांत मोठा ग्रंथ भावार्थ रामायण हा होय. याची ओंवी संख्या चाळीस हजार असून, त्यांपैकीं २५ हजार ओव्या नाथाच्या व पंधरा हजार ओव्या त्याचा शिष्य गावबा याच्या आहेत. युद्धकांडाचे ४४ अध्याय झाल्यावर नाथांचे प्रयाण झालें व नंतर उरलेला भाग त्याच्या शिष्यवरानें पुरा केला. हिंदुस्थानात रामप्रेमाला या काळात जणू भरती आली होती. कारण ज्या वेळीं नाथ भावार्थ रामायणाची रचना करीत होते, त्याच सुमारास संत तुलसीदास आपल्या रामायणाची रचना करीत होते. कृष्णदास मुद्गल यांचे युद्धकांड याच काळात लिहिलें गेलें. हा योगायोग विलक्षणच म्हटला पाहिजे. नाथाच्या रामायणातील वर्णनें सरस व रमणीय असून जागोजागीं अध्यात्मविचाराचीं सुंदर उपवनें आहेत. मराठींत पौराणिक आख्यानें नाथाच्या पूर्वी महानुभाव कवींनीं गाइलीं असलीं, तथापि तीं लोकप्रिय करण्याचें श्रेय नाथानाच दिलें पाहिजे. नाथ कांहींहि लिहीत असले तरी त्यांची दृष्टि अध्यात्मावर असे, हें त्यांचे वैशिष्ट्य होय. याच-मुळें 'आत्मप्रबोध तो लक्ष्मण । भावार्थ तो भरत जाण । निजनिर्धार तो शत्रुघ्न आनंदविग्रही पूर्ण श्रीराम' असे ते म्हणतात. विवेक आणि विचार तसे विश्वामित्र व वसिष्ठ, त्यांपाशीं राम शस्त्र व शास्त्र शिकला. अशा पद्धतीनें नाथांनीं आपल्या रामायणाची अध्यात्मपर रचना केली आहे.

नाथाचें रुक्मिणीस्वयंवर शके १४९३ मध्यें तयार झालें. त्याचे अठरा अध्याय असून, ओंवी संख्या सुमारे दोन हजार आहे. "ये ग्रंथींचें निरोपण । जिवाशिवा होतसे लग्न । अर्थ पाहतां सावधान समाधान सात्विका ॥" असे याहि ग्रंथाचें आध्यात्मिक स्वरूप त्यांनीं सांगितलें आहे. श्रीकृष्णस्वरूप, रुक्मिकृत कृष्णनिंदा, रुक्मिणीची कृष्णप्रीति, सुदेवप्रेरण, द्वारकावर्णन, रुक्मिणी-पत्रिका, विवाह समारंभ इत्यादि प्रसंग यांत आले असून ते बहारीचे आहेत. याच कारणानें हें आख्यान अत्यंत लोकप्रिय असून, त्याचीं पारायणें अनेकांकडून होत असतात. एकनाथाच्या पूर्वी नरेन्द्र कवि (शके १२१४), नृसिंह कवि (शके १३२५), संतोषमुनि कृष्णदास (शके १४७५), कवि कृष्णडिंभ विराट, लक्षधीर

कवि व कवि मंडळीक एल्हन अशा महा महानुभावीय कवींची रुक्मिणीस्वयंवर विषयक काव्यें असूनहि महाराष्ट्राचे प्रेम नाथाच्या रुक्मिणीस्वयंवरावर स्थिरावलें याचें कारण त्याचा साधेपणा. लोकांना पटतील अशा पद्धतीनें नाथांनीं विविध प्रसंग यात वर्णन करून, शिवाय त्यांना आध्यात्मिक बैठक मिळवून दिली आहे. नाथांचीं ध्रुव, प्रल्हाद, उपमन्यु व सुदामा हीं छोटीं आख्यानेंहि भाविकांच्या नित्यपाठात आहेत. आख्यानक कवितेच्या जनकत्वाचा मान महानुभाव कवींकडे जात असला तरी ती लोकभोग्य व लोकप्रिय बनविण्याचें श्रेय नाथांनाच दिलें पाहिजे.

नाथांच्या भारुडात (बहुरूद) तत्कालीन महाराष्ट्राची परिस्थिति उत्तम प्रकारें दिसते. पंधराव्या शतकातील महाराष्ट्र किती बहुविध प्रकारचा होता याचें ज्ञान या भारुडांवरून होतें. हीं भारुडें सुमारें तीनशें असून, त्यात सव्वाशेंच्या वर विषय आले आहेत. यात विनोद, चमत्कृति, अद्‌भुतपणा, अध्यात्मवाद, सामाजिक चालीरीतींवर टीका, उपदेश याचें मिश्रण आहे. यातील भाषेचें स्वरूपहि मिश्र आहे. एकनाथी भागवतात उर्दु शब्द क्वचित्‌च येतात. परंतु अर्जदास्त, मानचिठ्ठी, ताकीदपत्र, हापशी सारख्या भारुडांत तत्कालीन प्रचलित असे शेंकडो उर्दु शब्द आले आहेत. डौर, नानक, जोगी, फकीर, दरवेश, हापसी, जोगवा, वेसकर, महारीण, चोपदार, गोपाळ, वासुदेव, जोशी, जंगम, माळी वाघ्या, पोपट, विंचू, टिटवी, विंगळा, चौपदा इत्यादि जे वेगवेगळे विषय या भारुडांत आले आहेत, त्यावरून त्यांचा व्यापकपणा स्पष्ट होईल. किती विविध प्रकृतीच्या लोकांशीं नाथ समरस होऊं शकत असत हेंहि या भारुडांवरून दिसतें. नाथांना सर्व लोकांत सर्वां समभावानें नांदणारा महापुरुष दिसतो. कोणाचा तिरस्कार नाहीं, कोणाचा द्वेष नाहीं, अशा महानुभूतीच्या भावानें नाथांनीं हीं भारुडें गाईलीं असून "वैकुंठीचा दारवंटा" सर्वांना उघडा केल्याचें जाहीर केलें आहे. नाथांच्या ठिकाणीं विनोदबुद्धि भरपूर असल्यानेच ते सर्वांशीं समरस झाले, याचाहि प्रत्यय या भारुडांत जागोजागीं जीं विनोदी वर्णनें आहेत त्यावरून येतो. हीं भारुडें वाघेमुरळ्या, गोंधळी, भराडी, वासुदेव

वगैरे मंडळी अजूनहि अनेक ठिकाणीं म्हणताना आढळतात या गोष्टीवरून तीं किती लोकप्रिय आहेत तें कळतें या सर्व भारुडांत 'दार उघड बया दार उघड' या शब्दांनीं सुरू होणारें आदिमायेवरील भारूड अत्यंत ओजस्वी आहे. कांहीं भारुडांत आध्यात्मिक कोडीं आलीं आहेत. त्यामुळें तीं कळायला अवघड वाटतात मल्हार पाव ग मला, भवानी आई रोडगा वाहीन तुला, कान्होबा नवल सांगतो गोष्टी । एक वृक्ष दृष्टीं देखिला तयावरी सृष्टी-सारखीं भारुडें या सदरांतलीं येतात. नाथांनीं कांहीं अभंग व पदेंहि रचिलीं आहेत. मन रामीं रंगलें, अशा कसा देवाचा देव बाई ठकडा, तें मन निष्ठुर का केलें इत्यादि पदें व 'नाम वदता हे वैखरी, चित्तधावे विषयावरी', 'नाम मुखीं गाता विषयाची वार्ता, नोहेचि सर्वथा गातयासी' इत्यादि अभंग वारकरी मंडळींत रूढ आहेत. नाथांच्या कवितेंत ज्ञानदेवाचा प्रतिभाविलास नसला, तरी तींत प्रसाद, शुचिता, प्रेमळपणा व अर्थाची पोटी ही भरपूर आहेत.

एकनाथ पंचायतनांत एका जनार्दन, रामा जनार्दन, जनी जनार्दन, विठा रेणुकानंदन व दासोपंत यांचा अंतर्भाव होतो त्यापैकीं एकनाथाचा विचार वर आपण केलाच आहे. रामा जनार्दन यांची रचना कांहीं फारशी प्रसिद्ध नाहीं. 'आरती ज्ञानराजा महाकैवल्य तेजा' ही त्यांची आरती मात्र वारकरी संप्रदायांत सर्वतोमुखीं झालेली आहे. जनीजनार्दनाचा ( शके १५२३ ) निर्विकल्प ग्रंथ उर्फ उद्धवबोध हा सुमारें सातशें ओव्यांचा ग्रंथ असून त्यांत कृष्ण व उद्धव यांच्या संवादाच्या रूपानें माया, ब्रह्म, जीवशिव, सगुणनिर्गुण इत्यादि विषयांची चर्चा आली आहे. विठा रेणुकानंदनाची कविता कोठें ऐकिवांत नाहीं या पंचायतनांत एकनाथाच्या खालोखाल जर कोणता मोठा कवि झाला असेल तर तो दासोपंत ( शके १४७३ ते १५३७ ) हाच होय हा नाथापेक्षा वयानें लहान असून जोगाईच्या आंब्यास राहात असे यानें दोन तीन लाखावर कविता लिहिली आहे असें म्हणतात. गीतार्णव, पदार्णव, गीतार्णवबोध, अवधूतराज, प्रथराज, पंचीकरण इत्यादि सुमारें पन्नास लहान मोठे ग्रंथ यानें लिहिल्याचें धुळ्याचे शंकरराव देव यांनीं प्रसिद्ध केलें आहे. गीतार्णवाच्या सव्वालाख ओवी असून,

त्यात गीतेचें तत्त्वज्ञान अगदीं सोपें करून सांगण्यात आलें आहे. गीतार्णवाचे दिगंबरानुचर, दिगंबर किंवा दास असे लेखकाचें नाव आढळतें. दासाचें लोकांनी दासोपंत बनविलें. गीतार्णवात सर्वत्र लेखकाचा आत्मप्रत्यय व स्वतंत्र निस्वार्थ बाणा दिसतो. “न पाहे श्रोतयाचें वदन। न करी भाष्याधारें विवरण। स्वस्वानुभवें हें मनन। म्हणोनि सांगातीं॥ आवडेल तेणें आइकावें। मानेल तेणें घ्यावें। नावडे तेणें नेघावें। दोहीं थरणीं॥ स्वताप्रत्ययिक जे योगी। यया मननाचे विभागी। टीका हे तयांचि जोगी। तेहीं आइकावी॥ स्वानुभवचि येथिचें प्रमाण। स्वानुभव हेंचि साधन। अन्यत्र शास्त्रश्रवण। तैसें नव्हे॥ प्राकृत म्हणोनि दूषिती। तेचि यया शाना घचिती। भाषाचि केवळ भजती। ते मूर्ख कीं ना।”—अशा प्रतिभोत्तरानें भारल्या गीतार्णवाची रचना दासोपंतांनी केली आहे. दासोपंताचा ग्रंथराज हा ग्रंथ रामदासाच्या दासबोधाचा पूर्वावतार म्हणता येईल. याचीं आठ प्रकरणें असून ओवीसंख्या बाराशें आहे. गुरुलक्षणें, असच्छिष्य, अध्यात्माची महती इत्यादि यांतील प्रकरणें दासबोधातील असल्या प्रकरणांसारखींच आहेत. समर्थांना ग्रंथराजावरून दासबोध रचण्याची स्फूर्ति मिळाली असण्याचा संभव आहे. दासोपंताचीं पदें सहस्रावधि असून तीं भावपूर्ण व रमणीय आहेत. या पंचायतनाचें दत्तोपासना हें जें वैशिष्ट्य आहे, त्याला अनुरूप अशीच पदें दासोपंताचीं आहेत. वाट पाहतां वेळ जाहला यो बाईये। श्रीदत्त गुंतला कोठें अजुनि का नये॥धृ०॥ बहु दिवस नमले सखये, मी काये करूं। भेटी नये अवधूत याचे पाय धरूं॥धृ०॥ इत्यादि पदांतील आर्तता व प्रेमळपणा पाहिला कीं नामदेवाची आठवण झाल्याखेरीज राहात नाहीं.

एकनाथ पंचायतनातील कोणत्याहि कवींत उत्कट प्रकारचा प्रतिभाविलास आढळत नाहीं हें खरें आहे. काव्याकडे ते कलाविलासाच्या दृष्टीनें न पाहता उपदेशाचें एक साधन म्हणून पाहत असलेले स्पष्ट दिसतात. महाराष्ट्रातील सर्व जातींच्या लोकांना ईश्वरप्राप्तीचा भक्ति हा सुलभ उपाय त्यांनीं दाखविला आणि महाराष्ट्रातील मुसलमानांच्या राजवटींत जितकें धर्मैक्य त्यांना करता आलें तेवढें त्यांनीं केलें. “अगाध बुद्धीचा प्रकाशु। अवघा देव हा उपदेशु। परंतु

चित्सदानंदलहरी नावाची अवग हजार ओव्यांची टीका लिहिली असून, ती वरीलशीं ज्ञानेश्वरीला धरून आहे शंकराचार्यांच्या योगानपवक्रावरहि यानें दोन हजार ओव्यांची टीका मराठीत केली आहे. रगनाथ निगडीकरानें योगवासिष्ठसार (शके १५८४) नावाचा ग्रंथ लिहिला आहे. नाशिक जिल्ह्यातील कृष्ण याज्ञवल्की (सुमारे शके १६००) व मधुकर कवि या दोघांनीं मिळून कथाकल्पतरु (शके १५४५) नावाचा सुमारे चाळीस हजार ओव्यांचा ग्रंथ लिहिला आहे. यांत भारत, भागवत व इतर पुराणें यांतील कथा मनसोक्तपणें सांगितल्या आहेत यांतील पूर्वार्ध कृष्ण याज्ञवल्कीचा असून उत्तरार्ध मधुकर कवीचा आहे. बुऱ्हाणपुरच्या लोलिंबराजानें (शके १५०० ते १५७०) वैद्यजीवन व रत्नकलाचरित्र हीं काव्यें रचिलीं आहेत खानदेशांतील महालिंगदास (शके १४४७ ते १४८६) यानें अश्वचिकित्सा किंवा शालिहोत्र नावाचा अश्वपरीक्षेवर ग्रंथ लिहिला असून त्याशिवाय सिंहासनबत्तिशी (१४८७), वेताळ पंचविशी (१४८६), पचोपाख्यान इत्यादि पद्यमय कथाग्रंथ रचिले आहेत याचाच चाणक्यनीति नावाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे प्रेमदास या कवीनें कालगमना या विषयावर 'मूळस्तंभ' नामक ग्रंथ लिहिला असून, नरसिंह कवीनें 'सामुद्रिक' शास्त्रावर ग्रंथरचना केली आहे एकनाथाच्या काळीं धर्मेतरहि कांहीं ग्रंथ तयार होत होते त्याचा हा पुरावा म्हणता येईल श्री अमृतानंदकृत योगराज टिळक (ओव्या ३३०) हा योगविषयक गुरुशिष्यसंवादात्मक ग्रंथ आहे. हा ग्रंथ प्रत्यक्ष दत्तात्रेयानें अमृतानंदाला सांगितला व त्यानें तो लिहिला असा भाव यात आहे.

आणखी एका ग्रंथाचा उल्लेख केल्यावाचून एकनाथाच्या काळाचें स्वरूप पूर्णपणें लक्षांत येणार नाहीं. हा ग्रंथ सुप्रसिद्ध गुरुचरित्र (शके १४८० सुमारे) होय. याच्या लेखकाचें नाव सरस्वति गंगाधर साखरे (जन्म सुमारे शके १४५०) हें होय या ग्रंथात श्रीपाद वल्लभ व नृसिंह सरस्वति (शके १३८० सुमारे) यांच्या लीला व इतर तात्त्विक विवेचन आलें आहे याची ओवीसंख्या सात हजार असून अध्यायसंख्या त्रेपन्न आहे गेलीं चारशे वर्षे झालीं या ग्रंथावरील

महाराष्ट्रीयांचे प्रेम व आदर यांना साक्षी भरतीच येते आहे. एकनाथाच्या भारुडावरून जशी तत्कालीन हिंदुमुसलमान मिश्र संस्कृतीची व अठरा पगड जातीची कल्पना येते, तशीच प्रस्तुत ग्रंथावरूनहि येते. यवन, शबर, रजक, माग, वैश्य, ब्राह्मण, वेश्या इत्यादिकांच्या ज्या कथा गुरुचरित्रात आल्या आहेत. त्यावरून, हिंदुमुसलमानांना व हिंदूतील सर्व जातींना समत्वाच्या एका धाग्यानें बांधण्याचा प्रयत्न कसा करण्यांत आला आहे तो दिसतो. दत्तसंप्रदायातील लोकांना हा ग्रंथ वेदवाक्यप्रमाणें वाटतो.

याच काळात मराठीभाषेचें व लिपीचें रूप बरेंच पालटलें. बारावें शतकापर्यंत महाराष्ट्रात वृद्ध मात्रेचा प्रचार पुष्कळ होता. या काळात मात्रा अक्षराच्या मागें न देता, डोक्यावर देण्याचा प्रघात सुरू झाला. पळसदेवाच्या शिलालेखातील (शके १०७५) तीन शून्याची ई, त्रिकोणी ए, तीन उभ्या रेषांचा ण हीं अक्षरें आता अगदींच मागें पडलीं. जेथ, तेथ, याचेंबद्दल जथ, तथ हीं रूपें आलीं. म्हणौनि, वाचौनि, करौनि, हीं धातुसाधित अव्ययेंहि मागें पडलीं. आथिविना, होति मेरवले, पूजिजति वगैरे क्रियापदें नाहींशीं होऊं लागलीं. चौदाव्या शतकांतील सुप्रसिद्ध दुर्गादेवीच्या दुष्काळामुळें महाराष्ट्रातील बरेच लोक उत्तरेकडे व दक्षिणेकडे गेले. दुष्काळ सपल्यावर ते जेव्हा परत आले, त्या वेळीं त्यानीं आपल्याबरोबर कांहीं खेळाचे प्रकार व तदनुषगानें कानडी, तेलगु, व्रज वगैरे भाषातील अनेक शब्दहि आणिले. "औडक चौडक दामाडू। दामाडूचे पत्राडू," 'आटकमाटक चवे चाटक," "अटगुलें मटगुल, सोन्याच कटगुल," थकट-लेंट-मुंड-नार इत्यादि खेळात व खेळाच्या परिभाषात कानडी-तेलगु वगैरे भाषांचे रूप मराठींत प्रतिबिंबित झालेलें आढळतें. याच कालखंडात फारसी भाषेचाहि पुष्कळच परिणाम मराठी भाषेवर झाला. देवगिरीचें राज्य नाहींसें होताच मुसलमानांची सत्ता इकडे प्रबळ होऊन, तिचा भाषेवर बराच परिणाम झाला. जाधवाचें राज्य इ. स. १३१२ मध्यें समाप्त झालें बहामनी राज्य इ. स. १३४७ ते १४९० पर्यंत चालून पुढें त्याचीं शकलें होऊन पाच राज्यें झालीं. विजापूरच्या इब्राहिम आदिलशहा (इ स. १५५५)

यानें दरबारात मराठी भाषा सुरू केली. असें असलें तरी मराठी वाङ्मयाची या काळात पिछेहाटच झाली 'महाराष्ट्र सारस्वतकार' म्हणतात त्याप्रमाणें अर्जदाराच्या फिर्यादी काजीपुढें जाऊन त्याचा फैसला किंवा इनसाफ होऊ लागला गडकऱ्याचे नाईक पायीक, पाटील हे जाऊन त्यांच्या ऐवजी किल्लेदार व हवाल्दार आपल्या शिलेदार जमातीसह फौजेचा अमल करू लागले जे मुसलमान लोक होते व ज्यांचा राजकीय बाबींशीं संबंध नव्हता त्यांचे येथे देशील मेजवान्यांच्या वेळीं आतषबाजी होऊ लागली व मेवामिठाई व गुलाबी अत्तर हीं त्यांना लागू लागलीं पूर्वी सगळ, पावा रिम्मी हीं वाद्यें पुरत. त्यांची जागा ताऊस, ढोल, ताशे व मर्फे यानीं घेतली व साजरमानामागच्या मुसल्मा नांची नक्कल केलेल्या पक्वान्नाचा इकडील खाद्यपदार्थांत प्रवेश झाला राज्यकर्त्यांची भाषा मफाईनें लिहिणें व बोलणें ही एक थोरपणाची व अभिमानाची गोष्ट वाटू लागून वरच्या दर्जाचे लोक मुसल्मानी भाषेचा अभ्यास जोरानें करू लागले यामुळें त्यांच्या मराठी वाक्याची रचना फारशी भाषेतल्या वाक्यांच्या लकबीवर जाऊ लागली. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड १८ लेखांक ३६७ च्या पुढील उताऱ्यावरून फारशी भाषेची छाप शके १५११ च्या सुमारास मराठीवर किती पडली होती तिची कल्पना येईल अज रसतगाने राजश्री बाबाजी राने भोसले दामदौलतहू बिनानेवु कारकुनानी हाल व इस्तकबाल व मोकदमानी कसबे पेडगौऊ पा पाडपेडगौऊ निशानट सुरु समान तिसैन व तिमामया दरवज्र इनाम बद्दल धर्मादाऊ वे ॥

रामेश्वरभट बिन नारायणभट चिंतामणीभट बिन बाळभट सेकिन आरवी मुद्गल इचा जमीन दर सनाद प्रज रामजी चिपलढाणा गजदरायनी चावर सवा दुदमो नववदयाती व मदमुदु कुलबाव कुलकानू दिधले असे दुमाले वीन अवलादी अफलादी चालो दीजे दर हर साल खुदखताचा उजूर न कीजे तुम्ही तालीक घेऊनु असली खुर्दखत इनामदार मजकुरापासी दान मोर्तेनु

तेरीख २५

माहे जमादिलोवल् माहे जमादिलोवल्[1]

अशा रीतीनें सर्व सृष्टि जरी तुर्की पेहराव पेहरल्यासारखी झाली होती, तरी देखील गोंधळ, कथा, कीर्तनें वगैरे सारख्या घरगुती बातमीत व धर्मग्रंथांत मराठी भाषा बरीच निर्मळ राहिली. मनतन, जादुटोणे यासंबंधींचीं टिपणें, औषधोपचाराच्या नोंदी व बाडें ही निर्भेळ मराठींत लिहिलीं जात. औषधी ग्रंथात विठ्ठल गलाडूच्या रसरत्नदीपाची (शके १४००) भाषा शुद्ध मराठीच आहे. बायकांनीं आपलीं गाणीं, ओव्या, कहाण्या, भूपाळ्या, आरत्या यांचा वेष अस्सल मराठीच चालू ठेवला.

१ हिजरी सन ९९८ च्या प्रस्तुत धर्मादाय इनामपत्रान बाबाजी राजे भोंसले यांनीं आपल्या वर्तमान व भावी कारकुनांना व मुकादमांना कळविले आहे कीं, रामेश्वरभट बिन नारायणभट व चिंतामणभट बिन बाळंभट यांना कोणत्याहि प्रकारचा अडथळा न आणतां त्याचेकडे इनाम चालू ठेवावें व मूळ खुर्देखत इनामदारांना द्यावें. या इनामपत्रात साकिन (राहणारा) अव्लादअफ्लाद (वंशपरंपरा) रस्तखाना (कचेरी) अज (पासून) बजानब (कडे) दामदौलतहू (त्याचे राज्य चिरायु असो) बिदानंद (जाणोत) हाल व इस्तकबाल (विद्यमान व भावी) बिन (पुत्र) इत्यादि शब्द फारसी आहेत.

# ७

## मुक्तेश्वर[१]

मुक्तेश्वरानीं आपले सुप्रसिद्ध आजोबा एकनाथ यांची आख्यानक-कवितारचनेची परंपरा पुढे चालवून, तिची यशस्वी वाढ केली. एकनाथांनीं भावार्थ रामायण, रुक्मिणीस्वयंवर, ध्रुव, प्रल्हाद, उपमन्यु, सुदामा इत्यादि कथानकपर किंवा आख्यानक काव्यें लिहून तीं चांगलीं लोकप्रिय बनविलीं होतीं. मुक्तेश्वरानीं त्यांच्याच पावलावर पाऊल टाकून आपली कविता लोकादरास पात्र केली. त्यांनीं संक्षेप रामायण, मुक्तेश्वरी भारत, हरिश्चंद्राख्यान, शतमुख रावणाख्यान, शुकरंभासंवाद, श्रीएकनाथचरित्र इत्यादि कथामूलक काव्यें रचून पौराणिक कथा आबालवृद्धांच्या आवडीच्या बनविल्या. भगवद्गीता-टीका या सारखा टीकाग्रंथहि त्यांनीं लिहिला. मुक्तेश्वर काव्य त्यांच्या रचनाकालापासून आजतागायत उत्तम काव्याच्या सदरांत पडत आलें आहे. "श्रीमुक्तेश्वर कविवर यांतें कोण न शुभेच्छु वदील । वदो लक्ष जयाचें, यश त्याचें सत्य जेंवि मंदील." असें कविवर्य मोरोपंतानीं आपल्या सन्मणिमालेंत मुक्तेश्वरांविषयीं जें म्हटलें आहे,

---

१ मुक्तेश्वराच्या निश्चित जन्म, मृत्यु, गृहस्थिति, शिक्षण वगैरे माहितीचा अभाव आहे. त्याचा अदाजीं जन्मकाळ शके १५२१ असून मृत्युकाल शके १५७१ आहे. एकनाथांच्या गोदा नावाच्या मुलीचा हा मुलगा. बापाचें नांव चिंतामणी शास्त्री. मुक्तेश्वराचें खरें नांव मुद्गल. स्वतःच्या इष्टदेवतेचें नांव मुक्तेश्वर हें त्यांनीं पुढें स्वतःचें टोपण नांव म्हणून धारण केलें. लीला विश्वंभर ऊर्फ दत्तात्रेय हेच त्यांचे गुरु होत. 'विश्वंभर म्हणजे मुक्तेश्वरांचे आईबाप असें जें मानण्यांत येतें तें निराधार असल्याचें अ. का. प्रियोळकर यांनीं आपल्या मुक्तेश्वरकृत आदिपर्वाच्या अधिकृत प्रतीत दाखविलें आहे. मुक्तेश्वर राहणारे पैठणचे परंतु त्यांचे वंशज तेरवाड (कुरुंदवाडजवळ) राहतात. मुक्तेश्वराचें वृंदावन तेथेंच नदीकांठीं आहे

त्यावरून रसिकांच्या उड्या मुक्तेश्वरी काव्यावर किती व कशा पडत असत हें कळून येतें. लालित्यपूर्ण, भावपूर्ण, प्रासादिक परतु आकर्षक काव्य कसें ऱ्हावें याचा नमुना म्हणजे मुक्तेश्वरी काव्य होय. काव्यरचनेपासून एखाद्या कवीला आनंद होत असला, त्यांतील कलाविलास, स्वभावरेखन, प्रसगवर्णन यानीं तो खुलत असला म्हणजे विषय पौराणिक का असेना, त्याचें काव्य लालित्यपूर्ण व प्रासादिक बनतें. काव्य रचीत असताना मुक्तेश्वराच्या मनाची अशीच स्थिति असावी पौराणिक काव्यरचनेनें स्वतः कवीला व वाचकाला काय पुण्य मिळावयाचें असेल तें मिळेल, परतु मुक्तेश्वराचा त्या गोष्टीवर भर नाहीं. "मुक्तेश्वर कवीची वाणी। नवरसरसें मुगरणी। तृप्त करी सुख भाजनीं। श्रवणद्वारें संतातें (विराटपर्व १००-२)" यात म्हटल्याप्रमाणें नवरसात्मक काव्य रचण्याकडेच त्याचा ओढा विशेष होता. याचमुळें त्याच्या काव्यात अध्यात्माची खटपट या तत्त्वज्ञानाची रुक्ष चर्चा ही नसून रसात्मक कथाच प्रामुख्याने आढळतात. मोरोपंत शब्दांशीं खेळण्यात-क्वचित् कसरत करण्यातहि-धन्यता मानीत. मुक्तेश्वर भावनांशीं खेळण्यात कृतार्थता मानीत. मुक्तेश्वरी ओव्या साध्या पण मनोहर बनल्या आहेत याचें हेंच कारण होय. सस्कृत न जाणणाऱ्या बहुजनसमाजाकरिता आपण देशभाषेंत काव्य करीत आहोंत, याची जाणीव मुक्तेश्वरानीं सतत ठेविल्यामुळे त्याची कविता सुलभ तसेच सुरस झाली आहे.

मुक्तेश्वराच्या सर्व काव्यात त्याचें भारत अत्यंत लोकप्रिय आहे. मुक्तेश्वरी भारतापूर्वी नवरसी नारायणकृत महाभारत, विष्णुदासनामा याचें महाभारत हीं लोकांच्या माहितीचीं होतीं. तथापि तीं कांहीं रसिकांच्या आदरास पात्र झालीं नाहींत. मुक्तेश्वराचें भारत मात्र तयार होताच त्याचें अपूर्व स्वागत झाले. असलें स्वागत पुढें मोरोपंताच्या आर्याभारताचें झालें. परतु भावनोत्कटता व साधेपणा या दृष्टीनें मोरोपंताच्या भारतापेक्षा मुक्तेश्वराचें भारतच श्रेष्ठ ठरेल. "मोरोपंतापेक्षा मुक्तेश्वराच्या काव्यात ईश्वरीप्रसाद ज्यास्त दृष्टीस पडून त्याची काव्यप्रतिभा तप्तसुवर्णप्रतिमेप्रमाणें सर्वत्र उज्ज्वल दिसते. मुक्तेश्वरी भाषा साधी गोड व सरळ आहे. पताची ऐटदार, पाचापेचानीं भरलेली व खुबीदार आहे...

मुक्तेश्वराचें काव्य द्राक्षापाकाच्या वर्गांत मोडणारें असून पंताचें काव्य नारिकेल पाकाच्या वर्गांत मोडेल ... खेड्यातल्या श्रीमंत पाटलाची शहाणी आणि भाविकी नायको आणि शहरातल्या साधारण कारकुनाची हुशार आणि पक्की वस्ताद बायको ह्यांच्यामध्यें जें अंतर असतें, तें मुक्तेश्वर व मोरोपंत याच्या काव्यांत दिसून येतें" –असें जें के. प्रो श्रीधर विष्णु परांजपे यांनीं म्हटलें आहे तें सर्वस्वी योग्य आहे. मोरोपंताचें लक्ष शब्दचमत्काराकडे असे तर मुक्तेश्वराचें अर्थमाधुर्याकडे.

मुक्तेश्वरी भारतापैकीं आदि, सभा, वन, विराट, सौप्तिक व शांति हीं सहाच पर्वें उपलब्ध असली तरी त्यावरून मुक्तेश्वरी काव्याची योग्यता उत्तम प्रकारें अजमावितां येते "मुक्तेश्वर कवीची वाणी। व्यासाश्रयें चालके (वनपर्व ९० २)" असें कवि स्वतः म्हणत असले तरी अगदीं स्वतंत्र वाटेल अशा पद्धतीनें त्यांनीं आपल्या भारताची रचना केली आहे अनेक ठिकाणीं त्यांनीं व्यासाच्या कथांना अजिबात फाटा दिला आहे किंवा त्या अत्यंत संक्षेपानें सांगितल्या आहेत. उदाहरणार्थ मूळांत वनपर्वाचे ३१५ अध्याय असून, त्याचा सारांश मुक्तेश्वरांनीं अवघ्या १८ अध्यायांत आणिला आहे सुदेव पुरोहितानें दमयंतीला तिच्या दोन भुवयामध्यें असलेल्या रक्तवर्ण तिळावरून ओळखिली असें मुळांत वर्णन आहे मुक्तेश्वरांनीं तिच्या कपाळावर असलेल्या अमूल्य मण्यानें सुदेवानें तिला ओळखिली असें वर्णन केलें आहे मुळांतील मार्कंडेय समस्यापर्वाच्या १८२ ते २३२ अध्यायाची ओळख मुक्तेश्वरांनीं अवघ्या तीन ओव्यांत केली आहे अष्टावक्र, श्येनकपोती, सोमक, च्यवन, सागर, इत्यादि कथा त्यांनीं अजिबात गाळल्या आहेत. द्रौपदीचा धावा ऐकून कृष्ण शय्येवर, रुक्मिणीला सोडून उठला असें मुळांत वर्णन आहे परंतु मुक्तेश्वरांनीं तो जेवत असतांना उठला असें विगईचें वर्णन केलें आहे याशिवाय अनेक ठिकाणीं अगदीं स्वतंत्र वर्णनें त्यांनीं केलीं आहेत. नलोपाख्यानपर्वांतील नलदमयंतीचीं वर्णनें अत्यंत बहारीचीं व स्वतंत्र आहेत. काम्यकवनांतील भोजनाचें वर्णन असेंच सरस व स्वतंत्र आहे. मुक्तेश्वरी भारतांत जागोजागीं आलेलीं सृष्टिसौंदर्याचीं वर्णनें मनोरम आहेत जुन्या मराठी कवितेंत निसर्गाचीं वर्णनें नाहींत, असें म्हणणाऱ्यांनीं

महानुभाव कवि नरेंद्र व कविवर्य मुक्तेश्वर यांचीं काव्यें वाचल्यास त्यांचा भ्रमनिरास होईल. मुक्तेश्वरी वर्णनात एकच दोष आहे आणि तो म्हणजे कालविपर्यासाचा. स्वत:च्या काळातील युद्धरीति त्यांनीं भारतकालात लागू केली आहे. दुष्यन-राजाच्या अमलाखालील लोकात त्यांनीं इंग्रज, फिरंगी, हबशी यांचा समावेश केला आहे. ऋतुपर्ण राजाकडून भास्कराचार्यांच्या लीलावतीच्या आधारें वृक्षाच्या पानाची गनना करविली आहे तर जीमूतवाहनाचा पाडव्याच्या काळीं उल्लेख केला आहे. या दोषावरून मुक्तेश्वरांच्या काळातील परिस्थितीवर प्रकाश पडत असला, द्रौपदीवस्त्रहरणासारख्या प्रसगीं महाराष्ट्रातील अनेक पेठाचीं वर्णनें करण्यात त्याचा चोखपणा दिसत असला, तरी ते दोषच होत.

मुक्तेश्वरी भारतात अनेक आख्यानें केवळ अपूर्व आहेत. आदिपर्वातील दुष्यन्तशकुंतलाख्यान, वनपर्वातील नलदमयंती आख्यान व सावित्रीआख्यान, सभापर्वातील जरासंधवधाख्यान व वस्त्रहरणप्रसंग हीं काव्यदृष्ट्या बहारीचीं आहेत. यातील पात्राचें स्वभावरेखन, रसपरिपोष, अध्यायाचे आकर्षक व भावनोत्कट शेवट व इतर वर्णनें हीं उत्तम साधलीं आहेत. द्रौपदी, शकुंतला, दमयंती, इत्यादि स्त्रियाचीं मुक्तेश्वरानीं काढिलेलीं शब्दचित्रें केवळ अविस्मरणीय आहेत. वनपर्वात धर्मराजाच्या साधुवृत्तीची हजेरी द्रौपदीनें पुढील शब्दात घेतली आहे:— जेणें पाविजे परम दु:ख। काय तें साधुवृत्तीचें सुख। धैर्य उपहासिती लोक म्हणती दीनें अशक्त ॥ टाकिशी रायाचे धर्म। तोचि रायाते अधर्म। शातीनें क्लेश परम। दुःखवेसी भोगिशी ॥ व्यवहारीं शांति नये कामा। परमार्थे क्रोध नाशी धर्मा। जेथें ज्याचाचि महिमा। ते तेथेंचि योजावें ॥ उर्वशीच्या प्रलोभनाना दाद न देणाऱ्या अर्जुनाचें स्वभावरेखन अत्यंत चांगलें झालें आहे. अलंकाराच्या दृष्टीनें मुक्तेश्वरानीं मारवाडी स्त्रिया ज्याप्रमाणें स्वत चें सर्व शरीर अलंकारानीं मढवून विरूप करतात तसें आपल्या काव्याचें केलेलें नाहीं योग्य ठिकाणीं व अगदीं माफक व सुंदर दिसतील अशा तऱ्हेनें त्यांनीं मुख्यत अर्थालंकाराची योजना केली आहे. हे सर्वच अलंकार रमणीय आहेत. पुढील

चार दोन अलंकारांवरून त्याचें स्वरूप लक्षात येईल. परिमळामाजी कस्तुरिका। पुष्पामाजी नवमल्लिका। तैंवी दमयंती नरनायका। आवडली हृदयवर्ती॥ तैंवी दमयंती नागपद्मिनी भूपवृत्तातें अवलोकनी। नैषधराजहरिचंदनीं। वेंटाळिली मानसें॥ त्याद्दष्टुनी पाहता नयनीं। भैमी बोळखिली लक्षणीं। प्रपंचनिश्रामानी ज्ञानी। आत्मनिष्ठ बोळखे॥ वातें सारोनी अभ्रा। जैंवी लक्षिजे भार्गवतारा। तैंवी वारुनी कररीमारा। रुक्मणी देखिल्या॥ कदलारण्याचे पुढील वर्णनहि किती सुंदर आहे पाहा :—तेथें चंदन पारिजात। देवदार केतकी सुपुष्पित। तुळसीवनें सुशोभित। दवनें वनें घमघमिती॥ सरिता सरोवरिचीं पैं जळें। पद्मागंध सुशीतळें। रातोत्पळें नीळोत्पळें सीतोत्पळें कनकाचीं॥ तेथें राजहंस कारंडक। चकोर सारस चक्रवाक। करींद्र करिणी करियारक। स्वेच्छा करिती जळक्रीडा॥ सदा सर्वदा पुष्पीं फळीं। वृक्षलतानी भूमंडळीं। जैसा कुलीन ऐश्वर्यकाळीं। विनयें भरे सर्वांतें॥ अमल्या सरस काव्यस्थळांना उद्देशूनच हरि नारायण आपटे म्हणतात, "व्यास विदत्त्व आणि कवित्व यांचें मिश्रण पाहावयाचें असेल त्यांनीं वामन पंडित व मोरोपंत यांचे ग्रंथ पहावे, रसपरिपाक, वर्णन सौंदर्य व भाषेची अत्यन्तमनोहरता ज्यास हवी असेल, त्याचें मन रंजविण्यास मुक्तेश्वर तयार आहेत .. निसर्गमनोहर अशा युवतीच्या दर्शनानें जो आनंद होतो, तो आनंद मुक्तेश्वराच्या काव्यावाचून होतो."

*रसाळ वाणी व उत्कृष्ट कवित्वशक्ति अंगीं असून मुक्तेश्वर अत्यन्त विनयशील* होते. पुढील ओव्यांवरून हा मुद्दा चांगला लक्षात येईल : मुक्तेश्वर विनवी संता। कृपाहस्त ठेऊनि माथा। दिकाल्न तरी बोटू कथा। गुरुत्वारिचें सारखी॥ अजळी ओढवी सिंधूदका। ब्रह्मांड उचलू म्हणे अलिका। तुम्ही कृपाळ तरी होय निका। तोच अगस्ती कीं शेष॥ मुक्तेश्वराची मनोआर्ती। कौरव माग संतापती। अवधान स्नेहाचिया हातीं। स्वल्पमुष्टि न धरावें॥

मुक्तेश्वराचें मराठी भाषेवरील किंवा ते म्हणतात त्याप्रमाणें देशभाषेवरील प्रेमहि विलक्षण होतें. संस्कृत पंडितांनीं भरलेल्या प्रतिष्ठान ऊर्फ पैठणवासल्या

सहगत राहूनहि त्यानीं मराठीचा आदर चालवला हें विशेष होय. आपलें मराठी काव्य संस्कृतच्या तोडीचें आहे असा आत्मविश्वास त्यांचा होता. म्हणूनच ते म्हणू शकले कीं, "व्यासवचन इक्षुदंडु । गाळूनि सुरस सागरा गोडु । देशभाषा वळिले लाडु । नावदेचे आवडी ॥ ते कैसे सुखी न सेवणें । तें आम्हांवाचूनि काय म्हणणें । कळरेखेस्तव चादणें । काय चकोरीं वाळिजे ॥ व्यास ग्रंथगिरीचें सोनें । संस्कृत खोडिये गाळूनि मनें । देशभाषा घडिलें लेणें । साहित्यरत्नीं सुजडित ॥ तें लेवविना कर्णभूषण । कांहो परते करावे कान । श्रोते हो तुम्ही विचक्षण । निर्मत्सर विचारा." पैठणस्थ पंडितानीं मुक्तेश्वराच्या काव्याकडे कदाचित् कानाडोळा केला असला, तथापि इतरानीं तसें केलें नाहीं, हें मोरोपंताच्या यापूर्वींच आलेल्या अवतरणावरून कळेल. मुक्तेश्वराच्या काव्याकडे मराठीभाषाभिमानी तो एक अमूल्य ठेवा आहे या दृष्टीनेंच पाहात आले आहेत व पुढेंहि पाहतील.

# ८

## तुका म्हणे—

देहूच्या तुकाराम[1] महाराजांना जाऊन आज तीनशेंच्यावर वर्षें झालीं असलीं, तरी ते महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाच्या गळ्यांतील ताईत बनले आहेत. याचीं कारणें अनेक आहेत. ते बहुजनसमाजापैकीं एक होते. 'यातीं शूद्र' असें ते स्वतःच्या जातीविषयीं सांगत होते. त्यांचा धंदा वाण्याचा होता असे असून सामान्य व्यवहारापलीकडे असलेल्या भक्तीचें आणि वेदांताचे ते धनी बनले. वामन पंडितांनीं त्यांच्या बाबतींत म्हणूनच असें म्हटलें आहे कीं, "ज्याची वदे पूर्ण वेदान्त वाणी, कसें हो म्हणावें तयालागीं वाणी ? परब्रह्मरूपी असा हा तुकाना, तयाचे तुकीं कोण दूजा तुकावा !" हिंदुस्थान देशांत दोन वाणी विशेष प्रसिद्धीस आले. एक महाराष्ट्रांतील तुकोबा व दुसरे सौराष्ट्रांतील महात्मा गांधी. *मनुष्याचा मोठेपणा हा त्याच्या जातीवर मुळींच अवलंबून नाहीं* हे दोघांनींहि सिद्ध केलें. प्रपंचांत रममाण झालेल्यांना परमार्थाची गोडी तुकोबांनीं लाविली. प्रपंच म्हणजेच सर्वस्व मानणाऱ्यांना देशहिताची दिशा गांधीजींनीं दाखवून दिली. जो नर करनी करे, तो नरका नारायण होय, ही म्हण तुकाराम महाराजांनीं अक्षरशः खरी करून दाखविली. त्याकरितां त्यांना कष्टसायास थोडे पडले असें नाहीं. अभ्यासीं नसलेलें चित्त त्यांना अभ्यासांत गुंतवावें लागलें, संतांचे ग्रंथ पाहावे लागले, कीर्तन करणाऱ्यांच्या मागें उभे राहून धृपद धरावें लागलें, संतांचा सहवास करावा लागला, आप्तेष्टांचे बोल सहन

---

१ जन्म—माघ वद्य ५ मी, गुरुवार शके १५२०. मृत्यु फाल्गुन वद्य २ शनिवार शके १५७१ (?) देहू येथें.

करावे लागले, सनातन्याकडून होणारा छळ सहन करावा लागला, स्वतःचे ग्रंथ इंद्रायणींत बुडवावे लागले, अशा एक कीं दोन, शेंकडो कसोट्याना त्याना उतरावे लागले साहजिकच त्याच्या तोंडीं पुढील उद्गार शोभतात :–साधूनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकातें डोळा न पाहवे ॥ साधूनी भुजंग धरितील हातीं । आणिकें कांपती देखोनिया ॥ असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ॥ सामान्य वाण्याचे परम भगवद्भक्त व संतशिरोमणि तुकोबा बनले म्हणून लोकांच्या आदरास ते विशेष प्राप्त झाले. ज्ञानेश्वर, एकनाथ रामदासादि संताना त्यांच्या उच्च कुळातील जन्मापायीं ज्ञानाच्या ठेव्यापैकीं बराच भाग जो सहजीं प्राप्त झाला होता, तसा तुकोबाना झाला नव्हता. स्वप्रयत्नानें त्याना ज्ञान मिळवावे लागलें.

संसारी लोकानाहि तुकाराम महाराज जवळचे वाटतात, याचें कारण त्यांच्याप्रमाणें तेहि संसारी होते. 'बहु पीडिलों संसारें', 'सवसारें जालों अतिदुःखे दुःखी', 'आसला हा जीव संसारींच्या सुखा' असे जें तुकोबानीं संसाराविषयीं स्वानुभवावरून म्हटले आहे, तशा प्रकारचे उद्गार मनातल्या मनात हजारो लोक काढीत असतात. संसाराच्या दुःखानीं कंटाळल्यामुळें तुकाराम महाराजानीं तिकडे उदासीनपणानें पाहण्याचा निश्चय करून पांडुरंगाचे सख्य संपादन केलें. नारायणाचा त्याना ध्यास लागला. शाश्वत सुखाचे ते उपासक बनले. शेवटीं त्याना ईश्वरी साक्षात्कार झाला. ते सदेह वैकुंठाला गेले. आपल्या देशातील बहुसंख्य असे जे संसारी लोक आहेत, त्याचा ओढा परमार्थाकडे विशेष आहे. शेंकडो वर्षांची त्याना तशी शिकवण आहे. नरजन्मा येऊनी देहाचें सार्थक्य करण्याचा म्हणजे ईश्वराची प्राप्ति करून घेण्याचा उपदेश त्याना शतकानुशतकें मिळत आला आहे. हा उपदेश तुकोबानीं, संसारी तुकोबानीं, प्रत्यक्ष अमलात आणून दाखविल्यानें त्यांच्या मार्गानें आपण गेलो असताना आपणालाहि भगवद्प्राप्ति होईल असे बहुतेक संसारी लोकाना वाटते. आणि त्यामुळ तुकोबाविषयीं त्याना विशेष आपुलकी वाटते.

बहुजनसमाजाला व गृहस्थाश्रमी लोकांना पेलेल असा ईश्वरप्राप्तीचा मार्ग तुकाराम महाराजांनी दाखविला, हेंहि त्यांच्या लोकप्रियतेचें एक कारण आहे. परमेश्वर हा भक्तिसाध्य आहे, त्याच्या प्राप्तिकरिता वेदाध्ययन, पुराणश्रवण वगैरे कांहीं नको, फक्त भक्ति हवी, असें त्याचें सांगणें असे. 'एक भावचि कारण देवा,' 'काशया पाषाण पूजिती पितळ, अष्टधातु खळ भावेंविण ?' भावचि कारण भावचि कारण, मोक्षाचें साधन बोलियेले.' 'तुकाह्मणे नलगे आणिक साधनें, अल्प नारायणें दाखविलें, कलियुगामाजीं करावें कीर्तन, तेणें नारायण देईल भेटी,' 'नाम घेतां उठाउठी, होय संसाराची तुटी ' 'नामसंकीर्तन साधन पैं सोपें जळतील पापें जन्मांतरिंचीं ' 'नलगे सायास जावें वनांतरा सुखें येतो घरा नारायण. ठायींच बैसोनी करा एकचित्त, आवडीं अनंत आळवावा, रामकृष्ण हरि विठ्ठल केशवा, मंत्र हा जपावा सर्वकाळ, याहूनि आणिक नाहीं पैं साधन, वाहतसे आण विठोबाची ।' इत्यादि शेंकडो वचनांत ईश्वर प्राप्तीचा सोपा मार्ग त्यांनी दाखविला आहे. ज्ञानेश्वर नामदेवाच्या काळापासून चालत आलेल्या भागवत धर्माचा किंवा भक्तिमार्गाचा प्रसार तुकाराम महाराजांनीं खूपच केला. पंढरपूरच्या पांडुरंगाची वारी करणाऱ्या वारकऱ्यांचा संप्रदाय त्यांच्याच मुळें विशेष लोकप्रिय झाला. संसारांत राहूनहि पूर्णपणें वैराग्य अंगीं बाणतां येतें, ही शिकवण त्यांनी स्वतःच्या उदाहरणानें लोकांना दिली. संसारांत असतांना उदासपणें, अलिप्तपणें राहतां आलें म्हणजे आत्मोन्नति सुलभतेनें करून घेतां येते हें त्यांनीं स्वतःच्या वागणुकीनें लोकांना पटवून दिलें. संसार न सोडतांना तो सुखाचा कसा करतां येईल याविषयी ' जोडोनिया धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेच करी ' असा सोपा इलाज त्यांनीं सुचविला आहे.

तुकारामबोवांनीं जे अभंग रचिले, लोकांना जो उपदेश केला, तो लोकांना परिचित असलेल्या मार्गेत व लोकांना अडचणीसारख्या वाटणाऱ्या गोष्टीमधर्नि केला. बहुजनसमाजाला बहुजनसमाजाच्या मार्गेत स्वतःच्या दुःखांतून बाहेर कसें पडावें हे सांगणारा सत्कवि तुकारामाच्या रूपानें मिळाला. शुद्ध बीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ बोलाचीच कढी बोलाचाचि भात । जेवूनिया तृप्त कोण झाला ? ॥

कोणी वदा कोणी निंदा । आम्हां स्वहिताचा धंदा ॥ बोले तैसा चाले । त्याची वंदावीं पाउलें ॥ नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ॥ नीचपण बरवें देवा । न चले कोणाचाहि हेवा ॥ तुका म्हणे तोची संत । सोसी जगाचे आघात ॥ इत्यादि शेंकडो अभंगांच्या ओळींतून लोकांना हरघडी जे प्रश्न पडत व पडतात, त्यांचीं उत्तरें अगदीं सोप्या पण वेंचक शब्दांत तुकोबांनीं दिल्यानें, आज तीन शतकें झालीं लोकांच्या जिव्हाग्रीं व त्यांच्या हृदयांत ते ठसले आहेत. तुकाराम बोवा हे व्यवहारांत गुंतले नसले, तरी व्यवहार पूर्णपणें ओळखून होते काहीं दिवस नरमगरम असा वाण्याचा धंदाहि त्यांनी केला होता. साहजिकच जीवनाचा अनुभव त्यांना प्रत्यक्ष व पुष्कळ होता. या जीवनांतून त्यांनीं आपल्या अभंगाची रचना केल्यानें, लोकांचीं मनें त्यांच्याकडे ओढलीं गेलीं. तुकाराम-महाराजांच्या अभंगांत त्यांच्या स्वतःच्या जीवनाचें जसें निर्मल प्रतिबिंब पडलें आहे, तसेंच सभोंवतालच्या समाजाच्या जीवनाचेंहि पडलें आहे. महाराज कसे होते हें पाहायला इतर चरित्रें वाचायला नकोत. त्यांच्या अभंगांतून ते आधीं कसे होते व पुढे कसे बनले हें आपणाला यथार्थपणें कळतें. जुन्या संतकवींत त्यांच्या इतकी आत्मलक्ष्यी कविता क्वचित्‌च कोणाची असेल. हीनावस्थेंतून उच्च प्रकारची स्वतःची आध्यात्मिक उन्नति कशी झाली याचें सुंदर चित्र त्यांच्या अभंगांत दिसतें. "काया वाचा मनें अघटित करणें, पर्मेचक्षु हातपाय, निंदा द्वेष घात विश्वासीं व्यभिचार आणि सांगों किती काय, लक्ष्मीमदें मातें घडले बहुत दोष, पत्नी दोनी भेदाभेद, पितृवचन घडली अवज्ञा अविचार, कुटिल कुचर निंदावाद; आणीक किती सांगों ते अवगुण, न वळे जिव्हा कापे मन, भूतांच्या उपकार नाहीं श्रद्धा धीर, विषयी लंपट शब्दहीन," "ऐसें भाग्य कई लाहाता होईन, अवघें देखें जन ब्रह्मरूप," "लाज वाटे मज मानिती हे लोक, हें तो नाहीं एक माझे अंगीं," "वाचेच्या चापल्यें बहु जालों कुशळ, नाहीं बीजमूळ हाता आलें," "माझिये मनींचा जाणा हा निर्धार, जिवासी उदार जालों आतां ! तुजविण दुजें न धरी आणिका भय लज्जा शंका टाकियेली;" "विटलें हें चित्त प्रपंचापासूनी, वमन हें मनीं बैसलेंसे, सोनें रूपें आम्हां मृत्तिके-

समान, माणिकें पाषाण खडे तैसे," "गळित झाली काया, हेंनि पळिले पंढरिराया." "रक्तश्वेत कृष्ण पीतप्रभा भिन्न, चैतन्य अंजन सूदलें डोळां तया अंजनगुणें दिव्यदृष्टि झाली। कल्पना निमाली द्वैताद्वैत"—अशा हळुहळु वरच्या अवस्थेपर्यंत जाणाऱ्या तुकोबानाच शेवटीं "पंधरा दिवसामाजी साक्षात्कार झाला, विठोबा भेटला निराकार; भामगिरिपाठारीं वस्ति जाण केली, वृत्ति स्थिरावली परब्रह्मीं" हें आत्यंतिक सुख प्राप्त झालें व ते आध्यात्मिक मार्तिक मौढीनें बोलू लागले. "घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं, मुक्ता आत्मस्थिति सांडवीन," "तुका उतरला तुरीं, नवल झालें तिहीं लोकीं, तुका बैसला विमानीं, संत पाहाती लोचनीं, देव भावाचा भुकेला, तुका वैकुंठासी नेला." या व अशाच स्वरूपाच्या इतरहि अनेक अभंगांतून आपली आध्यात्मिक उन्नति कशी झाली याचें स्वच्छ चित्र तुकोबांनीं काढल्यामुळें, अध्यात्माच्या उपासकांना फार मोठी सोय झाल्यासारखी वाटते. तुकोबाच्या अलौकिक लोकप्रीतीचें हेंहि एक कारण आहे.

हें असें त्यांनीं स्वत:च्या प्रगत होत जाणाऱ्या जीवनाचें चित्र रेखाटलें आहे, तसेंच सभोंवतालच्या सामाजिक जीवनाचेंहि उत्तम प्रकारें रेखाटलें आहे. "ऐसे संत झाले कळीं, तोंडीं तमाखूची नळी। लावूनि जग नेसोनि कासोटा, अभिमान मोठा करिताती। होऊनि सन्यासी भगवीं लुगडीं, वासना न सोडी विषयाची। लावूनिया मुद्रा बांधोनिया कंठी, हिंडे पोटासाठीं देशोदेशीं। ऐसे नाना वेष घेऊनि हिंडती, पोटासाठीं घेती प्रतिग्रह। गुरुमार्गामुळें भ्रष्टले सकळ म्हणती यातीकुळ नाहीं ब्रह्मीं। ऐसें कलियुगाच्यामुळें, झाले धर्मांचे वाटोळें; सांडुनिया रामराम ब्राह्मण म्हणती दोमडोम। सोईऱ्यासी करी पाहुणेर बरा, काढितो ठोंबरा संतालागीं। पुराणिक म्हणविती जाणोनि वादे भक्ति!" इत्यादि जे शेंकडो अभंग तुकोबांनीं लिहिले आहेत, त्यांच्यावरून त्याच्याकालीन देशलोकस्थितीची यथार्थ कल्पना होते.

तुकाराममहाराजाच्या लोकप्रियतेचें आणखी एक कारण म्हणजे त्यांचें शुद्ध चारित्र्य व लोकोत्तर भगवद्भाव. संसारी माणसानें शुद्ध कसे राहावें, त्याला शुद्ध

कसें राहाता येत, याचें प्रात्यक्षिक म्हणजे त्याचें विमल जीवन होय. धुतल्या तांदुळासारखें त्याचें वर्तन होत 'परांनिया नारी रखुमाईसमान' असें तें म्हणत त अक्षरशः सत्य होते कनक आणि कांता याचा मोह त्यांना कधीं पडलाच नाहीं. शिवाजीमहाराजांनी भक्तिभावानें त्यांच्याकडे मोठा नजराणा पाठविला असतांना त्याला ते शिवलेहि नाहींत. उलट म्हणाले, "मुंगी आणि राव, आम्हा सारखाचि जीव, गला मोह आणि आशा, कळिकाळचा हा फासा, सोनें आणि माती, आम्हा समान हे चित्ती, तुका म्हणे आलें, घरा वैकुंठ सगळें." सामान्य लोक 'रसना शिश्नाचे अंकित' असतात. तुकोबा याच्या पलीकडे गले होते. विठ्ठलाचा त्यांना ध्यास लागला होता त्यामुळें इतर गोष्टींहि सकटें वाटेंत आलीं तरी त्यांनीं त्याची पर्वा केली नाहीं. त्याची पत्नी जिजाबाई संसाराचा गाडा ओढून थकली म्हणजे मुलांच्या काळजीमुळें त्यांना बरेच टाकून बोले "कोणाचो नाईल होऊनिया बोहू, सवसारीं काहू आपदा किती ! काय तरी देऊ तोडितील पोरें ! मरतीं तरी बरें होतें आता । उठितें तें कुंटितें टाळ, अवघा मांडिला कोल्हाळ ॥" अशा शब्दांनीं तीं माऊली त्याची निर्भर्त्सना करी परंतु तुकोबांनीं त्यामुळें काहीं आपलें पांडुरंगाचें सख्य कमी केलें नाहीं. 'पतिव्रता नेणे आणिकाची स्तुती, सर्वभावें पति ध्यानीं मनी । तैसें माझें मन एकविध जालें, नावडे विठ्ठले विणें दुजें" असे ते आपल्या भगवद्भावाविषयीं म्हणतात ईश्वराशीं तद्रूप बनून तुकोबा कीर्तन करीत व अभंग रचीत. देहूतील शालोमालोसारख्या कविंना व मंबाजीगोसाव्यासारख्या ग्रामकंटकाना हें न साहून, त्यांनीं तुकोबांना अनेक प्रकारें छळलें वेदपठनाबद्दल त्यांना गाढवावर बसवून गावाबाहेर हाकलून लावण्याची व त्यांच्या अभंगाच्या वह्या इंद्रायणींत बुडविण्याची शिक्षा रामेश्वरभट्ट वाघोलीकरासारख्या शब्दज्ञानी सनातन्यानें दिली परंतु याहि परीक्षेत तुकोबा बरोबर उतरले विठ्ठलानें त्यांच्या वह्या न भिजविता त्यांना परत केल्या तें पाहून रामेश्वरभट्टहि चकित झाले व तुकोबाचे शिष्य बनले संतांचा छळ दुष्ट लोक करतात. पण त्यामुळें लोकांच्या हृदयातील त्यांचें स्थानच ते अधिक दृढ करीत असतात, हें त्या बिचाऱ्यांच्या काहीं लक्षात येत नाहीं.

आणि तुकोबाचे अभंग. आपणाला तुकोबा जे एवढे प्रिय आहेत, आदरणीय आहेत, ते त्यांच्या अभंगामुळेंच. कालिदास त्याच्या शाकुंतलामुळे लोकांना प्रिय, शेक्सपियर त्याच्या नाटकामुळें लोकांच्या आवडीचा. ज्ञानेश्वर त्यांच्या ज्ञानेश्वरीमुळे अमर झाले. तुकाराम महाराज त्यांच्या अभंगामुळें लोकांच्या हृदयसिंहासनावर आरूढ झाले आहेत. त्यांचे अभंग हिऱ्याप्रमाणें चमकदार, फाकुली द्राक्षाप्रमाणें मधुर आणि बदामपिस्त्याप्रमाणें कसदार आहेत. आज तीनशे वर्षे झालीं, अखिल महाराष्ट्राला आणि मराठी भाषा जाणणाऱ्यांना ते मुखांत आहेत. निरवीन आहेत, आध्यात्मिक प्रेरणा देत आहेत. "तुका म्हणे श्रम, एक विसरता राम। तुका म्हणे आता सांभाळारे पुढें अंतरींचें कुडें देईल दुःख। तुका म्हणे माझा स्वामी अनोळखा। तुका म्हणे केला रडेनें गाढव। तुका म्हणे भार घातलियावरी होईल कैवारी नारायण। तुका म्हणे नाहीं चालत तातडी, प्राप्त काळघडी आल्याविण। तुका म्हणे आम्ही येथील पारखी, नाचे देखोवेखी जगीं सरें। तुका म्हणे माझे सर्व माहेरल, बोलविले बोल पांडुरंगें।" इत्यादि शब्दांनी संपणारे त्यांचे शेंकडो अभंग लोकांच्या चालत्या बोलत्या श्रुती आहेत. चलनी नाण्यासारखा महाराष्ट्रीय लोक त्यांचा उपयोग करीत असतात. लहान मोठ्या चरणांचे हे अभंग जिव्हाळा व सहानुभूतीनें तुडुंब भरलेले आहेत. ईश्वराविषयीं प्रेम, मानवाविषयीं प्रेम, पशुपक्ष्यांविषयीं सद्भाव, दुर्जनांबद्दल सहानुभूति, दांभिकांबद्दल तिरस्कार आणि एक प्रकारची सूक्ष्म विनोदबुद्धि यांनीं हे अभंग ओतप्रोत भरले आहेत. हे अभंग दोन प्रकारचे आहेत. काहीं भावपर आहेत तर काहीं विचारपर आहेत. भावपर अभंग म्हणजे तीं सुंदर भावगीतेंच होत. त्यांत तुकाराम महाराजांनीं आपल्या विषयींच्या व देवाविषयींच्या भावना इतक्या उत्कटपणें गाइल्या आहेत कीं, त्यांना इतरत्र क्वचितच तोड मिळेल. अनेक प्रकारें त्यांनीं देवाला आळविलें आहे. कोपानें, कृतककोपानें, लोभानें, प्रेमानें, असहाय्यतेनें अशा अनेक परींनीं त्यांनीं परमेश्वराची भावपूजा केली आहे. आपल्या अंतरीच्या भावना कोणताहि आडपडदा न ठेवतां त्यांनीं देवाजवळ प्रगट केल्या आहेत. "लाज वाटे मज मानितां हे लोक, हे तों नाहीं एक माझे

अंगीं । माझें मन पाहें कसून, चित्त न ढळे तुजपासून । इतुकें करी देवा ऐकें हें वचन, समूळ अभिमान जाळीं माझा । जेथें जातों तेथ तू माझा सांगाती चालविसी हातीं धरूनिया । अपराधी म्हणोनि येतों काकुळती, नाहीं तरी होती काय चाड । तुजलागीं माझा जीव झाला पिसा, अवलोकितों दिशा पांडुरंगा । कोण आम्हां पुसे सिणलें भागलें, तुजविण उगलें पांडुरंगा । तुम्ही कांटाळिलां तरी, आम्ही न सोडणें हरी । कां हो देवा कांहीं न बोलाचि गोष्टी, कां मज हिंपुटी करीतसां । लाज वाटे मज म्हणविता देवाचा, न पुससी पुरूाचा तुका म्हणे । तुका म्हणे माझ्या जीवींच्या जीवना, घाला नारायणा उडी वेगीं । प्रेमरसपान्हा पाजीं माझ आई, धावें वो विठाई थोरसोनि । कामना गुणदोष पाहों आणिकांचे मज काय त्याचें उणें असे । " अशा परोपरीने त्यांनीं काव्यमय भावमय आत्म निवेदन केलें आहे

विचारपर अभंग स्तोत्रासारखे (odes) पुष्कळसे आहेत प्रत्येक अभंगात एखादा प्रमुख विचार मांडलेला असतो. या विचाराच्या समर्थनार्थ कांहीं दृष्टांत दिलेले असतात, लौकिकातले कांहीं दाखले दिलेले असतात विचाराची कक्षा सामान्य व्यवहारापासून ते अत्युच्च तत्त्वज्ञानापर्यंतची असलेली आढळते. "चन्नाचे हात पायही चढून, जे का रजले गाजले, देवा हा लौकिक कदा गाजेना, काय ना करिसी सोवळें ओवळें, अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड, पतितपावना मना विनी तुज सांगो, नको नको मना गुंतूं माया जाळीं, ब्रह्म सर्व गत सदा सम, मन करा रे प्रसन्न, न करा रे संग राहें रे निश्चळ' इत्यादि अनेक अभंगात उच्च प्रकारचे विचार प्रगट झाले आहेत. महाराजाच्या ठिकाणीं विनोदबुद्धि कशी होती याचा प्रत्यय "अनाथासी माया चाले गुज गोष्टी, मज ऐसी कष्टी नाहीं दुजी, कामाचा अंकित कातलें मार्थित, तू का हो दुश्चित निरंतर, म्हातारपणीं येटे पडसें खोकला, जातों वाराणसी निरवीं गाई घोडें वैसी," इत्यादि अभंगावरून येतो

तुकाराममहाराज व समर्थ रामदासस्वामी हे सामान्यत समकालीन असे थोर भगवद्भक्त, संत व लोकप्रिय ग्रंथकार होऊन गेल्यानें, त्यांच्यासंबंधीं त्यांच्या

पाहणाऱ्याच्या मनांत तुलना मक विचार येणें अस्वाभाविक नाहीं. वारकरी संप्रदायात तुकोबाविषयीं जसा परम आदर व भक्तिभाव आढळतो, तसाच प्रकार रामदासी संप्रदायांत समर्थांविषयीं आढळतो. असें असून दोन्ही संप्रदायात या दोन थोर विभूतींविषयीं परस्पर पूज्यभाव मनोमन तरी मान्य आहे. तुकोबांच्या नंतर समर्थ वर्षेच थोडें हयात होते, स्वराज्याच्या धामधुमीच्या व वैभवाच्या काळात वावरत होते, त्यांच्याशीं समरस होऊन आपल्या महंतांना व शिष्यांना त्यांत अग्रत्वपणें भाग घ्यायला सांगत होते. साहजिकच त्यांचें वाङ्मय वेगळ्या घडणीचें तयार झालें आहे. तुकोबा प्रपंचाला विटून परमार्थाकडे वळले असल्यानें, त्यांना कोणत्याहि अर्थानें आपल्या किंवा इतरांच्या संसाराची गोडी उरली नव्हती. हरिभक्तिचा महिमा त्यांना पटला असल्यानें, तो वाढविण्याचा उद्योग त्यांनीं आरंभिला. साहजिकच त्यांच्या अभंगाची घडण निवृत्तिपर बनली आहे. याचाच परिणाम सामान्य लोकावर होऊन सामान्यपणें असें समजलें जातें कीं, तुकोबा हे निवृत्तिपर संतकवि असून, रामदास हे प्रवृत्तिपर राजकारणी संतकवि आहेत हें सामान्य विधान खरेंच आहे असें माझें मत आहे. तुकाराममहाराजांनीं भक्तिमार्ग लोकांना दाखवून दिला व ईश्वरप्राप्तिकरितां संसार सोडावा लागत नाहीं असेंहि सांगितलें. ' जोडोनियां धन उत्तम वेव्हारें, उदास विचारें वेंच करी । नको स्त्री राडा पोर, आध सोप्या माड्या घर । नको गुंता भोगीं, नको पडों त्यागीं, लावुनि सरें अंगीं देवाचिया । न लगे लौकिक सांडावा वेव्हार, घ्यावें वनांतर भस्म दंड " इत्यादि अभंगांच्या चरणावरुन गृहस्थाश्रमी लोकांना संसाराचा त्याग न करितां, भगवद्प्राप्ति कशी करुन घेतां येते हें सांगितलेलें स्पष्ट दिसतें. भागवतधर्माचें हें सारच आहे. एकनाथी भागवतात देखील अशाच अर्थाच्या अनेक ओव्या आहेत. त्याच परंपरेत तुकाराममहाराजांनीं व्यापाराचा त्याग न करितां ईश्वरप्राप्तीची गोडी लोकांना लागावी म्हणून " नाम-संकीर्तन साधन पैं सोपें " सांगितलें. नाम घेतलें असतांना इतर गोष्टी क्रमाक्रमानें होतीलच अशी त्यांची मान्यता होती. 'नाम घेतां उठाउठीं, होय संसारासी तुटी, नाम घेतां कंठ शीतळ शरीर, इंद्रियां व्यापार नाठवती " अशी

त्याची खात्री असल्यानें भगवद्प्राप्तीचें सोपें साधन 'नाम घेणें' हें त्यानीं दाखविलें. संसाराचा त्याग न करता देवाचें नाव घ्या, असें तुकाराममहाराजांनीं सांगितलें एवढ्यावरुन त्याना प्रवृत्तिमार्गी कसे म्हणता येईल? त्याच्या अभगा पैकीं बहुतेक अभंगात ईश्वरभक्तिवरच सर्वांत अधिक भर आहे. ससार सोडणें कठिण म्हणून तो न सोडता आत्मोन्नति करावी इतकेंच त्यानीं सांगितलें. वैयक्तिक ससाराचा राष्ट्रीय संसाराकरिता उपयोग करून घ्यावा, मंडळ्या जमवाव्यात, समुदाय करावेत, सावधपणें राहून लोकाच्या चिंता काय आहेत त्या हेराव्यात, मराठा तेतुका मिळवून महाराष्ट्रधर्म वाढवावा, राजकारण करावें, यत्न तो देव जाणावा, इत्यादि विजिगीषू, राष्ट्रीय, प्रवृत्तिपर शेंकडो गोष्टी शेंकडो ठिकाणीं रामदासानीं सांगितल्या आहेत. स्वतःचा व राष्ट्राचा ससार सुखाचाच नव्हे तर समृद्धीचा कसा होईल, याचा विचार व आचार समर्थांनीं पुष्कळ ठिकाणीं दाखविला आहे. तसें तुकोबाना करण्याची जरुरी भासली नाहीं. यात त्याच्याकडे काडीइतका कमीपणा येत नाहीं. त्याना जो मार्ग पटला व श्रेष्ठ वाटला तो त्यानीं प्रतिपादन केला. निवृत्तिपर शिकवण आपल्या इकडे पुष्कळानीं दिली आहे. किंबहुना बुद्धाच्या काळापासून या शिकवणीकडे लोकाचें नेहमीं विशेष लक्ष असतें. मधूनमधून रामदासासारखे सत निर्माण होतात व ते कर्मयोगावर भर देऊन लोककल्याणार्थ कौशल्यानें कर्म करीत राहण्याचा उपदेश करतात इतकेंच. गेल्या दोन अडीच हजार वर्षांपासूनचें भारतीय मन हें सामान्यतः निवृत्तिपरच आहे असें म्हणावयास चिंता नाहीं.

तें कांहींहि असलें तरी तुकाराम महाराजानीं महाराष्ट्राच्या दृष्टीनें एक मोठी कामगिरी केली आहे वारकरी सप्रदायाच्या झेंड्याखालीं त्यानीं लक्षावधि लोकाना एकत्र करून भक्तिमार्ग दाखविला. भागवतधर्म उर्फ भक्तिचा धर्म त्यानीं आणि त्याच्या वारकऱ्यांनीं महाराष्ट्रभर पसरविला. या धर्मात कोणी उच्च नाहीं व कोणी नीच नाहीं भगवंतापुढें सर्व सारखे. सर्व सताची एक जात ते सर्व भगवद्भक्त जातिभेद, वर्णभेद, धर्मभेद, ईश्वराची प्राप्ति करीत असताना कोणाच्याहि आड या

भागवतधर्मात येत नाहीत. याच कारणानें चोखामेळा, सावतामाळी, सेना न्हावी, नामा शिंपी, गोरा कुंभार, विसा खेचर, नरहरि सोनार, जोगा परमानंद तेली, शेख महमद, शेख फरीद, शेख मुल्तान, शेख सय्यद, इत्यादि शेकडों पांडुरंगाचे भक्त निर्माण झाले. शैववैष्णवांचा झगडा महाराष्ट्रांत नाहीं, याचें श्रेय या वारकरी संप्रदायालाच दिलें पाहिजे. आधीं पारमार्थिक दृष्टीनें स्वहित साधा, बाकीच्या गोष्टी मग आपोआप साधतील, हें पारमार्थिक स्वहित साधायला कष्ट सायास नको करायला, फक्त ईश्वराचें नाव भक्तिभावानें घेतलें म्हणजे पुरे, इत्यादि मुख्य पण सोप्या तत्त्वांचा प्रसार महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत ज्ञानेश्वर नामदेवांच्या काळापासून जो सुरू झाला होता, त्याचाच परमोच्च बिंदु तुकाराम महाराजांनीं गाठला याच अर्थाचा एक अभंग आहे "संतकृपा झाली, इमारत फळा आली। ज्ञानदेवें रचिला पाया, रचियेलें देवालया। नामा तयाचा किंकर, तेणें केला हा विस्तार। जनार्दन एकनाथ, ध्वज उभारिला भागवत। भजन करा सावकाश तुका झालासे कळस।" (नित्यपाठांतील अभंग) भागवतधर्म किंवा वारकरी संप्रदायाच्या पुढची पायरी म्हणजे समर्थांचा महाराष्ट्रधर्म होय. भागवतधर्मांत 'स्वहित' साधण्याचा सोपा मार्ग सुचविला आहे. त्याच्याच पुढची पायरी 'परहित' साधण्याची. 'परहित' साधून, दुमन्याचा संसार सुखी करून, सर्व महाराष्ट्र सुखी करण्याचा महामंत्र रामदासांनीं जो दिला तो क्रमप्राप्तच होता असें म्हटलें पाहिजे.

तुकारामाच्या काळींच धामणगावचे बोधलेबुवा, निंबराज दैठणकर, मोरया गोसावी चिंचवडकर, गणेशनाथ, शेख महमद, शेख फरीद, शेख सय्यद, बहिणाबाई (जन्म शके १५५० मृत्यु १६२२) इत्यादि कवि व कवयित्री होऊन गेलीं. बोधलेबुवाचें सर्व कुटुंब पंढरीची वारी करीत असे. निंबराज दैठणकर यांनें 'जपमाळ' नांवाचें पुस्तक रचिलें असून त्यांत प्रत्येक अक्षरावर परिशिष्टरूपावर अभंग आहेत मोरया गोसावींनीं गणेशपुराण नांवाचा ग्रंथ लिहिला आहे वारकरी गणेशनाथांनीं अनेक पदें व अभंग रचिले आहेत. सेना न्हावी यांचे

काहीं अभंग प्रसिद्ध आहेत. शेख महंमदाची ग्रंथरचना बरीच आहे. याचे पवनविजय, निष्कलंकप्रबोध, योगसंग्राम व ज्ञानसागर असे चार ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत. योगसंग्रामाची ओवीसंख्या २५०० आहे. शेख महंमद हा मूळचा मुसलमान असून पुढें पंढरीचा वारकरी बनला. मूर्तिपूजा ही खुळखुळ्या सारखी होय, मोठें झाल्यावर हा खुळखुळा टाकला पाहिजे, असें तो म्हणतो ईश्वर तेथून सर्वांचा एकच आहे. हिंदु आणि मुसलमान हा फरक त्याचें घरीं नाहीं असें सांगताना तो म्हणतो, "इल्ला इलाहा इलाल्ला। हजरत महमद रसुल्ल्ला ॥ या दोहीं चरणात पाहिजे ओळखिला। ईश्वर विश्वरूपें ॥ मुसलमान कहे जिक्रि बुखानद। मराठे म्हणती बयेचा आनद ॥ परी दोहीं भाषाचा भेद। ईश्वर अल्ला जाणे ॥" शेख महमदाची रेणुका तेलीण या नावाची एक भक्तीण होती. तिनेंहि काहीं अभंग केले असें म्हणतात. या सर्वांत तुकाराम महाराजाची शिष्या बहिणाबाई हिचे अभंग प्रेमळ असून तिच्या शब्दांत सात्विकपणा व मोहकपणा आहे. तुकाराम महाराजांनीं स्वप्नात येऊन बहिणाबाईस उपदेश दिला. त्याविषयीं ती लिहिते—"ठेउनिया कर मस्तकीं बोलिला। मंत्र सांगितला कर्णरंध्रीं ॥ कार्तिकात वद्य पचमी रविवार। स्वप्नींचा विचार गुरुकृपा ॥" बहिणाबाईचें अभंगवृत्तात्मक आत्मचरित्र जिव्हाळ्यानें भरलेलें आहे. तुकारामाच्या चौदा शिष्यांत प्रमुख असे दोन तीनच होते. बहिणाबाईचा आताच निर्देश झाला दुसरे शिष्य तुकोबाचे बधु कान्होबा. त्याचे शे सव्वाशे अभंग प्रसिद्ध आहेत. तुकोबा वैकुंठवासी झाल्यावर कान्होबाच्या तोंडून स्रवलेले अभंग करुणरसानें ओतप्रोत भरले आहेत. नाटाचे अभंग, आशीर्वाद, ललित आणि गौळणी अशी त्याची काव्यरचना आहे. तिसरे शिष्य सुप्रसिद्ध निळोबा पिंपळनेरकर. तुकारामाच्या निर्याणानतर वीस पचवीस वर्षांनीं तुकोबाच्या ध्यासानें ते देहूस आले असताना त्याना तुकारामाचा स्वप्नसाक्षात्कार व अनुग्रह झाला वारकरी संप्रदायातील निळोबा हे शेवटले संतकवि होत तुकारामाना ज्याप्रमाणें नामदेवापासून स्फूर्ति प्राप्त झाली, त्याप्रमाणें निळोबाना तुकोबापासून झाली. ते म्हणतात—

"निळा म्हणे आम्ही नोळखुंचि देवा। तुकयाचा धावा करितसों" तुकारामांच्या स्तुतिपर यांनीं काहीं श्लोकशतकें लिहिलीं असून त्यात प्रेमळपणा आहे तुकारामाचा प्रत्यक्ष सहवास नसताना त्याच्या साहित्यानून स्फूर्ति मिळवून, भागवतधर्माची पताका महाराष्ट्रभर फडकविण्याचें कार्य केल्याबद्दल निळोबाना कोणीहि धन्यवादच देईल.

# ९

## समर्थ रामदास

आधुनिक काळातील राष्ट्रीय कवि विनायक यानीं रामदासाच्या[१] संबंधीं "साधुसंत झाले कोटी, तयाची न वाण। मात्र रामदासा साजे समर्थाभिधान॥" अशा प्रकारचे उद्गार काढिले आहेत. शिवशाहींतील राष्ट्रीय कवि, राजकारणी संत किंवा ग्रंथकार म्हणून जर कोणाकडे बोट दाखविता येत असेल तर तें समर्थांकडेच होय. सभोंवतालच्या परिस्थितीची सूक्ष्म पाहाणी व छाननी करणारा, त्या परिस्थितीचें यथातथ्य चित्र आपल्या साहित्यात जागोजागीं रेखाटणारा, त्या परिस्थितींतून कोणत्या रीतीनें वर डोके काढावे ते ओजस्वी व अनुभवाच्या शब्दात सांगणारा जर कोणी ग्रंथकार शिवशाहींत झाला असेल तर ते समर्थ रामदास स्वामी हेच होत. तुकोबारायाच्या काव्यातहि त्यांच्या काळच्या परिस्थितीचें चित्र उमटलें आहे. परंतु त्या हीन परिस्थितींतून बाहेर निघून समर्थ कसे व्हावें याचा विचार त्यानी फारसा केलेला नाहीं हा विचार तर रामदासी साहित्याचा गाभा आहे. स्वतःच्या आणि इतराच्या दु:स्थितीला कटाळून इतर संतानीं केवळ निवृत्तिपर परमार्थाची कास धरली. याच्या उलट समर्थांची स्थिति होती. त्यानीं

---

१ खरें नांव नारायण. पित्याचें नाव सूर्याजीपंत ठोसर मातेचें नांव राणूबाई वडील भावाचें नांव गंगाधर ऊर्फ श्रेष्ठ रामदासांचा जन्म गोदातीरीं जांब येथें चैत्र शु० ९ शके १५३० रोजीं झाला त्याचा मृत्यु सज्जनगडावर माघ वद्य ९ शके १६०३ रोजीं झाला. समर्थांनीं शके १५५४ पर्यंत गोदातीरीं टाकळीस राहून बारा वर्षें तपश्चर्या केली पुढें बारा वर्षे भरतखंडात तीर्थयात्रा केल्या शके १५६६ च्या पुढें ते कृष्णातीरीं आले रामदासीं संप्रदाय स्थापून व ग्रंथरचना करून जागोंजाग शेंकडो मठ त्यानीं स्थापिलें या नंतरच.

देखील व्यक्तिश परमार्थाची कास धरली असली, तरी हा परमार्थ सर्वस्वी प्रवृत्तिपर, लोककल्याणकारक, लोकांचें ऐहिक व पारलौकिक हित साधणारा असा होता. 'परमार्थ सकळांस विसावा । परमार्थ जन्माचें सार्थक । परमार्थ सर्वांसी तारक । परमार्थी तो राज्यधारी । (द १ स. ९)' ह्या वचनावरून त्यांची परमार्थाची कल्पना किती विशाल होती हें कळेल. एखाद्या सार्वजनिक कार्यकर्त्यानें आधुनिक काळात ज्याप्रमाणें आपलें कार्य उत्तम प्रकारें व्हावें म्हणून संसारात स्वत ला गोंवून घेण्याचें नाकारावें, त्याप्रमाणें समर्थांनीं केलें लोकाचा संसार सुखाचा व्हावा, नेटका संसार त्याना करायला सांगता यावें, त्याना सर्व प्रकारची मदत करता यावी, म्हणून त्यानीं परमार्थात, उच्च व उज्ज्वल प्रकारच्या परमार्थात स्वत ला गोंवून घेतलें. उपाधींना न कंटाळता, संकटानीं घाबरून न जाता, सावधानता राखून समुदाय जमविण्याची कामगिरी त्यानीं स्वत केली व दासबोधातील महंताना करायला सांगितली यातील मर्म हेंच होय. शिवाजीमहाराजांचा स्वराज्यस्थापनेचा जो प्रचंड खटाटोप चालला होता, त्याला सर्वस्वी उपकारक, प्रोत्साहक अशाच प्रकारची रामदासाची कामगिरी होती.

समर्थांची ग्रंथसंख्या मोठी आहे त्याच्या उपलब्ध असलेल्या सुमारे सव्वीस हजार कवितेंत तीन चतुर्थांश कविता अध्यात्मपर आहे सुमारे चार हजार कविता देवताख्यानपर आहे आणि उरलेली कविता आत्मपर, भावगीतात्मक अशी आहे. अध्यात्मपर कवितेंत ओवी शतापैकीं बाराशतें, पंचीकरण योग, चतुर्थमान, मानपंचक, पंचमान, आत्माराम जुना दासबोध ( यासच एकवीस समासी म्हणतात. याच्या १३४० ओव्या आहेत ) आणि दासबोधातील बरेचसे दशक यांचा समावेश होतो. यात सगुण-निर्गुण, ब्रह्म-माया, पुरुष-प्रकृति, षड्रिपु, नवविधाभक्ति, त्रिविध ताप, द्वैताद्वैत इत्यादि अनेक आध्यात्मिक गोष्टींचें सुबोध विवरण करण्यात आलें आहे. हे ग्रंथ वेगवेगळे असले तरी त्यांतील मुख्य विषय एकच आहे. अहं ब्रह्मास्मि आणि तत्त्वमसि ह्या दोन वेदांत वाक्यांचा समर्थांच्या खास पद्धतीनें विचार करण्यात आला आहे मी ब्रह्म आहे आणि तूंहि

तेंच आहेस हें ज्ञानानें ओळखून त्याचें सतत मनन करणें, त्याचा भावार्थ आपल्या आचरणात निंबविणें, सर्वत्र एक अद्वैत आहे या भावनेनें जनतारूपी जनार्दनाची सेवा करणें, सद्गुरूची कास धरून सगुण अशा ईश्वराची उपासना करणें, भक्ति ज्ञान वैराग्य अशा चढत्या क्रमानें आत्मोन्नति करुन लोककल्याणार्थ कर्म करात राहणें हें या सर्व आध्यात्मिक प्रकरणाचें सार आहे. या सर्व अध्यात्मपर ग्रथात 'दासबोध' हा सर्वांत मोठा व सर्वांत कालदृष्ट्या शेवटचा असल्यानें समर्थांच्या सर्व उपदेशाचें, विचाराचें सार त्यात प्रगट झालें आहे. दासबोधासारखा ग्रथ एकटाकी व एका बैठकींत तयार होणें शक्य नाहीं. जसा वेळ मिळेल आणि जसा प्रसग उद्भवेल तसा हा ग्रंथ हळुहळू कित्येक वर्षे तयार होत होता. एखादा राजवाडा किंवा वेलसलेण्यासारखें लेणें हें जसे वर्षांनुवर्षे तयार होत असतें, त्याप्रमाणें दासबोध हा अनेक वर्षे तयार होत होता. त्यातहि पहिले आठ दशक प्रथम करून, नतरच्या दशकाची रचना सावकाश केलेली आढळते. आठ दशकाच्या पूर्वार्धाची रचना शके १५८१ च्या सुमारास झाली, आणि उरलेले बारा दशक जरी मधून मधून लिहिले गले असले तरी एका सूत्रात असे ते शके १६०३ च्या मार्गशीर्षांत ओविले गले. पहिले सहा दशक क्रमश लिहिल्यासारखे दिसतात सातवा दशक हा स्वतत्रपणे तयार केलेला दिसतो. कारण त्यात मगलाचरण, उपसहार इत्यादि स्वतत्र प्रकरणाला शोभेशा गोष्टी आढळतात. आठवा ज्ञानदशक हा सर्वांत अधीं तयार झाला असावा असे शकर श्रीकृष्ण देव याचें मत आहे[1] अशा प्रकारें हा ग्रथ सुमारें वीसबावीस वर्षे तयार होत होता असे स्पष्ट दिसते

रामदासस्वामींच्या दासबोधात ज्या अनेक विषयाचा परामर्ष घेतला आहे, त्याच्याकडे पाहून त्याला 'ज्ञानसिंधु' म्हणावेसे वाटतें यात अध्यात्मनिरूपण हें तर मुख्य आहेच. पण याशिवाय राजकारण, यत्ननिरूपण, लेखनक्रिया, कवित्वकळा इत्यादि विषयहि यात उत्तम प्रकारें चर्चिले आहेत ग्रथाच्या

१ श्रीसमर्थहृदय पृ ३२२

सुरुवातीला त्यात काय काय आले आहे त्याची यादी आहे त्यात भक्तिमार्ग, ज्ञान, वैराग्य, अध्यात्म, मोक्ष, विदेहस्थिति, मुख्य देव, मुख्य ब्रह्म, मुख्य उपासना या बाबी मुख्यत्वें सांगितल्या असून त्याना "शिवगीता रामगीता। गुरुगीता गर्भगीता। उत्तरगीता अवधूतगीता। वेद आणि वेदांत। भगवद्गीता। ब्रह्मगीता। हंसगीता पांडवगीता। उपनिषदें भागवत" इत्यादि ग्रंथाचा आधार असल्याचें दाखविलें आहे अशा तऱ्हेनें हा ग्रंथ साधार व सोपपत्तिक असून त्याला समर्थांच्या स्वानुभवाचा पाठिंबा आहे या ग्रंथासंबंधानें समर्थांच्या ग्रंथाचे थोर अभ्यासक शंकर श्रीकृष्ण देव म्हणतात, "सर्वतोपरि निकृष्ट स्थितीला पोंचलेल्या समाजाला ऐहिक आणि पारमार्थिक कर्तव्याची दिशा स्पष्ट रीतीनें आखून देऊन, शाश्वत सुखाची जोड करून देणें हेंच या ग्रंथाचें प्रयोजन आहे. ऐहिक आणि पारमार्थिक कर्तव्याची संगति या ग्रंथात जशी घालून देण्यात आली आहे, तशी दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथात क्वचित्‌च असेल. स्वत:चें घरदार, धंदा, स्वत:चीं बायकामुलें, याच्या संबंधानें आपलें जें कर्तव्य आहे तेवढेंच काय तें ऐहिक कर्तव्य, असें समजावयाचें नाहीं. प्रपंच म्हणजे हा वर दिलेला स्वत:चा प्रपंच अधिक राष्ट्राचा प्रपंच. स्वत:चा प्रपंच प्राणिमात्र करीत आहेत स्वधर्माचा प्रपंच करण्यातच मनुष्याची श्रेष्ठता आहे हा बोध म्हणजेच *महाराष्ट्रधर्माचें शिक्षण होय. अलिकडच्या भाषेत यालाच* स्वदेशाभिमान म्हणतात. असलें शिक्षण देणारा प्राकृतात तरी एवढाच ग्रंथ आहे. हाच या ग्रंथाचा विशेष ..[१]"

समर्थकालीन लोकस्थितिवर उल्लेख मुख्यत- दशक अकरा, चौदा व पधरा यात आले आहेत. त्यावरून लोक भावाबलेल्या, निर्नायक अशा अवस्थेत कसे होते तें दिसतें. समाजाचे बौद्धिक व सास्कृतिक धुरिणत्व ज्या ब्राह्मणाकडे, त्याची निकृष्टावस्था कशी झाली होती तीहि यात आहे. मासल्याकरिता काहीं ओव्या पुढें देत आहें :—नाना मतें निर्माण जालीं। नाना पाषांडें वाढलीं। नाना

१ श्रीसमर्थहृदय, पृ. ५२४

प्रकारांचीं उठिलीं । नाना बंडें ॥ देव जाले उदंड । देवाचें माजलें बंड । भूतादेवतांचें थोतांड । येकचि जालें ॥ शास्त्रांचा बाजार भरला । देवांचा गल्बला जाला । लोक कामनेच्या मताला झोंबोन पडती ॥ मतामतांचा गल्बला कोणी पुसेना कोणाला । जो जें मतीं सांपडला । तयास तेंचि थोर ॥ कित्येक म्लेंच्छ होऊन गेले । कित्येक फिरंगणांत आटले । देशभाषानें रुधिले । कितीयेक ॥ मऱ्हाष्टदेश थोडा उरला । राजकारणें लोक रुधिला । अवकाश नाहीं जेवायाला । उदंड कामें ॥ कित्येक युद्धप्रसंगीं गुतले । तेणें गुणें उन्मत्त जाले । रात्र दिवस करूं लागले । युध्यचर्चा ॥ कित्येक कामनेचे भक्त । ठाईं ठाईं जाले आसक्त । युक्त अथवा अयुक्त । पाहातो कोण ॥ नीच प्राणी गुरुत्व पावला । तेथें आचारचि बुडाला । वेदशास्त्र-ब्राह्मणाला । कोण पुसे ॥ ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले । गुरुत्व सांडून जाले । शिष्य शिष्याचे ॥ कित्येक दावल्मल्कास जाती । कित्येक पीरास भजती । कित्येक तुरुक होती । आपले इच्छेनें ॥ गुरुत्व आलें नीच याती ॥ काहीं येक वाढली महंती । शूद्र आचार बुडविती ॥ ब्राह्मणाचा ॥ . आम्हीहि तेंचि ब्राह्मण । दुःखें बोलिलें हें वचन । वडिल गेले ग्रामणी करून । आम्हा भोंवते ॥ या शिवाय 'अस्मानी सुल्तानी' व 'परचक्र निरूपण' या दोन प्रकरणांत तीर्थयात्रा प्रसंगीं त्यांना आलेल्या देशस्थितीचा अनुभव वर्णिला आहे.

समाजातल्या निकृष्ट स्थितीने समर्थ भांबावून गेले नाहीत किंवा लोकांना त्यांनी संन्यासहि घ्यावयास सांगितला नाहीं. आहे ह्याच संसारांत आनंद मानून व तो नेटकेपणानें करून राजकारणमूलक परमार्थाची कास लोकांना धरावयास त्यांनीं सांगितलें. हें त्यांनीं कसे केले हें त्यांच्याच शब्दांत आपणास पाहावयास सांपडेल धन्य धन्य हा नरदेहो । येथील अपूर्वता पाहो । जो जो कीजे परमार्थ लाहो । तो तो पावे सिद्धीतें ॥ १–१०–१ ॥ मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण । तिसरें तें सावधपण । सर्व विषईं ॥ ११–५–४ ॥ आधीं प्रपंच करावा नेटका मग घ्यावें परमार्थ विवेका । येथें आळस करूं नका विवेकी हो ॥ द. १२ स. १-१ ॥ ज्ञानी आणि उदास । समुदायाचा हव्यास । तेथें अखंड

सावकाश । येणार मेणारा ॥ नष्टासी नष्ट योजावे । वाचाळासी वाचाळ आणावे । आपणावरी विकल्पाचे गोवे । पडोंच नेदी ॥ सामर्थ्य धर्मी सांपडावें । रगडून पीठचि करावें । करूनि मागुति सावरावें । तुटु नये ॥ खळ दुर्जनासी भ्यावें । राजकारण नाहीं राखिलें । तेणें अवघे प्रगट जालें । मग वाईट ॥ समुदाय पाहिजे मोठा । तरी तनावा असाव्या बळकट । मठ करूनी ताठा । धरूं नये ॥ धटासी आणावा धट । उद्धटासी पाहिजे उद्धट ॥ द. १९ स. ९ ॥ उपाधींत सांपडों नये । उपाधीस कंटाळों नये । निसुगपण कामा नये । कोणी येक विषयीं ॥ द. १९ स. १० ॥ शतावधी बहुतांचीं अंतरें । राखणें येणें तदनंतरें । ऐशीं हीं विवेकाचीं उत्तरें । ऐकणार नाहीं ॥ द. १९ स. ३ १८ ॥ हिंडल्यावांचूनी कीर्ति कैंची । मान्यता नव्हे कीं पुराची । जिकडे तिकडे होते चीची । अवलक्षणें ॥ द. १९ स. ३-२४ ॥ मारुतीमध्यें वर्ते लागे । उपाधीमध्यें मिळों लागे । अलिप्तपणें राहों लागे । आपणासी ॥ द. ११ स. ६ १३ ॥ कांहीं गलबला कांहीं निवळ । ऐसा कठिण आला काळ । जेणें करितां विश्रांतिवेळ । आपणासी फावे ॥ द. १९ स. ९-२९ ॥ बहुविषय भोगू नये । विषयत्याग करितां नये । देहलोभ धरूं नये । बहुत्राम खोटा ॥ द. १४ स. २ ७० ॥ उत्कट भव्य तेंचि घ्यावें । मळमळीत अवघेंचि टाकावें । निस्पृहपणें विख्यात व्हावें । भूमंडळीं ॥ द. १९ स. ४-१५ ॥

दासबोधांत प्रवृत्तिमार्गाची शिकवण आहे कीं निवृत्तिमार्गाची? याचें उत्तर म्हणून असें देता येईल कीं, या दोन्हींच्या पलीकडे असलेल्या व दोन्हींचा स्वत:मध्यें समावेश करणाऱ्या परमार्थाची शिकवण यांत आहे. समर्थ या ग्रंथा संबंधानें शेवटीं म्हणतात, "वीस दशक दासबोध । श्रवणद्वारें घेतां शोध । मननकर्त्यास विशद । परमार्थ होतो ॥" पहिल्या दशकाचे शेवटीं "नरदेह हा स्वाधेन । सहसा नव्हे पराधेन । परंतु हा परोपकारीं झिजवून । कीर्तिरूपें उरवावा ॥ साग नरदेह जोडल । आणि परमार्थबुद्धि विसरलें । तें मूर्ख कैसें भ्रमलें । मायाजाळीं ॥" असें त्यांनीं जें म्हटलें आहे त्यावरून त्यांच्या परमार्थाचा अर्थ परोपकारार्थ, जगदुद्धारार्थ, ईश्वरविषयीं आदरबुद्धि ठेवून जीवन जगणें असा उघडच ठरतो. समर्थांच्या परमार्थांत स्वत:चा व राष्ट्राचा संसार नेटका करण्याची

आवश्यकता प्रतिपादन केली आहे. गिरिगव्हरात राहून वैयक्तिक मोक्ष साधणारा त्यांचा परमार्थ नाही. तर लोकांत मिसळून त्यांचा आणि आपला ऐहिक व पारलौकिक मोक्ष साधणारा तो आहे. राजकारण, प्रयत्नवाद, समुदाय किंवा मंडळ्या असणें इत्यादि संबंधानें इतके विपुल व स्पष्ट उल्लेख दासबोधात आहेत कीं त्यावरून त्यांनीं प्रवृत्तिमार्गासंबंधानें कोणत्याहि डोळस माणसाची खात्री झालीच पाहिजे. विशेषतः दशक ११, १२, १५, १८, व १९ यात राजकारण भरून ओसंडत आहे. परंतु याच्याच जोडीला त्यात भक्तिमार्ग, उपासनामार्ग हाहि उत्कटपणे प्रतिपादन केला आहे. किंबहुना स्वतः रामदास लग्न करून संसारात पडले नाहींत त्यावरून एकट्या दुकट्याच्या संसारासंबंधानें त्यांचें अनुकूल मत नसावें हें उघडच दिसतें. परंतु सामान्य माणसाच्या मर्यादा आणि महाराष्ट्राच्या गरजा ते ओळखून असल्यानें त्यांनीं आपल्या परमार्थ कल्पनेचें उदात्तीकरण करून तींत राजकारण व प्रयत्नवाद यांचा समावेश केला. एका अर्थानें असेंहि म्हणता येईल कीं त्यांनीं राजकारणाचें परमार्थीकरण केलें. आधुनिक काळात, महात्मा गांधीजींच्या काळात, ही कल्पना सुगमपणें कळेल. कारण गांधीजींनीं राजकारणाचें परमार्थीकरण किंवा धर्मीकरणच (स्पिरीच्युअलाइ-झिंग पॉलिटिक्स) केलें आहे. या दृष्टीनें पाहिलें असताना (आणि मला वाटतें ही दृष्टी खरी आहे) रामदासांच्या "मुख्य हरिकथानिरूपण। दुसरें तें राजकारण" ह्या किंवा "सामर्थ्य आहे चळवळीचें। जो जो करील तयाचें। परंतु येथें भगवंताचें अधिष्ठान पाहिजे" ह्या वचनावर कांहीं वेगळाच प्रकाश पडून त्याचें सामर्थ्य शतगुणित झाल्यासारखें वाटतें. गांधीजींना जसा रामराज्याचा ध्यास लागला होता, तसाच रामदासस्वामींनाहि लागला होता, हें साम्यहि लक्षात ठेवण्याजोगें आहे. राजेशाहीचा तो काळ असल्यानें समर्थ गांधीजींप्रमाणें प्रत्यक्ष राजकारणात पडले नाहींत. आजच्यासारखा लोकशाहीचा तो काळ असता तर समर्थांनीं काय केलें असतें याची सहज कल्पना करता येईल.

समर्थांनीं जीं स्फुट प्रकरणें लिहिलीं आहेत त्यात त्यांच्या पारमार्थिक राजकारणाची कल्पना अधिक विशद करून सांगण्यात आली आहे. या पारमार्थिक

किंवा परमार्थमूलक राजकारणाच त्यांनी महाराष्टधर्म (महाराष्ट्रधम), महाराष्ट्रराज्य अशी नावें दिलीं आहेत. शिवाजीमहाराजांना त्यांनी शके १५७१ मध्यें जें एक पत्र पाठविलें आहे त्यावरून तसेंच शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनंतर संभाजीराजांना जें पत्र पाठविलें त्यावरून या महाराष्ट्रधर्माची कल्पना येते या पत्रांत एके ठिकाणीं म्हटलें आहे "देवधर्म गो ब्राह्मण। करावया संरक्षण। हृदयस्थ जाला नारायण। प्रेरणा केली॥ शूर पंडित पुराणिक। कवेश्वर वैदिक याज्ञिक। धूर्त तार्किक सभानायक। तुमचा ठाई॥ या भूमंडळाचा ठाई। धर्म रक्षी ऐसा नाहीं। महाराष्टधर्म राहिला काहीं। तुम्हाकरिता॥ ..कितेक दुष्ट संव्हारिला। कितेकासी धाक सुटला। कितेकासी आश्रयो जाला। शिवकल्याण राजा॥ " दुसऱ्या पत्रांत म्हटलें आहे, "महाराष्ट्रराज्य करावें जिकडे तिकडे." इतिहासाचार्य राजवाडे म्हणतात त्याप्रमाणें "समर्थांच्या ह्या उक्तींवरून कळून येईल कीं, सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांत महाराष्ट्रांतील विचारी पुरुषाचीं मनें एका जबर कल्पनेनें भारून गेलेलीं होतीं. ती कल्पना कोणती तर महाराष्ट्र धर्माची स्थापना करणें ही ही कल्पना सफल करण्याचें अचाट काम शिवाजीनें केलें ही कल्पना ध्यानांत ठेवून मग शिवाजीच्या व त्याच्या अनुयायांच्या कृत्यांचा विचार करावा म्हणजे त्याकाळीं महाराष्ट्रांत व कर्नाटकांत जिकडे तिकडे मराठे निष्कारण धावताना परकीय इतिहासकारांना जे दिसतात, ते मनात काहीं विशिष्ट हेतु धरून शिस्तवार मोहिमा करीत आहेत असें भासू लागतील महाराष्ट्रेतर प्रांतांतील हिंदुधर्म + धर्मस्थापना + गोब्राह्मणप्रतिपाल + स्वराज्यस्थापना + एकीकरण + धुरीधरण म्हणजे महाराष्ट्रांतील हिंदुधर्म होतो अशी त्याकाळीं समजूत होती. ह्याच समजुतीला महाराष्ट्रधर्म म्हणून समर्थांनीं संज्ञा दिली दामाजीपंताच्या वेळचा स्तब्ध विठोबा सहिष्णु हिंदुधर्माची मूर्ति आहे व समर्थांचा उड्डाण करणारा मारुति जयिष्णु हिंदुधर्माची पताका आहे.[१] " प्रवृत्तिनिवृत्तींचा मेळ साधणाऱ्या महाराष्ट्रधर्माकरिताच जणू

१ ऐतिहासिक प्रस्तावना पृ ३१ ३२

उद्देश लोकाना केला. यन्ही तो चेतवावा रे, धीर्धरा धीर्धरा, राजधर्म,
उपदेश लोकाना केला. यन्ही तो चेतवावा रे, धीर्धरा धीर्धरा, राजधर्म,
सेवकधर्म, धन्य संसार होतसे, मैत्री, सगुण देव, गर्व, जन्मसफलता, परनिंदा, स्फूर्ति, मपचाचें वेड, सरस्वति इत्यादि शेकडो स्फुट प्रकरणांतून समर्थांच्या गजकारणमूलक परमार्थाची किंवा प्रवृत्तिनिवृत्तींचा समन्वय करणाऱ्या महाराष्ट्र धर्माची उत्तम प्रकारें कल्पना येते

समर्थांच्या दासबोधादि अध्यात्मपर ग्रंथाना व स्फुट प्रकरणाना काव्य म्हणता येईल काय, या प्रश्नाचा येथेंच आपण थोडक्यात विचार करू. ज्ञानेश्वरी हा अध्यात्मपर ग्रंथ असून आपण त्याला निःशंकपणे काव्याच्या सदरात घालतो. तुकारामबोवाचे अभंग तत्त्वज्ञानपर असूनहि आपण त्यांची काव्यातच गणना करतो. याचें कारण ज्ञानेश्वरी व तुकोबाचे अभंग यात काव्याला अवश्य असलेली भावनात्मकता व भाषेची सजावट आहे. वर्ण्य वस्तूबरोबरच इतरहि सदृश वा विसदृश अशा अनेक वस्तूंचें एकाच वेळीं रमणीय दर्शन आपणाला घडतें, म्हणून आपण ज्ञानेश्वरी व तुकोबाचे अभंग हीं काव्यें आहेत असे म्हणतो. रामदासाच्या अध्यात्मपर प्रकरणाची भाषा काव्याची असली तरी त्यात भाषेच्या सजावटीकडे प्राय मुळींच लक्ष दिलेलें नाहीं. अर्थ रमणीय करून सांगण्याची रामदासाची हातोटी येथें मुळींच दिसत नाही. ऐहिक व पारलौकिक उन्नति साधणारे विचार त्यांनीं साध्या व सोप्या भाषेंत सांगण्यातच समाधान मानले आहे. गद्यापेक्षा पद्य पाठ करायला सोप म्हणून त्यांनीं आपल्या ग्रंथाची रचना पद्यात केली सांप्रदायिक अर्थानें पाहिलें असता समर्थांना कवि म्हणण्यापेक्षा थोर ग्रंथकारच म्हणणें अधिक बरोबर होईल मात्र विचाराची भव्यता व उत्कटता हा काव्यगुण मानल्यास समर्थांना कवि म्हणायला चिंता नाहीं. इंग्रज कवि ब्राउनिंग याच्या काव्यात विचाराची भव्यताच आहे. स्वत. रामदास यानीं "जेणें देहबुद्धि तुटे। जेणें भवसिंधु आटे। जेणें भगवत प्रगटे। या नाव कवित्व" अशी जी काव्याची व्याख्या केली आहे, तिच्यावरून भाषेच्या सजावटीकडे त्यानीं का लक्ष दिलें नाहीं हें समजेल

असें असलें तरी समर्थांची देवताख्यानपर, स्तोत्ररूप, आत्मपर अशी जी कविता आहे तिच्यात काव्य भरपूर आहे. रामायणापैकीं सुंदरकांड निःसंशय सुंदर आहे. त्यात कथानकरचनाचातुर्य व हास्यरस हीं उत्तम प्रकारचीं दिसतात. मारुतीच्या शेपटाचा पराक्रम वाचकांना हसविल्यावांचून राहत नाहीं. ब्रह्मदेवानें पत्ररूपानें ही हकिगत रामाला कळविली असताना "तया वाचितां वाचितां राम हांसे। क्रियाकौतुकें अंतरामाजि तोषे" असा तिचा परिणाम वर्णन केला आहे. युद्धकांड तर अत्यंत बहारीचें आहे. याचे तेरासे श्लोक असून ते वाचीत असतांना आपण प्रत्यक्ष युद्ध पाहातों आहोंत असें वाटूं लागतें. रामायणांतील इतर कथाभाग सोडून देवतामुक्ति घडविणारा युद्धप्रसंग समर्थांनीं निवडला यात त्याचा हेतु स्पष्ट होतो. त्या काळीं महाराष्ट्राची स्थिति लंकेतील देवांसारखी झाली होती, आणि शिवाजीराजासारख्या रामाची तो उत्कंठेनें वाट पाहात होता. आनंदवनभुवन हें काव्य भव्य व सुंदर आहे. आनंदवनभुवन म्हणजे वाराणसी व या प्रकरणात वाराणसीचाच उल्लेख आहे, पण लौकिकात मात्र हें वर्णन महाराष्ट्राचें आहे असा समज झाला आहे," असें या प्रकरणीं शंकर श्रीकृष्ण देव म्हणतात.[1] करुणास्तोत्रें एकंदर बत्तीस असून त्यात भक्ति व करुण हे दोन रस ओतप्रोत भरले आहेत. आपल्या मनींची मळमळ आणि तळमळ अगदीं जिव्हाळ्यानें समर्थांनीं यात वर्णिली आहे. अलंकाररहित काव्य भावनेच्या जोरावर किती प्रभावशाली होऊं शकतें त्याचा उत्तम नमुना म्हणजे हीं करुणास्तोत्रें होत. हीं सर्वच स्तोत्रें सरस आहेत. परंतु त्यांतहि अनुदिन अनुतापें तापलों रामराया, तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलों, बुद्धि दे रघुनायका, उदासीन हे वृत्ति कोठें न लागे इत्यादि स्तोत्रें अत्यंत बहारीचीं आहेत. समर्थांनीं दुसरें कोणतेंहि वाङ्मय निर्माण न करिता एवढीं स्तोत्रच लिहिलीं असतीं तरी मराठीवाङ्मयात तीं अमर झालीं असतीं. भीमरूपी स्तोत्रें एकंदर तेरा असून तीं ओजोगुणानें भरलेलीं आहेत. '*मनाचे श्लोक*' दोनशे पाच असून त्यात समर्थांनीं मनाशीं गुजगोष्टी करून त्याचें हित कशात आहे हें मोठ्या भावपूर्णतेनें सांगितलें आहे. तुकोबांच्या

[1] श्रीसमर्थहृदय, पृ. १२२

अभंगावर महाराष्ट्राची जशी प्रीति जडली आहे, तशीच ती रामदासस्वामींच्या या श्लोकांवरहि जडली आहे. महाराष्ट्राचें सारें वातावरण या श्लोकांनीं निनादित झालें आहे. महाराष्ट्रांत ओज व तेज भरण्याचें सामर्थ्य यांत आहे. समर्थांनीं अगदीं प्रसन्न मनानें हे श्लोक गाइले असल्यानें त्यांत भव्यता, उत्कटता व प्रसाद हे गुण सहजच आले आहेत. पदसंग्रहांत एकशे आठ पद्यें असून तीं भक्तिरसानें परिप्लुत आहेत. समर्थांच्या साहित्याला 'इतिश्री' सारखा शोभून दिसणारा व "धाव रे रामराया किती अंत पाहासी" या शब्दांनीं सुरू होणारा "धावा" भावोत्कट व रम्य आहे. कोहिनूर हिऱ्याचें तेज आणि काबुली द्राक्षांतील माधुर्य व रसवत्ता यांत आहे.

रामदासाच्या रचनेंत कांहीं दोषहि आहेत. जो मजकूर गद्यांत लिहिला तरी चालेल (किंबहुना जो गद्यातच लिहिला पाहिजे) तो त्यांनीं पद्यांत लिहिल्याकारणानें, त्यांची पुष्कळ कविता रुक्ष, नीरस झाली आहे. बाग प्रकरण, कारखाने प्रकरण इत्यादि प्रकरणें अशा प्रकारचीं आहेत. यात "प्रसंग निघाला स्वभावें। श्रोतेमध्यें काय लावावें। म्हणूनि घेतलीं नांवें। कांहीं एक ॥ १ ॥ वाटीं रामकाटीं फुलेकाटीं। नेपती सद्गुळी कारमाटी। सावी चिल्हारी सागरगोटी। हिंवर रैर खरमाटी ॥ २ ॥ ऐसा जिन्याचा प्रसंग। त्याची रुंदी यथाभाग। चौक नेमस्त घ्यावा। असोचि नये ॥ १ ॥ वीट लांबी नऊ तसू। आणि रुंदी सात तसू। उंची जाणिजे तीन तसू। पाटपोट नेमस्त ॥ २ ॥" अशा प्रकारची गद्यसदृश रचना झाली आहे. रामदासाची प्रतिभा उत्प्रेक्षामूलक किंवा सृजनशील अशी फारशी नसल्यानें त्यांनीं प्रायः काव्यमय प्रसंग असूनहि त्यांचें केवळ वर्णन केलें आहे. वर्षाकालीन वनश्रीचें वर्णन करणारें एक जें स्फुट काव्य आहे त्यावरून रामदासी प्रतिभा ही केवळ वर्णनात्मक कशी होती हें समजतें. या खेरीज त्यांच्या वृत्तरचनेंतहि अनेक ठिकाणीं शिथिलता झाली आहे. सुदर्य (सौंदर्य), राक्षेस (राक्षस), मस्यक (मशक), जननि (जननि), चितोवृत्ति (चित्तवृत्ति), शिवालये (शिवालयें), अद्धात्म (अध्यात्म), स्तूति (स्तुति), अक्षै (अक्षय) इत्यादि सारखीं अशुद्धें त्यांच्या ग्रंथांत जागोजागी आहेत. रामदासी संप्रदायाचीं

जीं वीस लक्षणें[1] सांगितलीं आहेत त्यांत 'प्रथम लिहीणें दुसरें वाचणें। तिसरें सांगणें अर्थांतर' असें लिहिलें आहे या संप्रदायांत गद्यसदृश रचना का निर्माण झाली, याचा बोध या सांप्रदायिक दंडकावरून होण्याजोगा आहे

समर्थ संप्रदायांतील काहीं प्रमुख व्यक्तींचा व कवींचा उल्लेख येथेंच करणें युक्त होईल. श्री समर्थ रामदास, श्री जयरामस्वामी वडगांवकर (शके १५२१ ते १५९४) रंगनाथस्वामी (शके १५३४ ते १६०६) निगडीकर, आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर (मृ. शके १६१८) आणि केशवस्वामी भागानगरकर (मृ. शके १६०४ या पांचजणांस त्या वेळच्या लोकांनीं 'रामपंचायतन' असें नांव दिलें आहे जयरामस्वामींनीं लिंगायत घराण्यांत जन्म घेऊनहि कृष्णोपासनेचा प्रसार केला. त्यांनीं दशमस्कंध टीका, रुक्मिणीस्वयंवर, सीतास्वयंवर व अपराधानुक्रम हे ग्रंथ लिहिले याच रामदासी परंपरेंत जयराम नांवाचा दुसरा कवि झाला त्याचे श्लोक, पदें, अभंग अशी विविध रचना मनोहर व साधी आहे रामजोगी रंगनाथस्वामींनीं गजेंद्रमोक्ष, गुरुगीता, पंचीकरण योगवासिष्ठसार इत्यादि ग्रंथ लिहिले व पुष्कळ सुंदर पदें रचिलीं. आनंदमूर्ति व केशवस्वामी यांनीं काहीं पद्यरचना केली. कवयित्रींत वेणाबाई (शके १५५० ते १६००) हिची विशेष ख्याति आहे हिनें पदें, अभंग व इतर ग्रंथरचना बरीच केली आहे त्यांत सीतास्वयंवर हा ग्रंथ विशेष सुंदर आहे ग्रंथ ओवीबद्ध असून याचे एकंदर चौदा समास आहेत ग्रंथांत जागोजागीं सुंदर स्वभावचित्रें व वस्तुचित्रें आलीं आहेत रामदासांचे वडील बंधु गंगाधरपंत (शके १५२७ ते १६११) ऊर्फ श्रेष्ठ (रामीरामदास) यांनीं हरिहरैक्य परविचारा 'भक्तिरहस्य' व सगुणोपासनेचा तरफदारी करणारा 'सुगमोपाय' असे दोन ग्रंथ लिहिले आहेत दिनकर गोसावी (शके १५५० १६२८) यांचा 'स्वानुभवदिनकर' हा ग्रंथ ६७०० ओव्यांचा असून त्यांत वेदांत व भक्तिमार्ग यांचें विवेचन आहे रामदासी वाङ्मयांत दासबोधाच्या खालोखाल याची योग्यता मानतात रामदासी संप्रदायांतील इतर

१ श्री रामदासस्वामींचे समग्र ग्रंथ, स ल रा. पांगारकर, पृ ४८६

कवींची माहिती 'दक्षिण हिंदुस्थानांतील कवि' व 'कृष्णदयार्णव श्रीधर' इत्यादि विभागांत पुढें दिली आहे.

रामदासाच्या कल्याण उद्धवादि इतर शिष्यांनींहि थोडी फार ग्रंथरचना त्या काळाला अनुसरून केली असली तरी ती सामान्य प्रतीची अशी आहे. रामदासाची कळकळ व स्वदेशप्रीति यांपैकीं एकांतहि नाहीं नाहीं म्हणायला देवदासाची काहीं कविता मात्र जोरदार आहे. मुसलमानांची अप्रीति व स्वदेशप्रेम याच्या काव्यांत आहे यानें गजेंद्रमोक्ष नावाचें लहान काव्य प्रमाणिका वृत्तांत रचिलें आहे 'अनंचितसुत कासि' यानें श्लोकबद्ध व ओंवीबद्ध असे द्रौपदीस्वयंवर प्रसंगावर दोन ग्रंथ लिहिले असून त्यांपैकीं ओंवीबद्ध ग्रंथ शके १६१८ पौष वद्य १० मीस त्यानें पुरा केला असें वर्णन आहे. महानुभाव पंथांत याचे ग्रंथ विशेष वाचिले जातात याच काळांत दुसरा एक उल्लेखनीय कवि होऊन गेला. त्याचें नांव शिवराम[१] शिवरामस्वामींचा जन्म शके १५५४ मध्यें झाला व त्यांनीं हा लोक शके १६११ (?) मध्यें सोडिला यांनीं शेकडो ओंवीबद्ध व श्लोकबद्ध ग्रंथ रचिले असून ते सर्व वेदांतपर व भक्तिपर आहेत. यानें भागवताच्या एकादशस्कंधावरहि टीका केली आहे.

---

१ शिवरामाच्या वडिलांचें व गुरूचें नांव पूर्णानंद. पूर्णानंदाच्या गुरूचें नांव महानंद.

# १०

## वामन पंडित[1]

शिवशाहींत काव्यगुण आणि काव्यसंख्या या दोन्ही दृष्टींनीं सर्वश्रेष्ठ ठरणारा कवि म्हणजे वामन पंडित हाच होय. स्वराज्याच्या ऐश्वर्याला भव्यतेला आणि शुचितेला साजेसेंच त्याचें काव्य होतें. शिवशाही म्हटली कीं तुकाराम आणि रामदास हीं दोन नांवें चटकन् आपल्या नजरेसमोर येतात. यांचें कारण दोघांच्याहि मागें असलेलें संप्रदायाचें पाठबळ. वारकरी संप्रदाय आणि रामदासी संप्रदाय असे दोन प्रभावशाली व बलिष्ठ संप्रदाय तुकाराम रामदासांना लाभल्यामुळें त्यांचीं नांवें आणि काव्य सर्वतोमुखीं व्हायला मदत झाली यांत शंका नाहीं तुकाराममहाराज हे उच्च कोटींतील संत होते काव्यकरण्याच्या दृष्टिपेक्षा मनःपूर्वक पांडुरंगाची सेवा करण्याची त्यांची मनोवृत्ति होती. प्रांजळपणा आणि जिव्हाळा यामुळें त्यांच्या साध्या उद्गारांना भावगीतांचें स्वरूप आलें आहे. रामदास हे राजकारणी संत होते. आपल्या संप्रदायांतील मंडळींना उपदेश करण्याच्या उद्देशानें त्यांनी दासबोधाची रचना केली असें करीत असतांना त्यांचीहि दृष्टि काव्याच्या सजावटीपेक्षा विषयप्रतिपादनाकडेच अधिक होती कांहीं आख्यानें व करुणाष्टकें सारख्या त्यांच्या रचनेंत काव्यगुण आहेत. परंतु असल्या काव्यांची संख्या कमीच भरेल. काव्यगुण ओतप्रोत ज्यांच्या काव्यांत भरले आहेत अशा रघुनाथ पंडितांची येथें आठवण होणें साहजिक आहे. नलदमयंतीस्वयंवराख्यान हें काव्य अष्टपैलू हिऱ्यासारखें आहे यांतहि शंका नाहीं

---

१ वामन नरहरि शेषे ऊर्फ वामन पंडित हे मूळ विजापूरचे राहणारे ऋग्
वासिष्ठगोत्री ब्राह्मण मृत्यु वैशाख शु ६ शक १६१७.

परंतु संख्येच्या दृष्टीनें एका हाताच्या बोटावर मोजण्याइतकीहि रघुनाथ पंडिताची काव्यरचना नाहीं. विविधता, विपुलता आणि विदग्धता जर आपणाला पाहावयाची असेल तर वामन पंडिताच्या काव्याकडेच वळलें पाहिजे. तुकाराम रामदास-रघुनाथ पंडित यांना प्रत्यक्ष राजाश्रय किंवा राजप्रीति यांचा लाभ झाला होता. असल्या आश्रयाकडे किंवा प्रीतिकडे पाठ फिरवून वामन पंडितानीं वाग्ब्रह्माची उपासना केली. महाराष्ट्रांत पुन: स्थापन झालेल्या स्वराज्याच्या काळांत वामन पंडितानें आपल्या काव्याची रचना केली असूनहि, त्यांत त्या स्वराज्याचा प्रत्यक्ष किंवा परोक्ष कोणत्याहि प्रकारचा उल्लेख नाहीं. ज्ञानानंद आणि काव्यानंदांत निमग्न असलेल्या पंडितांना भोंवतालच्या जगाची मुळींच जाणीव असलेली दिसत नाहीं. अर्थात् ही घटना बऱ्याच अंशानीं तत्कालीन लौकिक काव्य न रचण्याच्या प्रवृत्तीमुळेहि निर्माण झाली असावी. सभोंवतालीं चालू असलेल्या गोष्टींचा ज्याप्रमाणें वामन पंडितानें आपल्या काव्यांत निर्देश केला नाहीं, त्याचप्रमाणें त्यानें खुद्द स्वतःचाहि उल्लेख फारसा कोठें केला नाहीं. वामन पंडिताच्या जीवनाविषयीं-त्याचे मातापितर आणि पत्नी यांच्या नावांखेरीज आणि गुरु सच्चिदानंद यांच्या भेटीच्या प्रसंगाखेरीज-त्याच्या काव्यांत कोठेंहि काहीं माहिती आलेली नाहीं.

वामन पंडिताच्या काव्याचे वेदांतविषयक, पौराणिक आख्यानपर आणि भाषांतरित असे तीन भाग पाडतां येतील. त्याच्या उपलब्ध असलेल्या सुमारे चाळीस हजार कवितेपैकीं (म्हणजे कवितेच्या ओळींपैकीं) निम्म्याहून अधिक कविता वेदांतविषयाला वाहिलेली आहे. यांत यथार्थदीपिका, निगमसार, चित्सुधा, प्रियसुधा, तत्त्वमाला, राजयोग, प्रेमलहरी, गीतार्णवसुधा, कर्मतत्त्व इत्यादि छोटीं मोठीं प्रकरणें आहेत. या सर्व काव्यांवरून वामन पंडिताची गाढ विद्वत्ता आणि खोल अध्यात्मज्ञान यांचा चांगलाच प्रत्यय येतो. यथार्थदीपिका काव्याच्या २२२६६ ओव्या असून, त्यांत भगवद्गीतेचा जसा असेल तसा अर्थ विस्तारपूर्वक सांगण्याचा हेतु पंडितांचा दिसतो. गीतेच्या सातशे श्लोकांवर सुमारे बावीस हजार ओव्यांचें केलेलें हें सुबोध व्याख्यानच म्हणावयाचें. ज्ञानेश्वरानीं सुमारे नऊ हजार

ओव्यांची भावार्थदीपिका उर्फ ज्ञानेश्वरी नामक गीताटीका तयार केली. तिच्यापेक्षा वेगळें व अधिक चांगलें आपण कांहीं तरी करतो आहोत याची जाणीव पंडितांनीं जागोजागीं व्यक्त केली आहे. ज्ञानेश्वरीच्या सुरुवातील गणपतीला नमन करण्यात आलें आहे. भगवद्गीता उर्फ कृष्णगीता रचीत असतांना, गणपतीला करण्यात आलेल्या या वंदनाबद्दल ज्ञानेश्वरांना वामन पंडितांनीं एक कोपरखळी लगाविली आहे. भावार्थदीपिकेंत व इतरहि गीताटीकांत गीतेचा खरा अर्थ आलेला नाहीं. तो खराखुरा अर्थ सांगण्याकरिता, निंदास्तुतीची पर्वा न करिता, आपण यथार्थदीपिका तयार करीत आहोत असें पंडितांचें म्हणणें आहे. ते म्हणतात, "टीका उदंड जाल्या। परी देवतास तदुपासकांस म्याल्या। यथार्थ अर्थ नाहीं बोलिल्या। तैसी नव्हे हे टीका ॥११६४॥ म्हणोनि यथार्थदीपिका। नाव पावली हे टीका। की अद्वैत आणि भक्तिवें एका। श्रीवत्सांका जगद्गुरूतें ॥११६५॥ विघ्न न हो म्हणोनि। आरंभी देवा एका प्रार्थुनी। स्फूर्ती देईल हे इच्छा धरोनी। प्रार्थना एका आणिकाची ॥११६६॥ . कोणाची नसे भीड। आणि कोणाची नसे चाड। अनन्यभक्ति लागता गोड। या भगवद्गीतेंत ये रीती ॥११७९॥ वाचोत जे वाचिती। न वाचोत जे वाईट मानिती। संतुष्ट होय एक जगत्पति। या यथार्थ निरूपणें ॥११८०॥ अध्याय ७॥" नुसतं रूक्ष ज्ञान किंवा नुसती आंधळी भक्ति ही कुचकामाची असून ज्ञानयुक्त सगुणभक्तिच खरा मोक्ष मिळवून देऊं शकते, हा वामन पंडितांचा ठाम सिद्धांत असून तो आपल्या सर्व अध्यात्मपर ग्रंथांत स्पष्टपणें मांडला आहे. यथार्थदीपिकेच्या निमित्तानें त्यांनीं हेंच गीतेचें सार पुढील शब्दांत सांगितलें आहे. "ऐसें ब्रह्म तेंचि सगुण। ऐसा ज्ञाननिष्ठ भक्त निपुण। भगवत भागवत ऐसी खूण। जेथें वेगळी न सांपडे ॥१२६॥ सगुण ब्रह्म चराचर। गीतेंत या ज्ञानाचा आदर। म्हणूनि 'धर्म्यपद' वारंवार। या ब्रह्मज्ञानीं योजिलें ॥१२७॥ अ. १॥" भगवद्गीतेचा यथार्थ प्रगट करणारी व्याख्या करीत असतांना पंडितांनीं जागोजाग श्रुति व श्रीमद्भागवतादि ग्रंथांचे आधार दिले असल्यानें, ती व्याख्या जोरदार बनली आहे यांत शंका नाहीं. यथार्थदीपिका रचीत असतांना काव्य करणाऱ्या कलावंताची दृष्टि

पंडितांनी स्वीकारली नसून, वाचकांना गीतेंतील विषय सुलभतेनें कळावा इतकीच दृष्टि स्वीकारली आहे. ज्ञानेश्वरांनी गीतेचा भावार्थ सांगत असतांना काव्याचा भारफुलोरा निर्माण केला आहे. ज्ञानेश्वरी आपल्याशीं एखाद्या मैत्रिणीप्रमाणें गुजगोष्टी करीत असलेली दिसते तर यथार्थदीपिका एखाद्या मातेप्रमाणें खराखुरा मोलाचा उपदेश करिते. पंडितांचा अध्यात्मपर रचना किती सुबोध असे त्याचा नमुना म्हणून पुढें तीन चार ओव्या दिल्या आहेत. "आत्मा कळतां केवळ। विदित होय हें विश्व सकळ। कीं ओळखितां समुद्र जळ। ओळखिले तरंग सर्वेहि ॥१४२२॥ कळतां तंतु एक। पट कळले अनेक। कळतां एक कनक। अलंकार सर्व कळतीच ॥१४२३॥ कळतां एक मार्ता। कळल्या घटादि सर्व जाती। आत्मा कळतां चराचर मूर्ती। अवघ्याच कळल्या ॥१४२४॥ या कारणें आत्मज्ञ। तोचि जगीं सर्वज्ञ। सर्वज्ञास म्हणती अभिज्ञ। विपश्चित् म्हणूनी ॥१४२५॥ अ. २॥" ज्ञानेश्वरी ही तिच्यातील पहिल्या प्रतीच्या काव्यगुणामुळें आणि वारकरी संप्रदायाच्या पाठबळामुळें अत्यंत लोकप्रिय झाली आहे यांत शंका नाहीं. तसलें भाग्य यथार्थदीपिकेला मिळणें अशक्य असलं तरी ती जागल्या लोकांच्या आदराला किती पात्र झाली होती हे कविवर्य मोरोपंतांच्या पुढील उद्गारावरून कळेल. "केली श्रीगीतेची व्याख्या। बहुमति जींत गाजविली। गाजविली साधु सभा भाषा कविकुलनरशक्ति लाजविली॥" कर्मतत्त्व या आध्यात्मिक प्रबंधाचे आठ अध्याय असून ते श्लोकवृत्तांत आहेत. फलतत्त्व, यत्नतत्त्व, भोगतत्त्व, भोक्तृतत्त्व, आत्मतत्त्व, वेदतत्त्व, जीवतत्त्व आणि अनुभवतत्त्व याप्रमाणें या अध्यायांतील विषय आहेत. भक्ति आणि अद्वैतज्ञान यांची सांगड याहि प्रसंगांत पंडितांनी श्रुतिप्रमाणानें घातली आहे. आपला हा ग्रंथ 'भवबंधहारी' आहे असे ते सांगतात. निगमसार हा ग्रंथ ओवीवृत्तांत असून त्याचे नऊ अध्याय आहेत. सर्व वेदांचें सार म्हणून अद्वैत तत्त्वज्ञानाचें विवरण यांत आलें आहे. वामन पंडितांचे गुरु श्रीमच्चिदानंद यांच्या भेटीचा प्रसंग मुरुमातील दिला असून तो दशरीचा आहे. पंडितांच्या ग्रंथांपैकीं फक्त याच ग्रंथाच्या शेवटीं "शके पंधरा शतें पंचाण्णव। तें ग्रंथ प्रगटला अभिनव।

जो अनादि अनुभव । सकळ संताचा" ग्रंथाचा रचनाकाल दिला आहे. चिन्सुधा, मित्रसुधा, राजयोग, प्रेमभरी, गीतार्णवसुधा, तत्त्वमाला इत्यादि अध्यात्मपर प्रकरणें छोटी असून श्लोकवृत्तात्मक आहेत. मित्रसुधा हें प्रकरण तर अवघ्या अठरा श्लोकांचें असून त्यात पंडितानीं आपली पत्नी गीता हिला आपलाच आत्मा आपणाला कसा मित्र असतो तें सुबोध भाषेंत सांगितलें आहे. 'परम आनंदि आपुलि आपणा वळख तूं तुज राहुनि मीपणा' हें प्रस्तुत काव्याचें पालुपद आहे. यासर्व अध्यात्मपर प्रकरणांत अद्वैतज्ञानाचें प्रतिपादन असून ज्ञानयुक्त सगुणभक्ति ही सर्वश्रेष्ठ होय असा अंतःप्रवाह त्यात वाहत असतो.

अध्यात्मपर कवितेच्या खालोखाल वामनानें आख्यानपर कविता लिहिली. हीं आख्यानें त्यानें रामायण, महाभारत व श्रीमद्भागवत या ग्रंथांतील कथांच्या आधारें रचिलीं. त्यानें लिहिलेल्या सुमारे चाळीस आख्यानांपैकीं सीतास्वयंवर, भरतभाव, नामसुधा, वनसुधा, वेणुसुधा, हरिविलास, कात्यायनीव्रत, रासक्रीडा, द्वारकाविजय, राधाविलास, राधाभुजंग, जलक्रीडा इत्यादि आख्यानांवर रसिकांच्या उड्या पडतात. हीं सर्व आख्यानें विविध श्लोकवृत्तात्मक असून तीं अत्यंत बहारीचीं आहेत. प्रत्येक आख्यानाच्या सुरुवातीला मंगलाचरण किंवा नमन असून त्यातच प्रायः आख्यानांतील विषयाचा सारांश सांगितलेला असतो. आख्यानाकरिता निवडलेला प्रसंग नाट्यपूर्ण असून त्याची मांडणी अत्यंत आकर्षक असते. नामसुधेंत अजामिळाचा लिंगदेह यमदूत नेत असताना तेवढ्यात विष्णुदूत येऊन त्याला सोडवितात. राधाविलासांत श्रीकृष्ण व राधा यांची क्रीडा चालली असताना बाहेर राधेच्या पतीची हाक ऐकू येते. आकर्षक व नाट्यपूर्ण प्रसंगाबरोबरच आख्यानांत संवादाची कुशलपणें योजना केलेली असते. या संवादावरून बोलणाऱ्या पात्राचा स्वभाव उत्तम प्रकारें कळतो. शृंगार, वीर, करुण, हास्य इत्यादि रसांचा परिपोष होईल अशा प्रकारें भावनांची गुंफण प्रत्येक आख्यानांत केलेली असते. आख्यानांत वर्णिलेले प्रसंग आपण प्रत्यक्ष पाहतों आहोंत अशा प्रकारें ते रेखाटलेले असतात. वनसुधेंतील मस्तकीं पल्लवाचे तुरे खोवून आणि गळ्यात गुंजांच्या माळा घालून व मर्कटपुच्छ हातीं

धरून 'वृद्धि इडो' पाहणारे आणि बेडकाप्रमाणें टुणटुण् उड्या मारणारे 'बाळ ते बल्लवाचे' आपण प्रत्यक्ष पाहतों आहोंत असें आपणाला वाटतें. आख्यानातील रसाला व प्रसंगाला पोषक अशा वृत्तांत श्लोकरचना केलेली असून हे श्लोक अनुप्रासादि शब्दालंकार व उपमा रूपकादि अर्थालंकार यानीं नटलेले व सामान्यपणें प्रसादपूर्ण असे असतात. रामचंद्र बडवे यानीं 'सुश्लोक वामनाचा' म्हणून ज्या श्लोकाचा गौरव केला ते श्लोक आख्यानपर कवितेंत जागोजागीं आहेत. 'गोऱ्या गौळिणि सावळ्या हरितनू रासोत्सवीं नाचती । श्रीगंगे यमुनेमधें तरल ते कल्लोल आंदोलती । गोपीलोचन मीन लोलमकर श्रीकुंडलें डोलती । गोपस्त्रीकुचकुंभ तारक करी पोहे रतीचा पती ॥ किंवा अंग वक्र अधरिं धरि पावा, गोपवेष हरि तोचि जपावा । वाम बाहुवरि गालहि ठावा तो ठसा स्वहृदयांत पडावा ॥ सारख्या श्लोकांत हिऱ्याची चमक आणि ताज्या खुडलेल्या मोगऱ्याच्या फुलाचा सुगंध नाहीं असें कोण म्हणेल ? या सर्व आख्यानांतूनहि ज्ञानयुक्त सगुणभक्तीचाच महिमा वामनानें वर्णिला आहे. ईश्वर स्थावरजंगम सर्व पदार्थांत असला तरी ईश्वरानें जे जे अवतार घेतले त्यांचीं नावें जाणतेपणानें घेतलीं असतां अमृताप्रमाणेंच तीं घेणाऱ्याला अमृतत्त्व मिळवून देतात असें नामसुधा या काव्यांत सांगण्यांत आलें आहे. वामन पंडिताच्या पूर्वी काहीं महानुभाव कवि कवयित्रींनीं आणि एकनाथ मुक्तेश्वरादिकांनीं काहीं आख्यानक कविता लिहिली आहे हें खरें. परंतु वामनाच्या आख्यानांत जी नाम्यपूर्णता आकर्षकता व सफाईदारपणा आहे ती इतरत्र क्वचित्‌च आढळते. शिवाय विविधता व विपुलता याहि दृष्टीनें पाहतां तो आख्यानक काव्य रचणाऱ्या कवींत फारच वरच्या दर्जाचा वाटतो.

वामनाच्या स्फुट रचनेंत करुणाष्टक, उपदेशमाला, मनास, बोध, वामनबोध सिद्धांत, भगवद्दास्य इत्यादि प्रकरणांचा व पदांचा अंतर्भाव होतो. माझे विरींच मन निष्ठुर केवि केलें, असें पालुपद असलेलें करुणाष्टक हृदयस्पर्शी आहे. मना कासया व्यर्थ चिंता वहासी ? दिसे तें नसे काय अज्ञान हासी ?— अशा शब्दांत व्यक्त होणाऱ्या 'मनासबोध' हे काव्य वाचीत असतांना रामदासस्वामींच्या 'मनाचे

श्लोक' या काव्याची आठवण होते. वामनानें रामदासस्वामींचा उल्लेख आपल्या आपल्या काव्यात कोठेंहि केलेला नसला तरी त्यांच्या ग्रंथाशीं त्याचा चांगलाच परिचय असावा असें प्रस्तुत काव्यावरून वाटतें. पदांपैकीं 'अर्जुना तूं जाग रे, होसील सुज्ञ रे, विश्व नाहीं मीचि आहे सख्या तुही जाग रें' हें पद सुंदर व अर्थपूर्ण आहे.

वामन पंडिताच्या भाषांतरित काव्यांत चतुःश्लोकी भागवत, शंकराचार्यकृत अपरोक्षानुभूति, समश्लोकी भगवद्गीता, पंडित जगन्नाथकृत गंगालहरी व भर्तृहरिकृत नीतिशतक, शृंगारशतक व वैराग्यशतक इत्यादि काव्यांचा अंतर्भाव होतो. संस्कृत कवींच्या काव्यांचा वामनानें जो मराठी वाचकांना परिचय करून दिला तो त्यांना इतका आवडला की, निदान भर्तृहरिपुरतें तरी असें म्हणावयास हरकत नाहीं कीं, हा कवि वामनाच्या द्वारेंच मुख्यतः मराठी जाणणाऱ्यांना माहित आहे. समश्लोकी गीतेसंबधानें मोरोपंत म्हणतात, "रीति समश्लोकींची अतुल साधेल काय नव्यास। या सुपदें होईल कां रोमांचव्याससार न व्यास." या खेरीज पंडितांनीं सिद्धांतविजय व अनुभूतिलेश नांवाचीं दोन अध्यात्मपर प्रकरणें संस्कृतांत लिहिलीं असून तीं चांगलीं साधलीं आहेत.

वामन पंडिताच्या काव्यांत कांहीं किरकोळ दोष आहेत. पुनरुक्तीचा दोष अनेक ठिकाणीं झाला आहे. नामसुधेंत हा दोष फारच उत्कटत्वानें भासतो. सुतांबद्दल सूत, शरणांबद्दल शर्ण, लोपवोनि ऐवजी लोपोनि, चौवेही ऐवजीं चौपही असलें ऱ्हस्वदीर्घांची ओढाताण कांहीं ठिकाणीं आहे. अघसोनडी, मुरगाळ्गाळी, गळीरवें, मोरपत्रमाखे घेडगुजरा किंवा दुष्टसमासहि झाले आहेत. संविरहितत्वाचा दोषहि अनेक ठिकाणीं झाला आहे. रसदृष्ट्या संभोग शृंगाराचीं जीं वर्णनें राधाविलास व राधासुधा या काव्यांत आलीं आहेत तीं देखील आजच्या दृष्टीनें पाहतां सदोष वाटतात. परंतु हे सर्व दोष अल्प असून ते केवळ सूर्यावरील डागाप्रमाणेंच होत. वामन पंडिताची काव्यरचना खरोखरच अपूर्व आहे. श्रीधर म्हणतो, "जैसा चटाशु सतत व्योमीं। तैसाचि केवळ वामनस्वामी। त्याची श्लोकरचना ये भूमीं। भूमंडळावरी अपूर्वता ॥"

वामन पंडिताचे समकालीन असे नागेश व विठ्ठल यांचा येथेंच उल्लेख केलेला बरा. नागेश हा अहमनगराजवळील भिंगार येथील ऋग्वेदी जोशी होता. याचें उपनांव मुळे विठ्ठलाचें संपूर्ण नांव विठ्ठल अनंत क्षीरसागर व हा रहाणारा बीडजवळील गौरिपुर गावचा याचा धंदा व्यापाऱ्याचा असे नागेशानें सीता स्वयंवर, चंद्रावळी, रुक्मिणीस्वयंवर, रसमंजरी आणि शारदाविनोद अशीं पांच काव्यें लिहिलीं आहेत यांचें काव्य श्लोकबद्ध असून, जरी त्यांत संयमाचा अभाव असला तरी त्यांत सहज स्फूर्ति आहे. " भ्रम धरी मकरीपरी चंचला। मन हरी न हरी अशि कोकिला। रसरसी सरसीरुहलोचनी। गजगमा जशि मानसमोहनी ॥" हें चंद्रावळीचें वर्णन व " रुळत चंचळ अंचळ भूवरी। उमटतो वलयध्वनि अंबरीं। मदभरें मग गौळणी चालती। थरथरा स्तनमंथर हालती ॥" इत्यादि तिच्याबरोबर गोरस विकावयास जाणाऱ्या मैत्रिणींच्या वर्णनाशीं वामनी श्लोकाचें किंचितरी साम्य दिसतें विठ्ठलाच्या नांवावर हल्लीं रुक्मिणीस्वयंवर (श १५९६), पांचालीस्तवन (श १५९६), सीतास्वयंवर (१५९९), रसमंजरी (१६०१), द्रौपदीवस्त्रहरण (श. १६०२), विठ्ठलीनन व बिल्हण चरित्र असे सात ग्रंथ प्रसिद्ध असून ते सर्व श्लोकबद्ध आहेत. सीतास्वयंवर व रुक्मिणीस्वयंवर यांत प्रत्येकीं सात सर्ग असून, विठ्ठलीननांत सात उल्लास आहेत रुक्मिणीस्वयंवरांत निरनिराळीं वृत्तें, निरनिराळे छत्र, चामर, गज, डमरू, सर्प इत्यादि बंध, चमत्कृतिजनक अशी "वीराजते मत्त उदार पाई। वीरा धरीं शक्ति शरास साहे। हे साहस शक्ति शरीं धरावी। हें पावन उत्तम तेज राजी" यासारखी प्रतिलोम यमकें व अनुप्रासादि अलंकार भरपूर आहेत. आपलें चित्रकाव्यरचनाकौशल्य व छंदःशास्त्रनैपुण्य दाखवून विद्वानांकडून वाहवा मिळवावी अशी याची इच्छा दिसते विठ्ठलाच्या पूर्वी अशा प्रकारची बहुप्रयासक रचना मराठींत कोणीहि केलेली नाहीं या सर्व रचनेंतील गोरे काव्य, रसरंग, भावनांचा ओलावा इत्यादि कोठेंच दिसत नाहींत रुक्मिणीस्वयंवर काव्यापेक्षा सीतास्वयंवर काव्य अधिक सरळ, प्रसादपूर्ण व सरस आहे यांत एक दोनच कूट श्लोक असून काहीं काहीं वर्णनें हुबेहूब

आहेत. भानुदासाच्या संस्कृत रसमंजरीचें व बिल्हणचरित्राचें यानें केलेलें भाषांतर याच्या स्वतंत्र काव्यापेक्षा सरस उतरलें आहे. विशेषतः वसंततिलका या गोड वृत्तात गाइलेलें बिल्हणचरित्र चांगलें आहे. कल्याणीचा राजा विक्रमार्क देव याची कन्या चंद्रकला हिच्यासाठी वधस्तंभावर जाण्याचा प्रसंग आला, तरी शेवटीं बिल्हणानें तिचाच ध्यास धरिला व त्याचा परिणाम राजाच्या मनावर होऊन त्यानें स्वकन्येचा त्याचाशीं विवाह लावून दिला. हा प्रसंग चांगला वर्णिला आहे. " अद्यापि ते नृपसुता रति भोगकालीं। प्रेमाकुलें करयुगें धरि कंठनालीं। ढंतोष्ठ पीडनशतें सुम्भार रात्री। ते मी स्मरें मदनमंदिर देवदेवी॥ अद्यापि धूर्जटि धरी विष तें स्वकंठीं। कूर्मे धरागिरिवरा धरलें स्वपृष्ठीं। अंभोनिधीस वडवानल नित्य जाळी। वेलाधिकार बुध पाळिती सर्व काळीं" इत्यादि ओळींवरून या काव्यातील प्रसादगुण प्रत्ययास येतो.

# ११

## दक्षिण हिंदुस्थानांतील कवी

शिवाजीमहाराजाच्या काळात महाराष्ट्रात ज्याप्रमाणें भरघोस साहित्य निर्मिती होत होती, त्याचप्रमाणें जेथें जेथें महाराष्ट्रीय वसत होते, तेथें तेथें ते सरस्वतीची उपासना करीतच होते. मराठी माल्याबरोबर मराठी लेखणीचीहि चमक या काळीं दूरदूर दिसत होती. मराठे तंजावराकडे शहाजीराजे भोंसले यांच्या बरोबर गेले व तेथें त्यांनी राज्यस्थापनेबरोबरच आपल्या सारस्वताचाहि प्रसार केला. शहाजी-शिवाजी-व्यंकोजी शाहू यांच्या दक्षिणेकडील राज्यानें, मराठी भाषा व साहित्य यांचाहि प्रसार त्या प्रांतात झाला. राजभाषा मराठी असल्यानें, थेट दक्षिणेकडील राजांना व इतर लोकांना तिचा अभ्यास करावा लागला. आपले अर्ज व आपला पत्रव्यवहार त्यांना मराठींतून चालवावा लागला. या कामीं त्यांना महाराष्ट्रांतून गेलेल्या महाराष्ट्रीय मंडळींचा चांगलाच उपयोग झाला. या महाराष्ट्रीय कुटुंबांपैकीं काहींनीं दक्षिणेंतच स्थायी होऊन, आपल्या संस्कृतीची व साहित्याची चांगली जोपासना व अभिवृद्धि केली. शिवाजीमहाराजांबरोबर रामदासस्वामींनीं आपल्या शिष्यवर्गांपैकीं भीमस्वामी (शके १५६४ ते शके १६६३) अनंतमौनी, गणेशस्वामी वगैरे शिष्य तिकडे धाडिले होते. या शिष्यमंडळींनीं तिकडे रामदासी संप्रदाय व मराठी भाषा याची उत्तम सेवा केलेली दिसते. यांचे मठ व शिष्यपरंपरा आजहि तंजावर प्रांतात चालू आहे. भीमस्वामींनीं प्रत्यक्ष साहित्य निर्मिती फारशी केलेली नाहीं. काहीं पदें व भक्तलीलामृत (शके १७२०) इतकीच त्यांची साहित्यसंपदा आहे. अनंतस्वामींचे शिष्य मेरुस्वामी यांनीं बरीच व सरस ग्रंथरचना केली आहे. रामसोहळा या ९४२७ ओव्यांच्या ग्रंथांत दासबोधातीलच बहुतेक विषय असून शिवाय समर्थांचें चरित्र व कवीच्या तीर्थयात्रांचें वर्णन आलें आहे. भीमोपदेश ग्रंथात मुमुक्षुदशा, राम मारुति

सभाद, पतितपावन कथा इत्यादि अनंत विस्तार असले तरी तो रसाळ आहे. रामदासस्वामींना शिष्य माधव याने विपुल रचना केली आहे. श्लोकबद्ध रामायण, ओवीबद्ध रामायण, योगवासिष्ठ, गणेशपुराण, विष्णुपुराण, अश्वमेध व अठरा पर्वे महाभारत (शके १६२९) अशी याची एकदर रचना आहे. त्यांपैकी महाभारताचा प्रसार मद्रास प्रांतात पुष्कळ झालेला दिसतो. याची अध्यायसंख्या ९२४ असून, कर्त्याने तो कावेरी नदीच्या काठी गौरीमयूर या गावी लिहिला. ग्रंथाची भाषा व रचना साधारण प्रतीची आहे. माधवाप्रमाणे विस्तृत रचना करणारा दुसरा या प्रांतातील कवि रघुनाथ हा होय. याने 'कावेरीमाहात्म्य' नावाचे मांत्रिकाच्या उपयोगी पडणारे विस्तृत काव्य लिहिले आहे. कावेरी नदीच्या काठी दासानुदास, भगवत, वैद्यनाथ नावाचे आणखीहि कवि होऊन गेले. दासानुदास (शके १६२६) ऊर्फ राम याने ज्ञानसंन्यास, सिद्धानुभव, बाळक्रीडा, ज्ञानामृत, ज्ञानसागर इत्यादि ग्रंथ रचिले. भगवताने सच्चिदानंदविलास, निजसुख वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. वैद्यनाथाची रचना फारशी महत्त्वाची नाही. या सर्व कवींची रचना अध्यात्मपर, भक्तिपर व अनेकवृत्तात्मक आहे. याच काळात इकडील कवींनी *लक्ष्मीनारायणकल्याण नाटकासारखी शेकडो पौराणिक नाटकेहि लिहिली. ही नाटके* बखरटप्प्याच्या अगदी सामान्य प्रतीची असल्याने, त्याच्या कर्त्यांनी ती शाहूराजाच्या नावाने प्रसिद्ध करायला परवानगी दिली असावी. या सर्व रचनेत पोवाडे व लावण्या ही मर्द मराठ्यांची गीते दिसत नाहीत. महाराष्ट्रातील मराठ्यांचा पराक्रम जसा गाजला, तसा येथील मराठ्यांचा गाजला नाही हे कदाचित् याचे एक कारण असेल, निळंगानाद येथील मठपति अनंत कवि याने सुलोचना गहिंवर (शके १६४३) व सुलोचना आख्यान (शके १६४५) नावाची काव्ये लिहिली अनंतकवींचे "प्रभात काळीं जननी यशोदा। उठीं म्हणे सत्वर या मुकुंदा। गोपाळ येती तुजला पहाती। गोविंद दामोदर माधवेति" हे गोपीगीत सुप्रसिद्ध असून सोपे व नादमधुर आहे अनंताप्रमाणे आनंदतनय (मृत्यु शके १६४५) हाहि कवि स्त्रियांच्या व मुलांच्या आवडीचा आहे याने पौराणिक प्रसंगावर गीते केली असून ती प्रतिभायुक्त नसली तरी गोड आहेत भारत, भागवत, रामायण इत्यादि ग्रंथातील पौराणिक कथांवर आधारलेली याची शेकडो आख्याने असून

तीं कीर्तनकारांना कामधेनूप्रमाणें उपयोगी आहेत. गोसावीनंदनानें ज्ञानमोदक, सीतास्वयंवर, काहीं स्तोत्रें व अष्टकें लिहिलीं असून तीं साधीं व सरस आहेत.

दक्षिणेकडील या सर्व कवींत तंजावर येथील सुप्रसिद्ध रघुनाथ पंडित हा सर्वश्रेष्ठ दिसतो. आनंदतनयाच्या मुलाला रघुनाथ पंडिताची मुलगी दिली होती. रघुनाथ पंडितानें नलदमयंतीस्वयंवराख्यान, गजेंद्रमोक्ष व रामदासवर्णन इत्यादि काव्यरचना केली. त्यांत त्याची कीर्ति प्रथमच्या काव्यानें महाराष्ट्रभर व आजवर पसरली यांत आश्चर्य नाहीं. कारण नैषधाच्या काव्याच्या आधारानें याची रचना झाली असली, तरी अनेक ठिकाणीं कवीनें स्वतंत्र व बहारीचीं वर्णनें केलीं आहेत. श्लोक अनेक वृत्तात्मक असून, बहुतेक श्लोक हिऱ्याप्रमाणें घोटीव व पैलदार आहेत. यांतील शब्दचित्रें व स्वभावचित्रें अत्यंत रमणीय आहेत. "त्यांतील एक कनकहंस तरी निजेला । जो भागला जलविहार विशेष केला । पोटींच एक पद लांबवुनी उभा तो । पक्षी तनू लपवि भूप तया पहातो ॥ आणीकही पद न वाजत मंद चाले । जों चालतां पदर सावरिला न हाले । हेंही करा निजकरीं खग सांपडेना । तोंही हळुहळुच होय धरी कडेना ॥ गजबजोनि समस्त निघत्या सख्या । गगनमार्गिं उडाल्या तिजसारख्या । पदर सावरितां नृपबालिका । झळकती हृदयीं मणिमालिका ॥" इत्यादि श्लोक याची साक्ष पटवतील. प्रस्तुत काव्यांत कठिण समय येतां कोण कामास येतो, यांतलीं जीं अनेक सुभाषितें आहेत, त्यावरून कवीचें मनुष्यस्वभावाविषयींचें ज्ञान उत्कृष्ट दिसतें. तेजी, फौज, ऐजीन, लगामी, राजी, इत्यादि अनेक फारसी शब्द जे या काव्यांत दिसतात, ते तत्कालीन भाषेला अनुरूप असेच आहेत. काव्यांतील मुख्य दोष म्हणजे काहीं ठिकाणीं रचना क्लिष्ट झाली असून, श्लोकाचा अर्थ नीट लागत नाहीं. असें असलें तरी पदलालित्य, सुंदर उपमा व विविध बहारीचीं वृत्तें यामुळें हें काव्य महाराष्ट्रीयांच्या अत्यंत आवडीचें बनलें आहे. केवळ भक्तिपर किंवा अध्यात्मपर काव्य रचण्याच्या त्या काळांत, कामकलेनें मंडित असें आपलें काव्य रचल्याबद्दल रघुनाथ पंडिताला कोणीहि धन्यवाद देईल. काव्यरचनेचा आनंद वामन पंडितांनीं किंवा पुढील काळांत जसा मोरोपंतांनीं मानला, तसा काहींसा यानेंहि मानलेला त्याच्या काव्यावरून दिसतो.

# १२

## शाहू महाराजांच्या वेळचे कांहीं कवी

श्रीमंत सरकार शाहू महाराज यांचे वेळीं महाराष्ट्रांत जे कवी होऊन गेले त्यांत कचेश्वर,[१] निरञ्जन माधव व सामराज हे प्रमुख होते. कचेश्वरानें सुदामचरित्र व गजेंद्रमोक्ष हीं काव्यें रचिलीं असून त्यांत घरगुती शब्दांची योजना केली आहे. यांचीं काव्यें अत्यंत लोकप्रिय आहेत. निरञ्जन माधव थोरले बाजीराव पेशवे यांचे आश्रयानें राही. पुढें तो बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे यांच्या आश्रयानें राहूं लागला. याला नोकरीनिमित्तानें उत्तरेंत व दक्षिणेंत बराच प्रवास करावा लागला व त्याची छाया त्याच्या काव्यांत जागोजाग उमटली आहे. यानें 'सांप्रदाय परिमळ' नांवाचा ग्रंथ आपल्या पत्नीस गुरुपरंपरेची हकीकत सांगण्याकरितां रचिला. निरंजनाचे दोन गुरु होते. एक लक्ष्मीधर ऊर्फ बापूभट बर्वे व दुसरा बापजी पंडित. निरञ्जनानें कृष्णानंदसिंधु नांवाचा अध्यात्मपर ग्रंथ प्रथम लिहून तो श्रीरंगपट्टण येथें पूर्ण केला. याशिवाय त्यानें चिद्बोध रामायण, रामकर्णामृत, मनरामचरित, निवोंट राघवचरित, ज्ञानेश्वरविजय, वृत्तावतंस, वृत्तमुक्तावलि, अनेक स्तोत्रें व यात्रावर्णनें इत्यादि रचना केली आहे. ज्ञानेश्वरविजय (शके १६८७) हें रसकाव्य असून त्याची रचना चांगली आहे. याचीं प्रवासवर्णनें फारच बहारीचीं आहेत. प्रयागस्थळाची व गंगापुत्राचीं वर्णनें संतापजनक व विनोदी अशीं आहेत. "गंगापुत्र गुमान फार धरिती घाटीं सदा हिंडती। कंगालासि पिडा करुनि धरिती दे दक्षिणा बोलती। थोडी घेति न

---

१ राहणारा चाकणचा, उपनांव ब्रह्मे. भगवद्भक्त. शाहू महाराज यांचे शिष्य बाळाजी विश्वनाथाला यांचेविषयीं प्रेमादर वाटे, मृत्यु शके १६५२ फाल्गुन शु० २ उंब्रज येथें

बोलती खल्मती नानापरी पंडिती। आगासी झटती विवाद करिती हाणोनि घेती विती" हे वर्णन किती हुबेहूब आहे. महाराष्ट्र सारस्वतकार वि. ल. भावे यांनी निरंजनस्वीला 'सवरस' म्हटले आहे; कारण यानें चरित्रपर, वेदांतपर, ईशस्तवनपर, प्रनामपर अशी रचना केली आहे. मात्र काव्यदृष्ट्या ही रचना मध्यमप्रतीची आहे. सामराज (शके १५३०-१६१०) कवीनें निरंजनमाधवा-प्रमाणेंच बहुविध रचना केली. कोकशास्त्रापासून भागवतटीकेपर्यंत निरनिराळे दर्जाचे ग्रंथ यानें लिहिले. यांपैकीं मुद्गलाख्यान व रुक्मिणीहरण हीं काव्यें विशेष सरस व प्रसिद्ध आहेत. रुक्मिणीहरणाचे आठ सर्ग असून श्लोक अकराशेंच्या वर आहेत. यातील वर्णनें विविध प्रकारच्या अर्थालंकारानीं व शब्दालंकारानीं नटलेलीं आहेत. शिवाय रुक्मिणी, श्रीकृष्ण, सुदेव यांचीं स्वभावचित्रे रेखीव अशीच आहेत. या काव्यात आलेलीं निसर्गाचीं वर्णनें केवळ बहारीचीं आहेत. प्रसाद, प्रतिभा, प्रौढार्थ व पदलालित्य या दृष्टीनीं रुक्मिणीहरण हें काव्य बऱ्याच वरच्या दर्जाचें आहे यात शंका नाहीं.

## कृष्णदयार्णव व श्रीधर

काव्यप्रयोजनात मम्मटानें 'शिवेतरक्षतये' म्हणजे 'अशुभनिवारणार्थ' असे एक प्रयोजन दिलें आहे महाराष्ट्रीय कवींत या प्रयोजनाची यथार्थता कृष्णदयार्णवानें[1] सिद्ध केली. याला आनंद संप्रदायातील गोविंद नावाच्या सत्पुरुषाकडून उपदेश मिळाला. याचें मूळचे नाव नरहरि. गोविंद गुरूनें 'कृष्णदयार्णव' हा मंत्र दिल्यानें ते स्वतःला कृष्णदयार्णवच म्हणू लागले. संसारात याच्यावर अनेक आपत्ति आल्या त्यात महारोगहि झाला तेव्हा गोविंद गुरूनीं व इतर संतानीं यास भागवताच्या दशमस्कंधावर प्राकृत टीका लिहिण्यास सांगितलें. त्याप्रमाणें वयाच्या ५४ व्या वर्षी यानीं आपल्या सुप्रसिद्ध 'हरिवरदा' या टीकेस प्रारंभ केला ४९ अध्यायाचा पूर्वार्ध संपायला सात वर्षे लागलीं व

१ जन्म शके १५९६ अक्षय्यतृतीया कोपरडें येथें मृत्यु शके १६६२ मार्गशीर्ष शु पंचमी, पैठण येथें

तोंवर्यंत महारोगहि बरा झाला. त्यानंतर यांनीं उत्तरार्ध सुरू केला. यांचे ३७ अध्याय झाल्यानंतर यांना मृत्यु आला. उरलेला ग्रंथ यांचा शिष्य उत्तमश्लोक यानें शक १६६५ मार्गशीर्ष शु. ७ स पुरा केला. अशा तऱ्हेनें हा ग्रंथ सोळा वर्षांनीं पुरा झाला. हरिवरदा ग्रंथ ओवीबद्ध असून, ओंवी संख्या ४२००० आहे. ओंवी एकनाथी ओवीप्रमाणें साडेचार चरणी आहे. यांत प्रतिभेचा उच्च विलास नसला, तरी जागोजागीं सुरस वर्णनें व प्रसाद गुण भरपूर आहे. वर्णनांत संयमाचा अभाव असला तरी क्लिष्टता कोठेंहि नाहीं.

कृष्णदयार्णवाचा समकालीन असा दुसरा कवि म्हणजे सुप्रसिद्ध श्रीधर[1] हा होय. याच्या कवितेवर गेलीं अडीचशें वर्षें झालीं उभा महाराष्ट्र लुब्ध आहे. नामदेव तुकारामाचे अभंग फार पसरले खरे, पण ते फक्त पुरुषांत. आपली कविता स्त्रियांच्याहि जिव्हाग्रीं नाचविणारा कवि श्रीधरच. याचे ग्रंथ मुख्यतः ओवीबद्ध असून ते पौराणिक संस्कृत व प्राकृत ग्रंथांच्या आधारानें त्यानें रचिले आहेत. परंतु ते रचीत असतांना इतक्या तन्मयतेनें रचिले आहेत कीं, ते स्वतंत्र काव्याप्रमाणेंच वाटतात. याच्या काव्यांत विविध रस असून ते अत्यंत सोपें व मधुर आहे. याचीं विविध प्रसंगांचीं वर्णनें अत्यंत हृदयंगम व नाट्यपूर्ण असीं आहेत. यामुळें आख्यानाप्रमाणेंच याचीहि आख्यानें अत्यंत लोकप्रिय झालीं आहेत. बालक कोणाहि वयाचा व स्थितीचा असो, श्रीधराच्या ग्रंथांत त्याला आपलासा करण्याचें भरपूर सामर्थ्य आहे. याच्या ग्रंथांत हरिविजय (शके १६२४), रामविजय (शके १६२५), वेदान्तसूर्य (शके १६२५), पांडवप्रताप (शके १६३४), शिवलीलामृत (शके १६४०), जैमिनी अश्वमेध (शके १६३७), श्रीपंढरीमाहात्म्य व मल्हारीविजय हे मुख्य होत. हरिविजयांत श्रीकृष्णाच्या लीला वर्णिल्या आहेत तर रामविजयांत रामायण कथा आली आहे. वेदान्तसूर्य हा तीन अध्यायांचा अध्यात्मपर ग्रंथ आहे. पांडवप्रताप म्हणजे एक प्रकारें महाभारतच होय. पांडवांचा प्रताप यांत मुख्यतः वर्णिला असल्यानें ग्रंथाला कवीनें

१ जन्म शके १६०० मृत्यु शके १६५१ माघ वद्य २ पंढरपूर येथें

पांडवप्रताप म्हटलें आहे. शिवलीलामृतात शिवभक्तीचें वर्णन आलें आहे. श्रीधराची गुरुपरंपरा रामानंद–अमलानंद–सहजानंद–पूर्णानंद–दत्तानंद–ब्रह्मानंद–श्रीधर अशी आहे. आनंद संप्रदायातील मंडळींनी अलोट ग्रंथरचना केली आहे. श्रीधराचे वडील व गुरु ब्रह्मानंद यांनीं 'आत्मप्रकाश' नावाचा ग्रंथ शके १६०३ मध्यें लिहून पूर्ण केला. श्रीधराचा पुत्र दत्तात्रय व कुटुंबातील इतर मंडळीहि काव्यरचना करीत.

आनंद संप्रदायाप्रमाणेंच या काळात रामदासी संप्रदायातील मंडळीहि ग्रंथरचना करीत. मागें यांचा उल्लेख आलाच आहे. श्रीधराच्या समकालीन अशा रामदास सांप्रदायी गिरिधर[1] स्वामी (जन्म शके १५७५) यांची बरीच ग्रंथरचना आहे. यांची गुरुपरंपरा रामदास–वेणाबाई–बाइजाबाई–गिरिधर अशी आहे. यानें 'समर्थप्रताप' ग्रंथात समर्थांचें चरित्र वर्णिलें आहे. या शिवाय यानें अद्भुतरामायण, मंगलरामायण, छंदोरामायण, ग्रंथभावार्थ, ग्रंथान्वय, ग्रंथराज भावार्थ, सुंदररामायण, संकेतरामायण व करुणारामायण, देवदर्शन, स्वामीदर्शन इत्यादि ग्रंथ लिहिले आहेत. ही सर्व रचना सोपी व प्रेमळपणानें भरलेली आहे. गिरिधराचा एक भाऊ भीम यांचा शिष्य नरहरि मोरेश्वर नावाचा होऊन गेला. यानें महाभारताच्या उद्योग (श. १६८१) भीष्म, द्रोण व कर्ण (शके १६९०) या पर्वांवर टीका रचिली आहे. त्याची भाषा चांगली असून रचनेचा नोकझोकहि चांगला आहे. श्रीधराच्या भाषेइतकी यांची भाषा सोपी नसली, तरी तींत प्रसाद गुण भरपूर आहे.

---

१ समाधि शके १६५२ वैशाख शु ८ चांद येथे

# १३

## स्वतंत्र काव्याची सुरुवात

मुकुंदराजापासून ते श्रीधरापर्यंतची मराठी कविता ही अध्यात्मपर व पौराणिक आख्यानांना विशेष वाहिलेली होती. या कवितेला भगवद्गीता, महाभारत, भागवत, रामायण, उपनिषदें इत्यादिकांचा आधार असल्यानें ती बहुधा रूपांतरात्मकच होती. अमृतानुभवासारखीं काहीं काव्यें स्वतंत्र असलीं तरी तीं वेदांतविषयक होतीं. स्वतंत्र कवितेत कथानक प्रधानस्थान फारसें कोणी पाहिलें नव्हतें. पेशव्यांच्या काळांत वाढत्या ऐश्वर्याबरोबर व स्वास्थ्याबरोबर कवींचें लक्ष या गोष्टीकडे जाऊन, त्यावेळीं काहींनीं स्वतंत्रपणें काव्यनिर्मितीला सुरुवात केली. जगन्नाथ ( शके १६६९ ) कवीचें शशिसेना काव्य हें अगदीं स्वतंत्र आहे. सुमारे सहाशें पद्यांचें हें काव्य असून त्यांत प्रधानपुत्र अहिमाणिक व राजकन्या शशिसेना यांच्या परस्परप्रेमाचें व त्या प्रेमाच्या आड येणाऱ्या अनेक संकटांचें वर्णन आलें आहे ' तूं प्राण माझा सगुणे तुझा मीं। तूं चंद्रमा कौमुदिनी तुझी मी। भुंगा तूं मी वनपुष्पवल्ली। जशी सुरंगी ममयुक्त व्याली " अशा प्रकारच्या साध्या व सोप्या भाषेनें मंडित झालेलें हें काव्य बऱ्यापैकीं आहे. जगन्नाथानें याशिवाय पौराणिक आख्यानांवर व वेदांतविषयावर बरीच रचना केली बोधवैभव, ज्ञानबत्तिशी, वाक्सुधा, भगवद्गीता टीका इत्यादि रचना अशापैकीं होय.

जगन्नाथाप्रमाणेंच जीवन नावाच्या दुसऱ्या कवीनें 'अनुभवलहरी' नावाचें काव्य रचिलें आहे. एका बकाल गृहस्थाला त्याच्या कुटुंबांतील माणसांनीं व पत्नीनें पांगउतारा केल्यावर आयुष्यांत जे निरनिराळे अनुभव आले, सैन्यात दाखल झाल्यावर जे विविध अनुभव आले, त्यांचें वर्णन 'अनुभवलहरींत'

कटाव करण्याची चाल पूर्वी नव्हती. अमृतरायानीं ती हिंदीच्या अनुकरणानें सुरू केली. अमृतरायानीं स्फुट श्लोक, पदें, कटाव जसे पुष्कळ लिहिले, तसे पौराणिक आख्यानपर असे दामाजीपंत, कृष्णलीला, द्रौपदीवस्त्रहरण, रामजन्म, लंकावर्णन, सुदामचरित्र, वत्सलाहरण इत्यादि काव्येंहि पुष्कळ रचिलीं. त्यांच्या कटावाचा थोडासा नमुना पुढें दिला आहे :—"मदनदहन अति अस्वस्थ होउनि, धवल मतिनें जवळ जाउनी, गृहात आमुच्या नसे कामिनी, चैन पडेना दिवसयामिनी, अभिहीन मज असरस घेणें, अनुभवोनिया पुनरपि देणें, अभिलाषाची वृत्ति नेणें, रमाकांत एकांत पाहुनी, धाता तुमच्या समीची न धरीं, कमीचि नसता शुद्धबुद्ध तो मुनिवर (नारद) वदला, 'विषमशर कंदर्प क्षोभला,' भ्रमला लागुनि अबला मागे, कमलापतिचे करकमलानें कमलोद्भवसुत धरि करकमला कमलनभ तो प्रसन्न वदला..."

अमृतरायाच्या कटावाचा रंग पाहून शंकर, माधव, ब्रह्मगिरी, विनायक या त्यांच्या शिष्यांनीं व चाहत्यांनीं कटावरचना पुष्कळ केली. या एका गोष्टीवरून अमृतरायाची लोकप्रियता किती होती ही ठळक प्रकारें दिसते.

# १४

## संत चरित्रकार

संतांचीं चरित्रें लिहिण्याचा प्रघात महाराष्ट्रांत फार पूर्वीपासून म्हणजे म्हाइंभट्ट, सच्चिदानंदबाबा नामदेव इत्यादिकांपासून असला, तथापि तीं चरित्रें एकट्या दुकट्या संतांचीं आहेत. म्हाइंभटानें लीळाचरित्र (चक्रधर चरित्र, शक १२०० चा सुमार) व गोविंदप्रभु चरित्र (ऋद्धिपूर चरित्र, शके १२१० चा सुमार) लिहिलीं सच्चिदानंदबाबानीं ज्ञानेश्वरांचें चरित्र लिहिलें आहे. "तीर्थावळीचे अभंग" यांत नामदेवानीं ज्ञानेश्वर व त्यांचीं भावंडें यांचीं चरित्रें गाइलीं आहेत. निरंजन माधवानें आपल्या 'ज्ञानेश्वरविजयांत' (शके १६८७) ज्ञानोबांचें चरित्र विस्तारानें वर्णिलें आहे परंतु एकाच ग्रंथांत अनेक संतांचीं चरित्रें एकत्रित करण्याची स्फूर्ति महाराष्ट्रीय कवींना ग्वाल्हेरकडील नाभाजीच्या हिंदी 'भक्तमाला' या काव्यापासून झाली. नाभाजीच्या (शके १६०० चा सुमार) भक्तमालेंत १९७ छप्पे असून, त्यांत ज्ञानेश्वर नामदेव या महाराष्ट्रीय व इतर अनेक महाराष्ट्रेतर संतांचीं गोरक चरित्रें आलीं आहेत. नाभाजीचा शिष्य प्रियादास (शके १६३७) यानें भक्तिरसबोधिनी नांवाचा हिंदींत संतचरित्रपर ग्रंथ लिहिला आहे. या दोन्ही ग्रंथांमुळें उद्धवचिद्घन, दासोदिगंबर, महिपतिबुवा इत्यादिकांना मराठींत संतचरित्रें लिहिण्याची प्रेरणा झाली. उद्धवचिद्घन (सुप्रसिद्ध सूर्यवंशी उत्तानपाद राजा। रूपवंती तयास दोन जाया या ओळींनी सुरू होणाऱ्या ध्रुवाख्यानाचा कर्ता याचा काल शके १६११ नंतरचा मानतात.) याचें 'भक्तकथामृतसार' अप्रसिद्ध व अनुपलब्ध असलें, तथापि त्यानें लिहि

पुष्कळ संतांचा उल्लेख आहे दासो दिगंबर ( शके १४७३ ते १५३७ ) याचा संतविजय नावाचा ग्रंथ उपलब्ध असून, त्यात ३४ प्रकरणांत अनेक संतांची माहिती देण्यात आली आहे यानें आपल्या ग्रंथात नाभाजीचा उल्लेख केला आहे दासो दिगंबराच्या ग्रंथात चोखपणाचा अभाव आहे महिपति बोवा[1] ताहराबादकरांनीं अनेक संतचरित्रें लिहून संतचरित्रकार म्हणून उत्तम नावलौकिक मिळविला तुकोबांनीं स्वप्नात येऊन याना संतचरित्रें लिहिण्याची आज्ञा केली व त्याप्रमाणें बोवांनीं हें कार्य तडीस नेलें प्रथम त्यांनीं भक्तविजय ( शके १६८४ ) हा ग्रंथ रचिला नाभाजी व उद्धवचिद्घनाचें ऋण ग्रंथारंभीं महिपतींनें कबूल केलें आहे. तथापि अनेक संतचरित्रें स्वतंत्रपणें व विस्तारानें त्यांनीं भक्तविजयात दिलीं आहेत ज्ञानेश्वर, नामदेव, दामाजी, भानुदास, तुकाराम इत्यादिकींची चरित्रें स्वतंत्र आहेत इतर भक्तमालेवरून घेतलीं आहेत 'कथासारामृत' ( १६८७ ) या ग्रंथात कार्तिक, माघ, वैशाख व एकादशी अशीं मुख्य चार विष्णूचीं व्रतें वर्णिलीं आहेत यात पुष्कळ पौराणिक कथा आल्या आहेत पांडुरंगमाहात्म्य ( शके १६८८ ) या ग्रंथात शंकरपार्वतीच्या संवादरूपानें पुंडलिकाचें चरित्र मुख्यत वर्णन करण्यात आलें आहे संतलीलामृत ( शके १६८९ ) या ग्रंथात चांगदेव, रोहिदास, गोपीचंद एकनाथ, तुकाराम हीं मुख्य चरित्रें व इतर संतांचीं अनेक चरित्रें आलीं आहेत भाषेच्या दृष्टीनें एकनाथ–तुकारामाचीं चरित्रें सुरस व चित्तवेधक बनलीं आहेत यानंतर बोवांनीं भक्तलीलामृत ( शके १६९६ ) ग्रंथ लिहून त्यात आणखी कांहीं संतांचीं चरित्रें दिलीं. या ग्रंथानंतर 'संतविजय' नावाचा ग्रंथ लिहायला सुरवात करून त्यात रामदास स्वामींचें व बावाजी गोसाव्याचें अशीं दोन चरित्रें त्यांनीं लिहिलीं हा

१ जन्म शके १६३७ ताहराबाद येथ, मृत्यु शके १७१२ श्रावण वद्य १२, ताहराबाद येथें ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण उपनाव कांबळे वडिलांचें नांव दादोपंत व आईचें गंगाबाई शिपाई अपशब्द बोलल्यानें यांनीं सरकारी नोकरी सोडून दिली दुष्काळात आपलें घर यांनीं लुटविलें दर तीन वर्षांनीं हे आपलें घर लुटवीत असत संतकार्याविषयीं याचा अभिप्राय उदास असोनि वैष्णववीर, जे का फिरती देशावर कराया जनाचा उद्धार आज्ञा साचार हरीची ' असा आहे

ग्रंथ अपूर्ण आहे. याशिवाय लहान लहान स्तोत्रें नोवानीं पुष्कळ रचिलीं आहेत. त्यापैकीं 'पांडुरंग स्तोत्र' काव्यदृष्ट्या सुरस आहे. महिपतिबोवांचे चरित्रग्रंथ चिकित्सक बुद्धीनें लिहिले नसले तरी त्यांत माहिती व जिव्हाळा हीं भरपूर आहेत. हे ग्रंथ ओवीवृत्तांत असून दृष्टांत देण्याची यांची पद्धति ज्ञानेश्वरी सारखी आहे.

आणखी कांहीं संतचरित्रकार झाले. एक भीमस्वामी व दुसरे राजाराम प्रासादी (शके १७५६ चा सुमार) भीमस्वामी हे रामदासीपरंपरेंतील असून शिरगांव मठाचे अधिपति होते. यांनीं भक्तलीलामृत (शके १७२०) नांवाचा अभंगमय ग्रंथ लिहून त्यांत प्रथम श्रीसमर्थांचें चरित्र देऊन पुढें निरनिराळीं सदतीस भक्तांचीं चरित्रें सांगितलीं आहेत. मात्र ग्रंथ यथातथाच आहे. राजाराम प्रासादी हेहि रामदासी संप्रदायांतील होते. त्यांनीं आपल्या 'भक्तमंजरी' तील १०९ अध्यायांत सुरुवातीला रामदासांचें चरित्र देऊन पुढें सुमारे सव्वाशें साधूंचीं चरित्रें दिलीं आहेत. राजाराम प्रासादींनीं आपल्या ग्रंथांत माहिती पुष्कळ प्रयासानीं मिळवून दिली आहे. उपलब्ध असलेल्या संतचरित्रांत भक्तमंजरी हा ग्रंथ बऱ्या दर्जाचा आहे. उद्धवसुत नांवाच्या समर्थशिष्याचें रामदासचरित्र (श. १६९६) ५१ अध्यायांचें आहे. "श्रीदासविश्रामधाम" या प्रचंड चरित्राचा कर्ता आत्मारामहाराज येहेळेगांवकर हा असून चरित्राची ओवीसंख्या सोळा हजारावर आहे. यांत रामदासांबरोबर शेंकडो ज्ञात व अज्ञात पुरुषांचीं पदेंहि दिलीं असून तीं चरित्राचा भाग म्हणून समजण्यांत आलीं आहेत! नरहरि धुंडिराज मालु यानें 'मारुतारण' व 'भक्तिकथामृत' नांवाचे दोन मराठी संत चरित्रपर ग्रंथ लिहिले आहेत. यांत मनमानेल त्याप्रमाणें संतांविषयीं सविस्तर पण चुकीची माहिती देण्यांत आली आहे. मेरुस्वामीकृत 'रामसोहळा' या ग्रंथांत समर्थांचें चरित्र व दासबोधांतील विषयांचें विवेचन आलें आहे. गिरधरस्वामीकृत 'समर्थप्रताप' या ग्रंथांत समर्थांचें चरित्र आलें असून तें सरस आहे. यांनीं समाधि शके १६५१ मध्यें घेतली.

# १५

## मोरोपंत

पेशवाईतील रणधुमाळीच्या, साम्राज्य विस्ताराच्या, युद्धजन्य यशापयशाच्या परंतु एकंदरीत मराठ्यांच्या कर्तबगारीच्या व कीर्तिकर अशा काळात मोरोपंत[1] होऊन गेले. तो वीरांचा काळ होता. भीमथडी तट्टांवर बसून मराठे सारा हिंदुस्थान पादाक्रांत करीत होते. यवन त्यांना वचकून होते. सारा महाराष्ट्र शौर्याच्या आणि वीर्याच्या कथा गात होता. शाहीर पोवाडे आणि लावण्या रचून मराठ्यांच्या पराक्रमाला आणि प्रेमाला अमररूप देत होते. अशा वेळीं आपली पूर्वपरंपरा देखील शौर्याची आणि धैर्याची आहे हें दाखविण्याचें व लोकांना प्रेरणा देण्याचें कार्य मोरोपंतांनीं रामायण भारतादि काव्यें मराठींत रचून केलें. याच करितां निळोबा अण्णा कऱ्हाडकर दप्तरदार (शक १७३५ १७९७) यांनीं मोरोपंतांना वीरकवि म्हणून संबोधिलें आहे. ते म्हणतात 'आर्याछंदें जोडुनि रामायणभारतादि आयकवी। नायक वीरकवींचा ऐसा होईल अन्य काय कवी ? ॥"

मोरोपंत हे कलाभिज्ञ कवि, प्रभावशाली पुराणीक आणि खरेखुरे भगवद्भक्त असल्यानें या तिन्ही वृत्तींना साजेसें त्यांनीं विविध, विपुल व विदग्ध काव्य

---

१ मोरोपंत यांचा जन्म पन्हाळगडावर शके १६५१ मध्यें झाला. त्यांच्या पित्याचें नाव रामाजीपंत व आईचें लक्ष्मी. त्यांचें आडनांव पराडकर. मोरोपंतांच्या पूर्वजांचें गांव सौंदळ, विद्याभ्यासाचें गांव पन्हाळगड, कर्तृत्वाचें गांव बारामती व त्यांच्या वंशजांचें गांव पंढरपूर. पंतांचे गुरु केशव पाध्ये. त्यांचे आश्रयदाते बाबूजी नाईक जोशी बारामतीकर. इ. स. १७८९ मध्यें त्यांनी अमरसिंह जाधवांबरोबर काशीयात्रा केली. पंतांचा मृत्यु चैत्र शुद्ध पौर्णिमा शके १७१६ ला बारामती येथें झाला.

निर्माण करील उत्तम चित्रकाराला चित्रविषयाइतकेंच रंग, कुंचला, कॅनव्हस या साधनांचें महत्त्व वाटतें. नव्हे या जिन्नसांवर त्याचें प्रेम असतें व तो त्यांचा अत्यंत जागतेपणानें स्थलकाल पाहून उपयोग करतो. मोरोपंतांचें असेंच होतें. ते अव्वल दर्जाचे शब्दप्रभु होते. शब्दाचें सौंदर्य, सामर्थ्य, गतिमानता हीं त्यांना पुरेपुरी अवगत होतीं. प्रसंग पाहून ते संस्कृतप्रचुर, प्रौढ किंवा सुबोध-साधी रचना करीत. त्यांचें सुप्रसिद्ध सीतागीत किंवा कर्णपर्वांतील 'पूर्वी सागरतीरीं माधुनृपाच्या पुरांत एक धन' अशा प्रासादिक वाणीनें सुरू होणारें हंसकाकीय आख्यान हीं सुबोध सोप्या भाषेचीं उदाहरणें म्हणून सहज दाखवितां येतील. अनेक प्रकारचे शब्दालंकार, अर्थालंकार व विविध रस मोरोपंतांनीं आपल्या काव्यांत योजिले ते काव्यविस्ताराचा मगदूर पाहून. आपण कलापूर्ण काव्य करतों आहोंत याची जाणीव त्यांना सतत होती असें त्यांच्या काव्यसंभारकडे पाहिलें असतांना वाटतें. बाबूजी नाईक व श्री रामचंद्रकर या सरदारांकडे पुराणीक या नात्यानें मोरोपंत सुमारे चाळीस वर्षे होते. निरनिराळीं पौराणिक आख्यानें व महाकाव्यें त्यांनीं कां रचिलीं याचें कारण त्यांचा हा पुराणिकाचा पेशा. आणि हा पेशा देखील त्यांनीं आनंदानें कां पत्करला तर ते खरेखुरे भगवद्भक्त होते म्हणून. एकीकडे उदरनिर्वाहाचें साधन लाभून, त्या साधनाच्या द्वारेंच ईश्वराची सेवा करायला लाभल्यानें मोरोपंतांना कृतार्थ धन्यता वाटत असली पाहिजे. ते अल्पसंतोषी होते. त्यांच्या काव्यावर खूष होऊन दुसऱ्या बाजीरावसाहेबांनीं त्यांना आपल्या आश्रयाला बोलाविलें असतांना, बारामतीकर जोशाचा आश्रय सोडून ते गेले नाहींत. ईश्वराच्या अनेक कथा अनेक तऱ्हांनीं गाऊन (परंतु रामायण, मंत्ररामायण, निरोष्ठ रामायण इत्यादि अष्टोत्तरशत रामायणें) त्यांनीं त्याची सेवा केली. काव्यरचना करीत असतांना आत्मोद्धाराची भावना पंतांच्या ठिकाणीं सतत जागृत असे. आर्याभारताच्या सुरुवातीलाच त्यांनीं आपला हेतु स्पष्ट केला आहे तो असा – "हरि ज्याचा कैवारी त्या पांडुसुतासि वंदितां मानें। वाटे चरित्र त्याचें कांहीं आपण तरावया गावें॥" कलाविलास, व्यवहारोपयोगी उपदेश व भक्तिभाव असे तीन प्रवाह पंतांच्या काव्यसरितेंत सारख्याच जोमानें वाहात असल्यानें त्याला

प्रयागराज तीर्थातील त्रिवेणीसंगमाप्रमाणें मन्त्र आले आहे. अनेक प्रकारचीं रामायणें, अनेकविध यमक, अनेक दर्जाचे प्रास, कथानील सक्षेप विस्तार, विविध रस आणि वैशिष्ट्यपूर्ण स्वभावचित्रें ही कल्पितेमाच्या संगरात पडलीत. रामायण, महाभारत, हरिवंश, कृष्णविजय, मंत्रभागवत, ब्रह्मोत्तरखंड, कुशलवाख्यान इत्यादि काव्यें पंतानीं मनोरंजन व लोकशिक्षण हे हेतु मुख्य धरून लिहिलीं. यांतहि अप्रत्यक्षपणें ईश्वराची सेवा करण्याचा त्यांचा हेतु होताच. परंतु केवळ भक्त भावानें परमेश्वराची आळवणी करण्याकरितांहि कांहीं काव्य त्यांनीं रचिलें. हें काव्य ते देहावसानापर्यंत लिहीत होते. अशा काव्यांत रत्नमणिमालादि काव्यांमारख्या संतांच्या चरित्रें, देवतांचीं स्तोत्रें, सहस्रनाममाला, स्तोत्र केकावली वगैरे काव्य येतात. ईश्वरविषयक तळमळ, साधुसंतविषयीं आदर, आत्मोद्धाराची तळमळ, श्रद्धा, सगुणाबद्दल प्रेम इत्यादि भक्तीचीं विविध रूपें या काव्यांत असून तें जिव्हाळ्यानें आणि भक्तिमत्त्वानें भरलेलें आहे.

मोरोपंतांची कविता समुद्राप्रमाणें विशाल व बहुरत्ना असून तिच्यापैकीं सुमारें साठ हजार कविता प्रसिद्धपणें आज उपलब्ध आहे. या कवितेवर तिच्या रचना कालापासून रसिकांच्या उड्या पडत आहेत. रामजोशी, विठोबा अण्णा, चिंतामणि जोशी, धुंडिराज, राजाराम प्रासादी, परशुरामपंत तात्या गोडबोले, नारोबा पांडुरंग विष्णुशास्त्री चिपळूणकर, वामनराव आठ, बाळकृष्ण मल्हार हंस, श्रीधर विष्णु परांजपे, लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, इत्यादि कवींनीं आणि रसिक सहृदयांनीं पंतांच्या कवितेवरून स्वतःचा देह ओवाळून टाकला आहे. असे असलें तरी पंतकाव्याचे कांहीं विरोधी टीकाकार असून ते चांगले वजनदार आहेत. न्यायमूर्ति माधवराव रानडे यांच्या दृष्टीनें पंतांचें काव्य कृत्रिम आहे. डा. व्हिल्सन यांच्या मतें मोरोपंतांनीं कृत्रिम काव्यें रचून आपल्या बुद्धीचा अपव्यय केला. विष्णुशास्त्र्यांच्या वडील कृष्णशास्त्री चिपळूणकर मोरोपंतांना मापांच्या म्हणत. राजा शिवाजी नाट्यकर्ते कुंटे यांच्या दृष्टीनें पंतांच्या ठिकाणीं प्रसाद, कवित्व, कल्पनाचातुर्य वगैरे कांहीं नसून पंत म्हणजे यमक जुळविणारा अरसिक मनुष्य होते ! कृत्रिमपणाचा आरोप हा इतका लज्जास्पद आहे कीं त्यामुळें प्राय

कोणत्याच कवीची कविता सुटू शकणार नाहीं. गद्यापेक्षा पद्यात काहीं 'कृत्रिम' भाग असणारच. मोरोपंताच्या काव्यातील यमक, अनुप्रास, श्लेष इत्यादि शब्दालंकारावरून हा आरोप केला गेला असला तरी त्यात फारसा अर्थ नाहीं. याचें कारण यमक अनुप्रासादिकामुळें पंताच्या काव्याचें सौंदर्य वाढलें' असून तीं साधायला त्यांना कष्ट पडत नसत. अत्यंत सफाईनें सयमक व सानुप्रास कविता ते करीत किंबहुना त्यांच्या काळीं समयक व सानुप्रास कविता करणें हें मुळींच अवघड किंवा कृत्रिम समजलें जात नसे. शाहिरी काव्याकडे पाहिलें असताना या म्हणण्याचा प्रत्यय सहज येईल. मोरोपंत हे केवळ 'भाषांतरे' होते या म्हणण्यातहि काहीं अर्थ नाहीं एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंतची सर्व मराठी कविता ही बहुशीं रामायण, महाभारत, भागवत, विविध पुराणें यावर आधारलेली असल्यानें एका दृष्टीनें तीं सर्वच भाषांतररूप ठरेल. परंतु तसें वस्तुतः नाहीं. कवींनीं आपले विषय पुराणातून घेतले असले तरी त्यांची मांडणी स्वतंत्रपणें केली आहे. मोरोपंताच्या बाबतींत तर हें विशेषत्वानें खरें आहे. रामायण, महाभारत, भागवतादि ग्रंथावरून त्यांनीं आपल्या काव्याची रचना केली असली, तरी ती करीत असताना स्वतंत्र बुद्धिच सर्वत्र चालविली आहे. त्यांनी केलेले संक्षेप विस्तार पाहिले असताना ही गोष्ट पटते आर्याभारत रचीत असताना त्यांचा भर पांडवाच्या चरित्रावर होता. याच कारणानें आदिपर्वांत दुःशला जन्म, दुःशला विवाह, कल्माषपादकथा, उतंककथा वगैरे त्यांनीं गाळल्या आहेत. मूळची कणिकनीति त्यांनीं फारच थोडक्यात सांगितली आहे. "विस्तरभयास्तव कणिकनीत्यंतर्गत कथांचि असि काहीं लिहिली" (अ. २८ गीति २६) असे स्वतः पंतच सांगतात. कर्णपर्वांत त्रिपुराचा इतिहास त्यांनीं गाळला आहे. आणि तसें करीत असताना असें म्हटलें आहे कीं, "गाया, श्रवण कराया, योग्य, परिमितविस्तराकरिता। इतिहास गाळला हा; झाला श्रम मलाहि चित्त आवरिता॥" कर्णपर्वांतील मूळच्या ४९ अध्यायाचा म्हणजे २११७ श्लोकाचा सारांश त्यांनीं ३० अध्यायात किंवा १२३२ गीतींत सांगितला आहे. स्त्रीपर्वांत असाच संक्षेप विस्तार केला आहे. पहिल्या अध्यायातील धृतराष्ट्राचा

श्लोक पंतांनीं अजिबात गाळला आहे. विदुरकृत धृतराष्ट्रसान्त्वनाच्या मूळच्या ११६ श्लोकांऐवजी पंतांनीं चारच गीती योजिल्या आहेत! याच्या उलट दुसऱ्या अध्यायांतील कुरुस्त्रियांनीं धर्मराजास उद्देशून केलेलें उपालंभयुक्त भाषण पंतांनीं अधिक विस्तारानें दिलें आहे. राधेनें कर्णाबद्दल केलेला विलाप केवळ पंत प्रतिभेचाच विलास होय. उत्तराविलाप, कर्णाबद्दल कुंति व धर्म यांचा विलाप, हे दोन विलाप व्यासभारतांत बहुतांशीं सोडूनच आहेत. 'पांडुसुताच्या' कथा 'स्वच्छावृत्ति' आणीत असतांना व्यासकृत महाभारत पंत आपल्या जवळपास ठेवीत यांत शंका नाहीं. कारण अनेक श्लोकांत व गीतींत शब्दांचें साम्य आढळतें. ( मनोरथपथाहीं देहावाचुन येणगा गेला । अश्वांनीं दूर द्विज, अर्जुन संसप्तकाकडे गेला ॥ या मोरोपंती गीतींत व व्यासाच्या पुढील श्लोकांत साम्य आहे. प्रतीरकामे तु रथाश्वयाग्नि हुते हये । मन्त्रौषधिक्रियायोगैर्यांथी देहाद्विनाहृते ) असें असले तरी अनेक ठिकाणीं मूळापेक्षा कितीतरी पट अधिक चांगली रचनाहि त्यांनीं केली आहे. कर्णपर्वांतीलच पुढील दोन श्लोकांवर पंतांनीं किती रमणीय उत्प्रेक्षा केल्या आहेत त्या बघा : पश्य पार्थ यथा सेना धार्तराष्ट्रीह संयुगे । कर्णेन विहिता वीर गुप्ता वीरैर्महारथैः ॥ हतवीरतमा ह्येषा धार्तराष्ट्री महाचमूः । फल्गुशेषा महाबाहो तृणैस्तुल्या मतामम ॥ मकरव्यूह विलोकुनि 'पहा' म्हणे धर्म सव्यसाचीसी । कर्णें केली रचना दिसते, ध्यायासि भव्य, साचीसी ॥ हतवरुनि लाजे कुधर गुरुविरहाकुळा, कृपा निपट अरिसेना कांहीं न धूलिस्थलमिव मुत्सारुनि पट ॥ पंत हे केवळ भाषांतरकार होते, त्यांच्या ठिकाणीं रसिकता नव्हती, वगैरे विधानें किती बेजबाबदारपणाचीं आहेत हें आतां कळेल. आर्याभारतांत संस्कृत साहित्यशास्त्रांत आढळणारे निरनिराळे अलंकार व रस यांची मेजवानीच वाचकांना अर्पण करण्यांत आली आहे. आणि मौज ही कीं, यापैकीं बहुतेक सर्व ठिकाणच्या कल्पना स्वतः मोरोपंतांच्याच आहेत. रणांगणावर होणाऱ्या प्रचंड ध्वनींची कल्पना होण्याकरितां ध्वनिद्योतक वर्णांची पंतांनीं योजना कशी केली आहे ती पाहा.--आनकदुंदुभि दर्दुरडिंडिमभेरी मुरजपणवाचे । ध्वनि उठले यच्छ्रवणें न श्रम ही त्या स्थळीं कृपण वाचे ॥

तसेच रागाची शीघ्रगति दर्शविण्याकरिता त्यांनीं अनुप्रासाची कशी मदत घेतली आहे ती बघा.—अरिगिरिदारदारतृटिहि, तें भेदुनि शरहि धरि क्रीडा आर्याभारतात तसेच इतर ठिकाणींहि पंतानीं उत्तम प्रकारें रसपरिपोष केला आहे कर्ण व द्रोणपर्वातील वीररस आणि स्त्रीपर्वातील करुण रस फारच बहारीचा आहे याच्याच जोडीला स्वभावचित्राचा विचार करायला हवा. वैशिष्ट्यपूर्ण, ठसठशीत, मनोवेधक अशा स्वभावचित्रानीं मोरोपंती कविता खचून भरली आहे. कर्ण, धृतराष्ट्र, कुंति, कृष्ण, द्रोणाचार्य, सीता, द्रौपदी, सुभद्रा, अर्जुन इत्यादि शेंकडो स्त्रीपुरुषांचीं मनोज्ञ शब्दचित्रें पंतानीं आपल्या काव्यात रेखाटलीं आहेत याच्या जोडीला संशयरत्नमाला आणि केकावली सारखीं भावोत्कट आणि स्वतंत्र काव्यें आपण ठेविलीं आणि मोरोपंती कवितेचा साकल्यानें विचार करू लागलों तर ती कृत्रिम व भाषांतरित न वाटता उलट तीं स्वतंत्र घडणीची कल्पपूर्ण व अभिजात अशीच वाटेल संशयरत्नमाला आणि केकावली या काव्यात पंतानीं ईश्वराला परोपरीनें, लडिवाळपणानें, कृतककोपानें पण सर्वत्र प्रौढ अशा भक्तिभावानें आळविलें आहे. उत्तम काव्यात ध्वनिसौंदर्य असतें केकावलींत अशा कित्येक केका आहेत कीं, ज्या ध्वनिसौंदर्यानें नटल्या झाल्या आहेत "दिलें बहु बरें खरें, परि गमे कृपा घ्यन ती। अलङ्कृतिमती सती मनिं झुरे, न जो संगति ॥"—सारख्या केकेतील ध्वन्यर्थ किती बहारीचा आहे तो बघा

मोरोपंती भाषा व काव्यविषय यांच्या संबधानें येथें थोडासा विचार करू या. मोरोपंती स्त्रीगीतें व हलक्याफुलक्या आख्यानासारखीं काहीं आख्यानें पाहिलीं असताना पंत किती सोपी व रसाळ कविता लिहू शकत याचा उत्तम प्रत्यय येतो "ऐशी नाई माझी ऐकवाची वाणी। डोळा आल पाणी भावोजीच्या।" —अशा सारखी बालबोध व घरगुती भाषा लिहिणाऱ्या पंतानीं आर्याभारत, रामायण, कृष्णविजय, हरिवंश, केकावली सारख्या काव्यात आढळणारी संस्कृतप्रचुर रचना केलेली पाहून पुष्कळांना आश्चर्य वाटतें परतु हीं कार्ये बहुजनाकरिता

नसून तत्कालीन संस्कृतज्ञ रसिकांकरिता होती हें ध्यानांत धरल्यावर त्यांना आश्चर्य वाटणार नाहीं. शिक्षणाचा प्रसार आज जर अवघा दहा टक्के आहे, तर पंतांच्या कालीं शिकलेल्यांची संख्या काहीं हजारांपेक्षा क्वचित् ज्यास्त नसेल. हे सर्व लोक त्यावेळच्या पद्धतिप्रमाणें संस्कृत शिकत. अशा लोकांच्या पसंतीला उतरेल अशा प्रकारची प्रौढ रचना पंतांनीं मुद्दामच केली आहे. कवितेचा अर्थ लावण्यांत थोडे श्रम पडावेत व नंतर तिची गंमत कळावी असें या संस्कृतज्ञ रसिकांना वाटे. तत्कालीन पुराणीक आणि कीर्तनकार पंतांच्या आर्या लावून दाखविण्यांत धन्यता मानीत, आणि श्रोतेहि मग त्यांचा मिटक्या मारीत आस्वाद घेत. माझा मऱ्हाटाचि बोल कवतुकें परि अमृतातेंही पैजा जिंके अशी प्रतिज्ञा ज्ञानेश्वरांची होती. मोरोपंतांची प्रतिज्ञा अशी असावी—माझा मऱ्हाटाचि बोल कौतुकें। परि संस्कृतातेंहि पैजा जिंके. आणि खरोखरच मोरोपंतांनी ही पैज जिंकली काशीक्षेत्रांत ते आपली कविता घेऊन गेले व तत्रस्थ संस्कृत पंडितांना त्यांनीं ती दाखविली. पंडितांनी पंतांच्या कवितेची शलाकापरीक्षा करून ती अत्युत्तम असल्याचा अभिप्राय दिला. पंतांनीं आपल्या काव्यांत विविध यमकें, अनुप्रास, श्लेष हे मुद्दामच असल्या पंडित रसिकांना ते आवडत असत म्हणून वापरले आहेत. आज आपणाला पंतांच्या काव्यांत अपरिचित संस्कृत शब्द, दीर्घ समास, दुरान्वयादि दोष जे व जितक्या प्रमाणांत आढळतात, ते व तितक्या प्रमाणांत त्यांच्या काळच्या पंडित वाचकांना वाटत नसावेत मुक्तछंदाच्या सध्याच्या जमान्यांत मोरोपंती यमकें नेयळ कृत्रिम ठरलीं, तरी तीं मोरोपंतांच्या काळांत स्वागतार्हच होतीं. "अनलसमीहित सार्थी राया! सार महीवरा! कामा। अनलस मी हि तसा धीरा! यावा रामही वरा मा!॥" अशा एखाद दुसऱ्या मुद्दामच काव्यरत्नकौतुक म्हणून केलेल्या गीतींतील यमकें सोडल्यास मोरोपंती यमकें सोपीं, अर्थपोषक व चमत्कृतिजनक असतात यांत शंका नाहीं. यमकें अनुप्रास, श्लेष इत्यादि बंधनें सांभाळूनहि पंतांनीं आपल्या भाषेचें स्वरूप सर्वत्र शुद्ध ठेवलेलें पाहून त्यांच्याविषयीं आदर वाटतो. "मराठीला व्याकरणसंस्कारानें पावन करून संस्कृतच्या पदवीला चढविण्याची पंतांना आवड होती असें उघड

दिसतें," असें जें पांगारकरांनी[1] म्हटलें आहे तें अक्षरशः खरें आहे. असें असूनहि घरगुती दृष्टांत व लोकोक्ति यांचा इतक्या मोठ्या प्रमाणावर पंतांनी उपयोग केला की चलनी नाण्याप्रमाणें त्यांच्या काव्यपंक्ती महाराष्ट्रीयांच्या संवादांत वापरल्या जाऊं लागल्या व जात आहेत. "जरि उकिरड्यांत पडला मळला न हिरा तथापि सामान्य। प्रार्थुनि मागति पुनच्छायापासुनि भले परिसरातें।, हंसे मुक्ता नेली मग केल्या कलकलाट काकांनीं। परि प्रभुहि सग्रहीं सकल वस्तुला ठेविती। प्रमातंपशुच्या शिरावरि वसनि उभे कास्से। पुरुषें आरभावें कर्म न पौरुष कदापि सोडावें। जी मृदु लागे तों तों दर्प शिशु फार ऊन मातातें। पान्थ वरी नियमति परवशता शतगुणें करी जाच। ह्मत कर्म करावें भोगावें रडत हैंचि परिणामीं।" इत्यादि ओळी या म्हणण्याची साक्ष देतील. मोरोपंतांनी निवडलेल्या काव्यविषयासंबंधानें इतकेंच म्हणता येईल कीं, तत्कालीन लोकांच्या आवडीप्रमाणें व इतर ग्रंथकारांप्रमाणें त्यांनीं पौराणिक कथानकांची निवड केली. कालिदासासारख्या स्वतंत्र प्रतिभेच्या कवीनें देखील जेथें कुमारसंभव, रघुवंश, शाकुंतल इत्यादि सारखे ग्रंथ पौराणिक कथाभाग घेऊन सजविले, तेथें मोरोपंतांना दोष देण्यांत काय अर्थ आहे. केवळ कल्पित कथानकें रचण्याची आधुनिक तऱ्हा त्यावेळीं रसिकमान्य झाली नव्हती. ग्रंथकाराचें ऐश्वर्य तो रसपरिपोष, स्वभावपरिपोष कसा करतो, ग्रंथाची मांडणी कशी करतो, अलंकार व ध्वनि यांचा उपयोग कसा करतो, यावर अवलंबून असे मोरोपंतांनी या सर्व गोष्टी उत्तम प्रकारें करून दाखविल्यानें ते त्यांच्याच काळीं नव्हे तर मागाहून आज इतकीं वर्षे श्रेष्ठ कवि म्हणून प्रसिद्ध आहेत.

आर्यापति म्हणून पंत विख्यात आहेत. ज्ञानेश्वराची ओवी, तुकारामाचा अभंग, वामनाचा श्लोक, त्याप्रमाणें आर्या अशी मयूरपंताचीच. पंताच्या आर्येसंबंधानें पांगारकर[2] म्हणतात, "पंतांनीं जरी विविध वृत्तांत काव्यें केलीं असली

---

१ मोरोपंतांचें चरित्र, पृ ५५७

२ मोरोपंतांचें चरित्र पृ ५६८

तरी त्यांची प्रसिद्धी ' आर्यापति ' म्हणूनच आहे. पंतांपूर्वी आर्यावृत्त मराठी वाचकांना माहीत नव्हतें नामसुधाचंद्रकांत पंतांनी आर्यावृत्तावर दहा आर्या केल्या आहेत. आर्यासुधा ही गीर्वाणभाषानिष्णात अशा बुधांनी आकंठ प्राशिली होती पण प्राकृतांनी ती कानांनीं मात्र ऐकिली होती (११५). त्यांनी दया करून मला शिकविली (११६). प्राकृतांनीं ती प्रथम छंदःशास्त्रांत पिंगलाचार्यांना शिकविली होती व त्यांच्यापासून मी ती शिकलों (११४). प्राकृतवाचकांस पूर्वी इतर कांहीं छंद माहीत होते :— गर्वे ओव्या सवना दोह्यांतें सर्व जाणती लोक । श्लोक प्रिय त्यांस ज्या प्रसन्न तूं पुण्यश्लोक श्लोक ॥११३॥ ओव्या, दोहे, श्लोक वगैरे लोकमान्य झालेल्या वृत्तांचा उल्लेख करून पंत म्हणतात :—प्रकटी प्रथम भगीरथ नृपलोकीं सुरनदीस ती आर्या । तसि हे मयूर नाहीं तरि सर्वांना न दीसती आर्या ॥१११॥ आर्याभागीरथीच्या जनकाला हा अभिमानोद्गार ऐकून कोणास कौतुक वाटणार नाहीं ! . .. पंत दाक्षिण्याची मागतात :— उचित प्रचार मात्रो रसिकांस प्राकृतांत आर्यांचा । पुष्पद्वारेंचि होतो सत्कार प्राकृतांत आर्यांचा ॥११७॥ पंतांच्या आर्येला संस्कृतांत गीति असें नाव आहे." पंतांच्या आर्या त्यांच्या काळींच लोकमान्यतेस पावल्या. ज्ञानेश्वरांच्या भाषेची पकड ज्याप्रमाणें दहाराशांपूर्वी महाराष्ट्रीयांच्या मनावर होती, तशा प्रकारची पकड मोरोपंती आर्येची सुमारें शंभर-सव्वाशें वर्षे होती. आर्यासंप्रदायच महाराष्ट्रांत निर्माण झाला. मोरोपंतांना जितके अनुयायी कवी लाभले तितके क्वचितच इतर मराठी कवींना लाभले असतील. विठोबा अण्णा, राम दटवे, चिंतामणि जोशी, धुंडिराज, शाहिर कवी, परशुराम दफळे, राजाराम प्रासादी, गपूसाहेब कुरुंदवाडकर इत्यादि शेंकडों कवींनीं आपली काव्यरचना आर्यावृत्तांत केली आहे. धुंडिराज कवीनें प्रल्हादचरित्र, नारदाची लावणी, रासक्रीडा इत्यादि काव्यरचना केली आहे. "न मरे वास्तव नेला पर्वतशिखरासि लोटिला खालीं । परि तो निर्भय चित्तीं वाहे नारायणासि लाखोली" ही प्रल्हादचरित्रांतील आर्या सर्वांच्या परिचयाची आहे. जनार्दन कवीनें दामाजी पंतचरित्र आर्यावृत्तांत रचिलें असून कृष्णानंदनिमग्न या कवीचा ' राधाविलास ' आर्यावृत्तांतच आहे. विठ्ठल केरावर (शके १७०० नंतर) हा पंतानुयायी असून

याच्या काव्यांपैकीं रामचरित, शुकरंभासंवाद, कबीरकथा, गजगौरीव्रत हीं प्रसिद्ध आहेत. नारायण कवीनें लिहिलेल्या कबीराख्यानांत तसेंच शिवमोहिनी आख्यानांत त्यानें पंतांचें अनुकरण पुष्कळ केलें आहे. चिंतामणी कवीनें गोपीचंदाख्यानाचे प्रारंभीं " विद्वज्जनवृक्षवना सौरभगुणवृद्धिला महागुरुला। भावें घ्यातो प्राकृत-काव्याचार्या मयूरकविराया " मोरोपंताना नमन केलें आहे. यानें ' सीतास्वयंवर ' हें प्रकरणहि आर्यावृत्तांत रचिलें आहे. याशिवाय यानें गणपतीवर अकरा आर्या केल्या आहेत सोलापुरचे रामजोशीबुवा, पंढरपूरचे रामचंद्रपंत बडवे, रघुनाथपंत कोठे यांनींहि पंताच्या धर्तीवरच काव्यरचना केली आहे. मोरोपंताच्या श्रेष्ठत्वाचा हाहि एक अप्रत्यक्षच का होईना पण भक्कम पुरावा आहे.

मोरोपंताच्या समकालीन अशा काहीं कवींचा येथेंच उल्लेख केलेला बरा. गोपाळ, शुभानंद, माधव आणि जिवाशिवा यांनीं महाभारतांतील काहीं पर्वांवर मराठी टीका केली आहे. गोपाळ हा नेवासें येथील राहणारा होता व शुभानंद हा अकोले येथील राहणारा होता. मुरारी, जनार्दन शिवनाथ, अनंततनय, हरिदास कान्हा यांहि कवींनीं महाभारतांतील काहीं पर्वें मराठींत अनुवादिलीं आहेत. मुरारीनें भीष्मपर्व शके १६७६ मध्यें रचिलें शिवनाथानें भीष्म व द्रोण हीं पर्वें शके १६८८ मध्यें तयार केलीं अनंततनयानें उद्योगपर्व रचिलें असून हरिदास कान्हयाचें भीष्मपर्व उपलब्ध आहे. याचा काळ शके १७०० चा समजतात मोहिरीचानाथ अंबिये ( जन्म शके १६३६ मृत्यु शके १७१४ ) हे चादे या गावचे राहणारे होते. यांनीं अक्षयबोध, पूर्णाक्षरी, अद्वयानंद, सिद्धांत-संहिता, सद्‌गुरुअनुभवेश्वरी इत्यादि अध्यात्मपर व उपदेशात्मक ग्रंथ लिहिले असून शिवाय पदें व अभंगहि पुष्कळ रचिले आहेत जोतिपंतदादा ( मृत्यु शके १७१० मार्गशीर्ष कृ १२ ) यांनीं सबंध भागवतावर मराठींत टीका लिहिली असल्यानें यांना जोतिपंतदादा महाभागवत म्हणतात. यांनीं आपल्या काव्यांत अभंग व ओवी या दोन्ही वृत्तांचा उपयोग केला आहे रघुनाथ ऊर्फ हरिदास या कवीनें योगवासिष्ठ हा ग्रंथ मराठींत अनुवादिला आहे. ग्रंथाची ओवीसंख्या

सोळाहजारांहून अधिक आहे. हरिबुवा भोंडवे (समाधि शके १६९१) जातीन शिंपी असून मोठे विठ्ठलभक्त होते. हे रामदासी संप्रदायातील होते. यांनी हरिबोध (शके १६९०) व मानसागर (शके १६९५) असे दोन अध्यात्मपर ग्रंथ लिहिले आहेत. शिवाय यांची अभंग रचनाहि सुमारे पाऊणलाख आहे. भिक्षु कवीनें 'भक्ति अनुभव' (शके १६९६) नांवाची वीस अध्यायांची उद्धवगीतेवर मराठींत टीका केली आहे.

# १६

## " मराठी काव्याची पहांट "

शिवाजी महाराज, राजाराम महाराज, बाजीरावसाहेब, नानासाहेब, सवाई माधवराव इत्यादिकांचा स्वराज्यस्थापनेचा व साम्राज्य विस्ताराचा अभूतपूर्व असा पराक्रम महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर चालला असताना, साहित्यिकांचा एक वर्ग आध्यात्मिक पौराणिक उपदेशात्मक अशा प्रकारची काव्यरचना करीत होता. या साहित्यिकांत तुकाराम महाराज, काहीं अंशानीं रामदास, वामनपंडित, रघुनाथपंडित, श्रीधर, मोरोपंत यांच्यासारखे थोर कवी येतात. ज्या जगात हे वावरत होते, त्यांतून काव्यविषय न निवडता, उपनिषदें आणि रामायण महाभारतातून त्यांनी आपले विषय निवडिले ! लौकिक जगाहून काहीं वेगळ्याच जगात हे राहात असल्यागत यांची काव्यसृष्टि आहे. साहित्यिकांचा दुसरा वर्ग मात्र अधिक जागरूक होता. मराठे वीरांच्या पराक्रमात आणि प्रेमात, सुखात आणि दुःखात, सहानुभूतिपूर्वक सहभागी होऊन यानें आपल्या काव्याची रचना केली. सभोंवतालच्या सृष्टीशीं एकरूप होऊन या वर्गानें काव्यरचना केली असल्यानें, त्यांच्या काव्यात एक प्रकारचा जीवंतपणा नि जिव्हाळा, वास्तवता नि मराठेबाणा ओतप्रोत भरला आहे. या साहित्यिकांत अज्ञानदास तुलसीदासापासून ते प्रभाकर-परशुरामापर्यंतचे सर्व शाहीर येतात. यांचे काव्य अस्सल मराठी काव्य आहे. मुकुंदराजापासून ते मोरोपंतापर्यंतच्या काव्याला मराठी काव्य म्हणण्यापेक्षा भारतीय काव्य म्हटलेलें अधिक शोभेल. कारण त्यात महाराष्ट्राची विशिष्टता अशी फार थोडी उतरली आहे. अखिल भारतीय कथा आणि अखिल भारतीय तत्त्वज्ञान यांचाच काव्यात्मक किंवा पद्यात्मक परामर्श यांनीं घेतला आहे. यांच्या उलट शाहिरांच्या पोवाड्यांची आणि लावण्यांची स्थिति आहे. मराठ्यांचें मनगट,

मराठ्याचें मन, मराठ्याच्या भावभावना, मराठ्याचे आचार विचार, मराठ्याचा पोषाख आणि मराठ्याचा मानधनी मोठेपणा या सर्वांचें प्रतिबिंब पोवाड्यांत आणि लावण्यांत उत्तम प्रकारें पडलें आहे. हें खरें मराठी काव्य होय. हें व्यासोच्छिष्ट काव्य नव्हे. मराठी काव्याची सुरुवात या लोकाभिमुख काव्यापासून झाली असे म्हटलें पाहिजे. अच्युतराव कोल्हटकर यांनी या काव्याला उद्देशून 'मराठी काव्याची पहाट' असें जें म्हटलें आहे तें अगदीं यथार्थ आहे.

शाहिराच्या पोवाड्याकडे आणि लावण्याकडे लोकांचे लक्ष दिर्घकाळापासून असलें, तरी साहित्याच्या दृष्टीनें त्याचें महत्त्व ओळखून तें छापून काढण्याचें काम इ. स. १८६९ पर्यंत कोणी केलें नव्हतें. या सालीं विविधज्ञानविस्तार मासिकाचा जन्म झाला. या मासिकांतून १८७२ मध्यें नारायणरावाच्या वधाचा, १८७५ मध्यें कोल्हापूरकर आबासाहेब यांच्या खुनाचा, १८७७ मध्यें बाळा लक्ष्मण शाहीराचा खर्ड्याचा, १८७८ मध्यें सातारकर जगली रामाच्या जन्माचा व १८७९ मध्यें प्रभाकर शाहीराचा खर्ड्याचा इत्यादि पोवाडे प्रसिद्ध झाले. याच सुमारास निबंधमालेंत विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं कांहीं पोवाडे छापले. महाराष्ट्रांत इतिहाससंशोधनाची स्फूर्ति शास्त्रीबोवापासूनच निर्माण झाली. शास्त्रीबोवांचे स्नेही शंकर तुकाराम शालिग्राम त्यांनीं त्यांच्यापासून प्रेरणा मिळवून, पोवाडे जमा करण्याचें काम शिरावर घेतलें १८७९ सालीं त्यांनीं सुमारें चाळीस पोवाड्यांचा एक संग्रह प्रसिद्ध केला. पोवाडे जमविण्याचा नाद याच सुमारास ऑक्वर्थ या इंग्रज गृहस्थासहि लागला. पुढें त्यांनीं व शालिग्राम यांनीं मिळून १८९० सालीं पोवाड्यांचा दुसरा संग्रह प्रसिद्ध केला. गोविंद बल्लाळ शिनूत यांनीं सुमारें शंभर पोवाडे मिळवून त्यांचा संग्रह कोल्हापूर सरकारकडून प्रसिद्ध करविला. दुर्दैवानें हा संग्रह कोठेंहि उपलब्ध नाहीं. त्यानंतर १८९३ मध्यें बाळकृष्ण आत्माराम गुप्ते यांनीं 'होळकरशाईतिल पोवाडे' नावाचा १९ पोवाड्यांचा संग्रह प्रसिद्ध केला. शालिग्रामांनीं पुढें शाहिराच्या लावण्याहि प्रसिद्ध केल्या. चित्रशाळा छापखान्यानें प्रभाकर, होनाजीबाळा, अनंत फंदी इत्यादि शाहिराच्या लावण्या व पोवाडे इ. स. १९२० च्या सुमारास

प्रसिद्ध केले. गो. गो. अधिकारी यानीं सगनभाऊ व पठ्ठे बापुराव याच्या पोवाडे व लावण्याना प्रसिद्धी दिली. त्यानंतर य. न केळकर यानीं ऐतिहासिक पोवाडे भाग पहिला (१८२८) व भाग दुसरा (१९४४) प्रसिद्ध करून मराठ्याचा काव्यमय इतिहासच जनतेपुढें ठेविला. या सर्व संग्रहात मिळून सुमारे तीनशे पोवाडे उपलब्ध आहेत यापैकीं शिवकालीन सात, पेशवेकालीन दीडशे व अव्वल इंग्रजींतील दीडशे असे पोवाडे आहेत. ऐतिहासिक पोवाड्यात फक्त सगनभाऊचा पानपताचा पोवाडाच विषमकालीन आहे. बाकी सर्व पोवाडे समकालीन असल्यानें इतिहासाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचे आहेत. किंबहुना काहीं पोवाडे उपलब्ध ऐतिहासिक साधनापेक्षा चागले आहेत. उदाहरणार्थ मल्हारदास शाहीरकृत डभईच्या लढाईचा पोवाडा. यात माहिती भरपूर आली आहे. लहरीमुकुदाच्या नारायणरावाच्या वधावरील पोवाड्यात आनंदीबाईवरील आरोप निर्मूल केला आहे. प्रभाकराच्या खर्ड्याच्या पोवाड्यात पेशव्याच्या सरदार शिलेदाराची बिनचूक यादी आहे. बन्सरींत हे नाहीं प्रभाकराच्या एका पोवाड्यात बाजीरावाचे दोन लेकवळे (बुधावा व हैवती) याचा अन्यत्र नसलेला उल्लेख आहे.

पोवाड्याचे तीन काल कल्पिता येतात. पहिला काळ शिवाजी ते पहिले बाजीरावाचा. यात फार थोडे पोवाडे आहेत. शिवाजीच्या मृत्युनतरच्या बेबंदशाहींत हे पोवाडे नष्ट झाले की काय कळत नाहीं. दुसरा काळ, पानपत ते खर्ड्यापर्यंतचा. यात पुष्कळ पोवाडे आहेत. पहिल्या काळातील शाहीर गोंधळी व मराठे आहेत. दुसऱ्यातील गोंधळी मराठे ब्राह्मण असे सर्व जातींचे आहेत. खर्ड्याचा युद्धसग्राम आणि पुण्यातला श्रीमंत सवाई माधवराव साहेबाचा डोळेभरून पाहिलेला रंग, या कर्तीसमोर असल्यानें होनाजी बाळा, अनंतफदी, रामजोशी, प्रभाकर, सगनभाऊ, रामचंद्र, परशराम इत्यादि सर्वांनीं या प्रसगाचीं मनोहर वर्णनें करून आपल्या देशबाधवास ऐकविलीं व आनंदानें व स्फूर्तीनें लोकाचे देह पुलकून सोडिले. पोवाड्याच्या पहिल्या काळात एकहि लावणी नाहीं. दुसऱ्यात अगणित आहेत. पहिल्या काळात गद्यसदृश सुलभ वृत्त आहे तर

दुसऱ्यात अनेक पार्लीचे व रागाचे पोवाडे व लावण्या आहेत. तिसऱ्या कालात इंग्रजी अमलाचीं वर्णनें असून शाहिराची वडोदें, ग्वाल्हेर, इंदूर अशी वाताहत झालेली दिसते. 'जुने कायदे अगदि मोडले नचिपुन झाली इग्रेजी' असें एका शाहिरानें म्हटलें आहे. शाहूच्या कारकीर्दीपासून मराठी राज्यात शाहिराची चलती होती. तिचा कडेलोट दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत झाला. गगूहैबतीच्या फडास सवाईमाधवरावाकडून आश्रय होता. होनाजीस कुडनपूरचें इनाम व शिमग्याच्या तमाशाबद्दल सालीना २०० रु. मिळत. दुसरा बाजीराव आल्या-बरोबर शाहीर मिरवी. वेंकट नरसी नानाच्या वचनील त्यानें नाचाबद्दल २६००० रु. दिल्याचा उल्लेख आहे. दुसऱ्या सयाजीरावाच्या कारकीर्दीत बडोद्यात पेशवाईतील शाहिराना उत्तम आश्रय मिळाला. परशुराम एकतीस वेळा बडोद्यात आला होता.

पोवाड्याचा प्रसार शाहिरानीं तर केलाच, पण त्याच्याहिपेक्षा चित्रकथे, बहुरूपी, मराठी, गोंधळी यानीं विशेष केला. हे सर्वजण लावण्या आणि पोवाडे म्हणत, आणि ते म्हणताना ढोलकीं, एकतारी, दौर, संबळ, डफ हीं अस्सल देशी वाद्यें वाजवीत. अंबाबाई, भैरव, एकवीरा वगैरे सारख्या देवताचे गोंधळात पोवाडे म्हणण्याचा परिपाठ गोंधळ्यानीं सुरू केला. घरात एखादें शुभ कार्य असलें कीं गोंधळ हमखास होई. आणि गोंधळ म्हणला कीं त्याची पूर्तता पोवाड्यावाचून होत नसे. महाराष्ट्रीयाना या पोवाड्याविषयीं आत्मीयता वाटे याचें कारण त्याच्या कुळातील, त्याच्या नात्यापैकीं, त्याच्या पूर्वजापैकीं, कोणीनाकोणी तरी पोवाड्यात वर्णन केलेल्या लढाईवर गेलेला असे. साहजिकच पोवाडे ऐकून त्याना वीरश्रीचें व समाधानाचें भरतें येई पोवाडे व लावण्या केव्हाहि ऐकायला आनंददायक असल्या तरी त्या रणभूमीवर विश्रांतीच्या वेळीं अधिक मनोरंजक वाटत असतील यात शंका नाहीं. कारण वीराच्या पराक्रमाचें वर्णन जसें पोवाड्यात असतें, तसेंच त्याच्या शृंगाराचें वर्णन लावण्यातून केलेलें असतें वीरभोग्य असेच हे वचनाचे दोन प्रकार आहेत.

अगदीं पहिला पोवाडा अग्निदास किंवा अज्ञानदासाचा अफझलखानाच्या वधावर आहे. शाहिरानें हा प्रसंग स्वत:च्या काळीं घडलेला असा ऐकला आहे. या पोवाड्याची रचना गद्यामारखी तुणतुण्यावर सहज म्हणतां येईल अशी आहे. या पोवाड्याबद्दल शिवाजीमहाराजांकडून अज्ञानदासाला घोडा बक्षीस मिळाला होता. दुसरा पोवाडा तुलसीदासाचा असून तो तानाजीवर किंवा सिंहगडावर आहे. अज्ञानदासाची तडफ यांत नाहीं. परंतु काव्य ज्यास्त आहे. या पोवाड्याबद्दल शाहीराला शिवबाकडून सोन्याचा तोडा मिळाल्याचा उल्लेख आहे. यमाजीच्या पोवाड्यांत बाजी पासलकराच्या हरपटीचें वर्णन आहे. बाबू सनाई रामा यानें १७२६ सालांतील कर्नाटकस्वारीचा पोवाडा गाईला आहे. मल्हारदासानें हमईच्या लढाईवर पोवाडा रचिला आहे. पानपतच्या युद्धावर सगनभाऊ, रामा सट्या, पिंपळगावकर शिवराम, रत्नाक, अशा अनेक शाहीरांनीं पोवाडे केले आहेत. "भाऊसाहेबा मोहरा। आम्हांवर का रुसला पचीप्यारा" या ध्रुवपदाचा रामा सट्याचा पोवाडा करुण रसानें भरलेला आहे. लहरी मुकुंदाचा "दरुवनचा दिवा मालवला हिरा हरपला। काय गुपीत घात केला नारायणरावाला"–हा नारायणरावाच्या वधाचा पोवाडाहि करुणरसानें ओतप्रोत आहे. सवाई माधवरावाच्या रंग खेळण्यावर अनेक पोवाडे आहेत. त्यांत प्रभाकर व होनाजीबाळा यांचे बहारीचे आहेत. "जसा रंग श्रीरंग खेळले वृंदावनिं द्वापारांत। तसा रंग श्रीमंत खेळले कलियुगांत अति आदरांत" अशी आपल्या पोवाड्याची आकर्षक सुरुवात प्रभाकरानें केली आहे. खड्याच्या लढाईवर प्रभाकर, आप्पा यशवंत, कुंदाबा, अनंतफंदी, बाळा लक्ष्मण, होनाजी बाळा, रामचंद्र, महुरंगी अशा अनेक शाहिरांनीं पोवाडे रचिले आहेत. हे सर्व पोवाडे वीरश्रीयुक्त आहेत. याशिवाय सवाई माधवरावाचा मृत्यु, पट्टणकुडीची लढाई, यशवंतराव होळकर, दुसरा बाजीराव, इ. स. १८०४ व १८०५ सालचा दुष्काळ, खटकी व अष्टीची लढाई, महादजी शिंदे, नाना फडणीस, आनंदराव धुळप, दत्ताजी जाधव, संभाजी आंग्रे, फत्तेसिंग गायकवाड, दुसरे सयाजीराव, दामाजी नाईक, अहिल्याबाई होळकर, इत्यादि व्यक्तींवर व प्रसंगावरहि शाहिरांनीं पोवाडे तयार केले असून ते ऐतिहासिक माहितीनीं भरलेले असून, रचनेच्या दृष्टीनेंहि सफाईदार आहेत.

पोवाड्यात ऐतिहासिक वीरपुरुष आणि मुत्सद्दी यांनीं शत्रूंशीं घेतलेलीं झुंजें आणि गाजविलेले पराक्रम, त्यांनीं रचलेलीं कारस्थानें इत्यादिकांची माहिती ज्याप्रमाणें मिळते, त्याप्रमाणें लावण्यांतून ऐतिहासिक कालांतील समाजस्थितिविषयीं, लोकसमजुतीविषयीं माहिती कळते. मराठेशाहींत लोकांचा शकुनांवर, मुहूर्तांवर किती विश्वास होता, विवाह कोणत्या मर्यादेपर्यंत होत, डागदागिने कोणते घालीत, यात्रा कोणत्या करीत, सणवार कोणते उजवीत, आपापसांतील संबंध कसे असत, गृहव्यवस्था कशी असे इत्यादि अनेक गोष्टींवर लावण्या उत्तम प्रकारचा प्रकाश पाडतात. मराठेशाहीचा सामाजिक इतिहास या लावण्यांतून जसा व्यक्त झाला आहे तसा क्वचितच इतरत्र झाला असेल. " *दिस माझें प्रारब्ध यांतपण कधीं फिरेल बाई। एक बाळक पोटीं नाहीं* " या होनाजीच्या लावणींत संततीचें महत्त्व त्या काळीं किती वाटे ते दिसतें. रणांगणावर गेलेला पति यश घेऊन परतून येत आहे असें कळल्यावर होणारा आनंद होनाजीच्या " सहज मनामध्यें आलें माझणी कधीं स्वामीचा ऐकात पडे। तों जासूद येऊन सांगितलें मुक्काम गंगे आलीकडे " या लावणींत व्यक्त झाला आहे. नागपंचमी नवरात्र या सणाचे प्रसंगीं पति घरीं नसला म्हणजे स्त्रियांना काय वाटे ते प्रभाकराच्या " नऊदिवस नवरात्र घरीं प्राणसखा नाहीं। घरीं ग बसली अबाबाई॥ काय करूं किती आवरूं भर जोबनि मी। पती वांचुन चालली सुनी नागपंचमी " या ओळींत दिसते. त्याकाळीं दागिनें कोणते घालीत ते प्रभाकर सांगत आहे :—" गोठ हातभर ज्वे जिजमल्या मिनेदार करीं चुडे। चाल्या विचित्र दृष्टि पडे। वाकड वेळा बाहुभूषणें बाजुबंद त्यापुढें। बोल्ता कोकिळ वृथीं दडे॥ चिंचपेट्या तन्मणी हिऱ्याचे छेदिव कोंदण खडे। तादळी पोत दृष्टि ना पडे॥ पायीं विरोद्या जोडवी अनवट विचवे गेंद। रहफुली विरोद्या मारी नगाची चेंद। जड झालें शरीर मदन तोरें धुंद .." मूल न होणाऱ्या स्त्रिया काय करीत ते परशुरामाच्या पुढील लावणींत पाहावयास सांपडते " पोट पिकेना म्हणून बांधिले भाराभर गंडे। ...पंचाक्षरी आणून आर्धी। घरबंधन मी केलें। लेकाची माय पाहून ग तिच्या बाजेजवळ गेले। तिनीं ना कळतां चोळणा जावळाचे घरा आणिलें। ... वेळ्यांत येनगमा उमयना आलें

जोड्याने न्हाऊन । ... नागवळी नारायण वळीं नेला जाऊन निवरश्वरीं । .. घेतल्यातसमुद्रा । पावला देव मजला । झालें आळग नवमासीं । त्या सुमासी काय वाभूं । पति नेजळ गुणराशी '' शकुनावरील विश्वास परशुरामाच्या पुढील लावणींत दिसतो :—'' गेले कावळा लवतो डोळा फुरफुरती बाही । गेले प्रवासी घरीं कधीं येतील आमचे शिपाई.'' पेशवाईतील ऐश्वर्याची कल्पना यायला परशुरामाच्या या ओळी वाचा : —'' छपर पलंग झोपाळे माकळ्या चांदीचे लटकती हलके । पडदे चिराचे रंगित मगीत जणू घट्टा काळीज कलके । .. .. सगोगर्गी तजविग पाडिल्या आंग्रेजी ऐने जडले । शाल दुशाले महालीं बिछायत मसमालीं तक्के पडले । ''

शाहिरी वाङ्मय निर्माण करणाऱ्यात रामजोशी, अनंतफंदी, प्रभाकर, होनाजी बाळा, सगनभाऊ, परशुराम, गंगु हैबती यांची गणना प्रामुख्यानें होते. सुप्रसिद्ध रामजोशी सोलापूरकर (जन्म शके १६८४, मृत्यु शके १७३४) सर्व शाहीरांत तुऱ्याप्रमाणें होत. त्यांचा जन्म वेदशास्त्रसंपन्न अशा पित्याच्या पोटीं झाला होता. परंतु लहानपणापासून त्यांची वृत्ति रंगेल असल्यानें त्यांना लावण्याचा नाद लागला. पुढें ते स्वत च सुंदर व मार्मिक लावण्या तयार करू लागले. बयाबाई व चिमाबाई या मैत्रिणींच्या संगतींत त्यांची प्रतिभा प्रज्वलित होऊन अनेकोत्तम लावण्यांना जन्म देती झाली बयाबाईविषयीं एका लावणींत ते म्हणतात, '' कविता इजसंगें रंगा आली । धन्या सत्कविता कविरायाची, रसिकता बयाची । दैवे ही गांठ बयाबाईची ॥ '' यांच्या लावण्यातील शब्दयोजना इतकी सरस असे कीं, ती पाहून कविवर्य मोरोपंतासारखा शब्दप्रभूहि खूष झाला. मोरोपंताच्या सांगण्यावरून रामजोशानीं पुढें निव्वळ शृंगारिक लावण्या न रचता, अध्यात्मपर च पौराणिक कथानकपर लावण्या रचिल्या. यांच्या लावण्यातील शब्द इतके बेमालूम बसवलेले असत कीं त्यात इकडचा तिकडे करणें कोणालाहि कठिण वाटावें ''सुंदरा मनामधि भरली, जरा नाहिं ठरली, हवेलिंत शिरलि, मोत्याचा भांग '' या लावणींतील सुरवातीचेच शब्द किती चपखल आहेत ते बघा रामजोशाला दांभिकपणाचा किती तिटकारा होता ते ''हातदाने पटा रंगवुनि जटा धरिशि

तू शिरीं । मजसी उदाठेव का करी" हा त्यांनीं मुकुंदरायाच्या नांवाच्या मठपतीला जो फटका लगाविला आहे त्यावरून कळतें. जोशीबुवाची प्रसिद्धी त्यांच्या छेकापन्हुतीवर विशेष आहे. राधा व तिची सखी यांच्या संवादरूप वर्णन करणारी पुढील छेकापन्हुति पाहा :—"गुणरत्न कुचावर लोळे अति शोभला । तो कृष्ण काय ? नव्हे; हार कळेना तुला । बाई अंगमर्दनीं अति सुखकर वाटला । तो कृष्ण काय ? नव्हे; कर मूर्तिचा भला । मज शीतळ करितो, अति होउनिया भला । तो कृष्ण काय ? नव्हे; पवन सुवासानला ।"

संगमनेरचे अनंतफंदी (जन्म शके १६६६, मृत्यु शके १७४३) हे त्यांच्या फटक्यामुळें व लावण्यांमुळें विशेष प्रसिद्ध आहेत. त्यांचा धंदा घरचा सराफीचा. त्यांचें उपनांव घोलप. परंतु त्यांचें ध्यान स्वस्थ असण्याऐवजी अनेक प्रकारच्या फंदांत असे. यामुळें लोक त्यांना फंदी म्हणूं लागले व तें त्यांचें उपनांव ठरलें. राघोबाची लढाई, यशवंतराव होळकर, दुसरे बाजीराव यांच्यावर रचलेले त्यांचे पोवाडे रचनेच्या दृष्टीनें चांगले आहेत. "लडेगुडे हिरवे तट्टु यांची संगत धरू नको", "बर्म काढुनि हरमायाला उणें कोणाला बोलू नको । स्नेहासाठीं पदरमोड कर, पण जामिन कोणा राहुं नको" इत्यादि व्यवहारांतील उपदेश करणारे त्यांचे फटके आजहि लोकांच्या जिव्हाग्रीं वसत आहेत. अनंतफंदीची रचना विविध होती. मात्र तिच्यांत रसवत्ता हा गुण बेताचाच होता. प्रभाकर जनार्दन दातार (मृत्यु शके १७६५) हा कलाभिज्ञ शाहीर होता. त्याची प्रतिभा उज्ज्वल असून वर्णनशैली अचूक आहे. रसवत्ता, पदलालित्य, नादमाधुर्य या दृष्टींनीं पाहतां प्रभाकराची बरोबरी करणारा दुसरा शाहीर दिसत नाहीं. यानें देवादिकांच्या स्तुतिपर कविता, राजकारणी पुरुषांचे पोवाडे व शृंगारविषयक लावण्या अशी विविध काव्यरचना केली असून ती उत्तम काव्यांत मोजण्याजोगी आहे. सवाई माधवराव यांच्या रंग खेळण्याच्या प्रसंगावरील याच्या बहारीच्या पोवाड्याचें वर्णन मागें आलेंच आहे. दुसऱ्या बाजीरावाच्या अपयशावरील पोवाड्यांत याच्या मनांतील खिन्नता काव्यरूप घेऊन कशी बाहेर पडली आहे ती बघा :—"यशस्वी झाले श्रीमंत पहिले सर्वे लढायाला ।

आताच आलें अपेश कोठून बाजीरायाला ॥ धृ० ॥ विपरीत आला काळ म. ॥ गिळिलें मुंग्यानीं । पंडीतास जिंकिलें सभेमध्यें मठाध भग्यानीं । भीमास आणिलें हारीस रणांगणीं अशक्य लुग्यानीं । कुबेरासि पळविलें अकिंचन कसें तेलग्यानीं । जळीं राघवमाशास अडविलें असंख्य झिंग्यानीं जर्जर जाहला विष्णुवाहन वटराचें दग्यानीं ॥” याच्या शृंगारिक लावण्या सरस आहेत. थोडक्याशा शब्दांत वाचकाच्या समोर चित्र उभें करण्याची याची हातोटी पुढील ओळींत व्यक्त होते : – “निकोप गाभा सरळ कर्दळी हस्त तसेनाजुक दिसले। अधर लाल रंगथवित मोतींच्या रंगरसामधीं रसरमले।”

होनाजी बाळा हा जातीनें नंदगवळी होता. याच्या जीवनावर ‘अमरभूपाळी’ हा बोलपट तयार करण्यात आला, याच्या आजाचें नाव सातप्पा. हाहि लावण्या करी, सातप्याचा थोरला मुलगा बाळा बहिरू हाहि लावण्या रचीत असे. अशा रीतीनें होनाजीच्या ठिकाणीं कवित्व आनुवंशिकतेनें आलें असे म्हणावयास हरकत नाहीं. होनाजीनें पोवाडे व लावण्या अशी दुहेरी रचना केली असून ती प्रसादपूर्ण आहे. याच्या काहीं छेकापन्हुति देखील आहेत. याच्या सर्व रचनांत “घन श्याम सुंदरा श्रीधरा, अरुणोदय झाला । उठि लौकर वनमाळी उदयाचळीं मित्र आला” ही भूपाळी सर्वांगसुंदर असून आज दीडशें वर्षें महाराष्ट्राला आनंद देत आहे. होनाजीच्या तोडीचा दुसरा शाहीर सगनभाऊ (इ. स. १७७८ ते १८४० ?) हा होय. हा जेजुरीचा राहणारा व जातीनें शिकलगार मुसलमान होता. यानें रागदारीच्या लावण्या व पोवाडे रचिले आहेत. पूर्वी, लीलावरा, झान, भैरवी, पहाडी, मारा अशीं रागांचीं नावें याच्या लावण्यांवर दिलेलीं असतात. “लाडे लाडे येते मनरंजना। उचलून कडेवर घ्या ना” ही याची लावणी भावपूर्ण आहे. याचा पानपतचा पोवाडाहि चांगला आहे. गंगू हैबती, कुशाबा माळी, गोविंदा, मोतीराम हेहि शाहीर त्यांपैकीं होते. ज्याचा उल्लेख अवश्य केला पाहिजे असा शाहीर म्हणजे परशुराम (मृत्यु इ. स. १८४४ हा होय.) हा जातीनें शिंपी होता याला संत शाहीर म्हणतात याचें कारण त्याचे तमाशे एकादशीच्या दिवशींहि करीत

असत हा निःस्पृह असून अत्यंत सात्त्विक वृत्तीचा होता. याने तात्त्विक, पौराणिक कथात्मक, विनोदी, उपदेशात्मक व संकीर्ण अशा लावण्या रचिल्या असून त्या लोकरंजनपर व प्रौढ अशा आहेत. मागे त्यांचा उल्लेख आलाच आहे. "सुघड नार नवऱ्याला दिसली म्हणे वेगळे निघा। जहामर्दी समार दाविते करून तुम्हाला धरा," "घट्टाकट्टा तरणाताठा काही करीना चाकरी। घुड्डुरयानजी तीन टोणग्यांच्या निन उडवी मारी," इत्यादि लावण्यांतील विनोद तसेच "दहा शिळवण्या करीन परंतु एक ल्याचा नको नवरा। माहेरी माझे चित्त मन रमले सासरच्या नको वारा॥ वरेहून परता त्याहून वरता परपुरुष पाहून धाई। करून इतके पतिव्रता मी मन याला मारीं म्हणे," "वैराग्य पत्करी सोड मयाख्न परपुरुषाची। वाट पाहतसे। बसून निरंजन मठी। रामदिशी एक तार लाविली। कधी पाहीन हरतरी' इत्यादि लावण्यांतील 'भेदिक' तत्त्वज्ञान ही दोन्ही वैशिष्ट्यपूर्ण आहेत यात शंका नाही.

वर उल्लेखिलेल्या शाहिरांत जमा होणारे परंतु बऱ्याच पुढच्या काळात झालेले श्रीधर कृष्णाजी कुलकर्णी ऊर्फ पट्ठे बापुराव (मृत्यु इ. स. १९४५ डिसेंबर ता. २२ मुक्काम पुणे येथे) याचा उल्लेख येथेच केलेला शोभून दिसेल. "जन्माने ब्राह्मण पण उभे आयुष्य महाराच्या सागाती, लौकिक दृष्टीने बहिष्कृत व अस्पृश्य पण सरस्वतीच्या दरबारातील मानकरी व स्पृश्य, लहरी व ताठर, बाणेदार पण मनाचा हळुवार व दिलाचा दिलदार अशा विरोधाचे पट्ठे बापूराव एक चित्र आहे.[१]" हल्लींच्या तमाशात हार्मोनियम आवश्यक असते. परंतु पट्ठे बापूरावानी सबळ डफ तुणतुण्याची जुनीच पद्धत चालू ठेविली होती. त्याच्या लावण्या भेदिक म्हणजे तत्त्वज्ञानपर आहेत. परशुरामाच्या असल्या लावण्यांशी त्याच्या लावण्यांची तुलना होऊ शकेल. 'मला सांगा मत' या लावणीतील पुढील ओळी या दृष्टीने चिंत्य आहेत 'तुम्ही घेऊन आला एक उसनी जिवस। तिला निजला देऊन उस। तिची ओळख विसरला त्रास घर बांधल सच।

१ न. वा. पाटणकर

हा आमुचा सवाल तुमच्या निन्दाडा भौत। साग गुणक्षोभणी निर्मी पसरली माया। आली सगुणात न्हेळाया। तिनें वेळु रवला एक ठाया। त्याला चहू शून्याचा पाया। मोह शब्द ढोल वहवाया.' सगनभाऊच्या शृंगारिक लावण्या देखील मर्यादशील व भावपूर्ण असून, त्यातील शब्दयोजना रमणीय आहे. 'मुंबई शहर' या लावणीतील मुंबईचे वर्णन माहितीनें भरलेले आहे.

शाहिराच्या लावण्या म्हटल्या कीं, त्या येथून तेथून सर्व उत्तान शृंगारिक, अशी समजूत त्या न वाचणाऱ्या व मराठी तमाशे पाहणाऱ्यांनीं करुन घेतलेली असते. ही समजूत साफ चुकीची आहे. सुप्रसिद्ध शाहिराच्या एकदर लावणी-वाङ्मयात ज्याना अश्लील म्हणता येतील अशा लावण्या त्यातीत जास्त दहा पधरा असतील. बाकीच्या लावण्या शृंगारिक म्हणण्यापेक्षा प्रेमविषयक आहेत. हीं सर्व भावगीतें किंवा प्रेमगीतें आहेत. प्रेमाच्या शंका कुशंका, रुसने-फुगने, भेटी निरह इत्यादींची मोकळ्या मनानें व प्रामाणिकपणानें केलेलीं लावण्ययुक्त वर्णनें म्हणजे या लावण्या होत ज्याना सोंवळ्या अर्थानें अश्लील म्हणता येतील अशा लावण्यातहि जें काहीं संभोगशृंगाराचें वर्णन आहे ते ध्वन्यर्थानें केलेलें आहे. या मर्देकरादिकांच्या आधुनिक वास्तववादी काव्यात गुह्येंद्रियांचीं जीं बीभत्स वर्णनें येतात, तसलीं वर्णनें या जुन्या शाहिराच्या काव्यात मुळींच येत नाहींत. संभोगशृंगारनी सूचक वर्णनें काहीं थोड्या लावण्यात आहेत. बाकीच्या सर्व लावण्यात एका प्रेमभावनेचे विविध प्रकार लालित्यपूर्ण परंतु सरळ व सोप्या भाषेत वर्णन केलेले आढळतात. मराठी साहित्यात शाहिरी वाङ्मयाला स्वतत्र व मानाचे स्थान द्यावयाला हवें ते याचकरिता

## पेशवाई अखेरील कवी

पेशवाईच्या अखेरीस ज्याप्रमाणें शाहिरी काव्य निर्माण होत होते, त्याचप्रमाणें जुन्या वळणाचेंहि काहीं काव्य तयार होतच होते असलें काव्य तयार करणाऱ्या कवींत देवनाथ (जन्म शके १६७६ मृत्यु शके १७४३ ग्वाल्हेर येथें) हे मुख्य होते. देवनाथ हे वऱ्हाड प्रांतात सुर्जी अंजनगाव येथे राहात असत. त्यांची

गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे आहे :—नृसिंहसरस्वती–जनार्दनस्वामी–एकनाथ–गावबा ऊर्फ नित्यानंद कृष्णनाथ–विश्वंभरनाथ–मुरारनाथ–रंगनाथ गोपाळनाथ–गोविंदनाथ–देवनाथ. या परंपरेतील बहुतेक पुरुषांनी ग्रंथरचना केली आहे. एकनाथ व गावबा यांची नांवें यापूर्वीच आपल्या परिचयाचीं झालेलीं आलेत. गोपाळनाथ (समाधि शके १६८८) यांनी 'सिरोमणी' नांवाचा सुमारे नऊ हजार ओव्यांचा एक ग्रंथ लिहिला आहे. याशिवाय समाधिबोध नांवाचा दुसराहि एक लहानसा ग्रंथ त्यांचा आहे. गोपाळनाथाचे शिष्य शेख सुल्तान व गोविंदनाथ. शेख सुल्तान हा पंदरीचा वारकरी होता व त्यानें कांहीं अभंग रचिले आहेत गोविंदनाथ (जन्म शके १६४३ व मृत्यु शके १७३३) रत्नागिरीकडील मूळचे राहणारे व यांचें उपनांव पराडपे. वऱ्हाडांत अकोले जिल्ह्यांत धूसर येथें हे राहात. यांनीं नऱ्हाणपूर येथें मठ स्थापिला असून त्या ठिकाणीं अजूनहि यांची शिष्यपरंपरा आहे. नाथकवींमध्यें ओवी एकनाथाची, अभंग गोविंदनाथाचे आणि पदें देवनाथाचीं सरस समजलीं जातात. गोविंदनाथाचे पांच हजार अभंग व कांहीं पदें उपलब्ध आहेत देवनाथांनीं आरगाख्यान, अहिमही आख्यान, कृष्णजन्माख्यान वगैरे आख्यानें व अनेक सुरस कवनं रचिलें आहेत "अमोल काया आइला वाया, जसी कात कीं फुटे फरकन् । उमा वाळ विशाळ, लक्षितो वेळ, होन सावध सटकन्" हा यांचा कवन डौलदार आहे तसाच मावळ्या सगुणसुंदरा, चला मंदिरा, इंदिरा वरा, अति मृदु हृदय मृदु, तरि हरि तुम्ही कठिणसा का वरा" हा धांवाहि बहारीचा आहे

य सुमाराच्या मुसलमान भक्तांत शहामुनींचें नांव विशेष घतलें जातें यांनीं सिद्धांतबोध (शके १७८४) नांवाचा स्वतंत्र अध्यात्मपर ग्रंथ लिहिला आहे अल्ला जीसस विष्णु हीं सव एकाच परमेश्वराचीं नांवें आहेत आणि वेद व कुराण यांचा वक्ता एकच आहे असें यांत कवीनें सुचावलें आहे. महिपत, मायाजी, कृष्णदास, निळोबा, विठ्ठलनाथ वगैरे या काळांतील कवी पद अभंग वगैरे अन्यापैकीं रचीत असत "राधिकेच्या रंग पाहुनि कृष्ण दंग झाला" हें विठ्ठलनाथाचं पद सुंदर आहे सदाशिव कवानें 'उमाविलास' नांवाचें काव्य

लिहून शिवपार्वती याच्यातील चतुर व विनोदी संवाद वर्णिले आहेत. प्रल्हाद-चरित्र कर्ता शंकर पाटणकर, शतमुखरावणवधाख्यान लिहिणारा अमृतराव ओक, भावार्थसिंदु रचणारा विष्णु गोखले, पांडोबा पेंडसे व दाजीबा गोळे हे कोंकणस्थ ब्राह्मणातील या काळातील कवी उल्लेखनीय आहेत 'छंदोमंजरी' नावाचा छंदशास्त्रावरील ग्रंथ रामचंद्र दैवज्ञ यानें रचिला असून त्यात गणवृत्तें दिलीं आहेत वृत्ताचीं उदाहरणें रामचंद्राची फार चित्ताकर्षक आहेत हा रामचंद्र उंबरज जवळील वेलवडे या खेड्यातील राहणारा होता हा उत्तम ज्योतिषी असून प्रतापसिंह महाराजाच्या पदरीं होता छंदोमंजरी हा ग्रंथ कवीनें अठराव्या शतकाच्या पूर्वार्धांत लिहून पुरा केला सतुबाई, रामराय, माधवेंद्र, हरिराज शेंडे, बाळदास ही मंडळी रामचंद्र ज्योतिषाची समकालीन असून, यानीं काहीं किरकोळ रचना केली आहे

# १७

## महानुभावेतर गद्यसाहित्य व बखरी

महानुभावांच्या तत्त्वज्ञानाचा व साहित्याचा मागें विचार करीत असतांना, महानुभावीय गद्यानें मराठी गद्याचा पाया कसा घातला याचा आपण विचार केला. आता महानुभावेतर गद्यसाहित्याचा व तदनुषंगानें मराठी बखरींचा विचार करूं या. प्राचीन मराठी साहित्य बव्हंशीं पद्यमय असलें तरी ज्योतिष, वैद्यक इत्यादि शास्त्रीय ग्रंथ गद्यात लिहिण्याचा परिपाठ ज्ञानेश्वराच्या काळा पासून होता. श्रीपतीची ज्योतिषविषयक *'रत्नमाळा'*, *नागार्जुनाचा आरणमारणावर* 'योगरत्नमाला' नावाचा ग्रंथ, निढब्यालाडूचा रसरत्नदीप हे अशा प्रकारचे होत. 'छत्तीस यक्षिणी' या ग्रंथातील मंत्राचे प्रयोग व त्यांचीं तंत्रे मराठींत दिलीं आहेत. 'महालक्ष्मी शकुनवती' हा एक शकुन पाहण्याचा ग्रंथ आहे. हा सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं लिहिला गेला आहे. रामसीता शकुनवंती, हनुमान शकुनवती, नरहरी शकुनवती इत्यादि शकुनासंबंधीचे ग्रंथ यानंतरचे आहेत. हेमाद्रपंती मेस्तक व भास्कराचार्यांची *लीलावती* अशीं नावें धारण करून ख्यात पावेल तो मजकूर कोंबणारीं काहीं गद्य चोपडीं आहेत. 'अश्वचिकित्सा' *नावाचा विश्वेश्वरानें लिहिलेला ग्रंथ उपलब्ध आहे. 'भूगोल' नावाच्या एका* प्रकरणात दधिसमुद्र, मेरु, मांदार वगैरेंची काल्पनिक माहिती दिली आहे. पंधराव्या शतकातील पंचतंत्राचीं भाषांतरेंहि बरीच आहेत. वेताळ पंचविशी, सिंहासनबत्तिशी सारखे कथात्मक गद्य ग्रंथहि अनेक आहेत. दासोपंताचा 'वाक्यवृत्ति' या नावाचा एक प्रश्नोत्तररूपी गद्यग्रंथ आहे. ख्रिस्तपुराण या फादर स्टीफन विरचित (शके १५३६) पद्यग्रंथाची प्रस्तावना गद्यात आहे. सोळाव्या शतकातील गोमंतक प्रांतात मराठी भाषा कशाप्रकारची होती ती कळण्याच्या

दृष्टीनें सदरहू प्रस्तावनेंतील काहीं भाग पुढें दिला आहे "म्हणुन खिस्ताव तुमी उदड करुनु परमेश्वरासी अर्पे देआ आणि उपेगू माना का तुमासि येमकोंडिचेया मार्गाचे व अनुभावार्यांयाचेया अधकारातुले काढुनु खिस्तानपणा मितुरी मेळसे केले तेयाचेया उत्तमा क्षास्त्राचा उजवाडु भोगुनशी आमी जे कार्ये करुनुशी आधारले ते परमेश्वराचे कृपेस्तव आमचे अल्पशक्ति सगडे सिद्धी पावले, हा पुराणाचे अभग केले, तेयामाजी काहीं उत्तराची चुकी जाहाले यासरी ती तुमी खेमा करा" या शिवाय राजवाडे, खरे, पारसनीस, सरदेसाई, सबनीस इत्यादिकांनीं अनेक रसात्मक ऐतिहासिक पत्रव्यवहार प्रसिद्ध केलेला असून तो बहुमोल आहे हे सर्व ग्रंथ उल्लेखनीय असले, तरी साहित्याच्या कसोटीला क्वचित्‌च उतरणारे आहेत

साहित्याच्या कसोटीला काहीं अंशानीं उतरणारे ग्रंथ म्हणजे बखरी होत मुसलमानांच्या सहवासानें, त्यांच्या तवारिखा पाहून, मराठ्यांनीं बखरी लिहिण्यास सुरवात केली पेशव्यांच्या येथ बखरनवीस असत त्यांचा धंदा जुने कागदपत्र पाहून बखरी सजविण्याचा असे यांच्या नकला होऊन बाहेर जात इतरत्रहि लोक बखरी लिहीत सर्वांत जुन्या बखरा रामदेवरायाच्या बखरी व विद्यानगरची ऊर्फ ठाण्याचा बखर या होत या बखरी केव्हा रचिल्या गेल्या तें कळायला मार्ग नाहीं तालिकोटची लढाई शके १४८६ मध्यें झाली या लढाइवर रचलेली "तालिकोट ऊर्फ राक्षसतागडीची बखर" प्रसिद्ध आहे बखरीचा मायना पाहता राक्षसतांगडील असून लेखक लढाइच्या वेळीं हयात असावा असे बखरीतील वर्णनावरून वाटतें लढाईचे आदले दिवशीं विजय नगरच्या राजभूपास एक दु स्वप्न पडलें त्या स्वप्नाचा काहीं भाग बखरीच्या भाषेचे स्वरुप कळावें म्हणून पुढ दिला आह 'देखिलें ज आपुल कानीचे मातीं ताहून घेत होते वैसले सिंहासन हिरान घत असे आपणासी दूत येऊनु यादीन असे पाहुनु घाबिरा हाऊनु उठिला सवची थार थार जोइसी व पडित वेदशास्त्री व ग्रामजोसी चहुता दिवसाचे हाते त्यासी जाणाऊ पाठावलें"

हल्ली ज्या ऐतिहासिक बखरी प्रसिद्ध आहेत त्या सर्वांत ९६ कलमी बखर ही फार जुनी आहे. ही प्रथम अरुणोदय वर्तमान पत्रात व नंतर 'भारतवर्षात' छापिली गेली. ही फार महत्त्वाची असून हिच्या नंतरच्या अनेक शिवचरित्रकारांनीं हिचा उपयोग केलेला आहे. बखरीच्या शेवटीं पुढील मजकूर आहे.— "सदरहू आख्यान नवद प्रकरणें पुण्यश्लोक राजा त्याची कथा दत्ताजीपंत वाकेनिवीस त्यापासी तपसीलवार लिहिली होती त्यावरून सकलित नकल लेहून घेतली. अनाजी रगनाथ मलकरे याचे पुत्र राघो अनाजी मलकरे यांनीं हस्ताक्षरें नकल लिहिली आहे" दुसरी बखर कृष्णाजी अनंत सभासद यांनीं राजाराम महाराजांचे सांगण्यावरून शके १६१६ चे सुमारास रचलेली 'सभासदी बखर' होय. कृष्णाजी अनंताने चंदीचंदावर प्रांतीं असता ती लिहिली यातील हकीकत विश्वसनीय असून, लिहिण्याची शैलीहि चांगली आहे. यानंतर शके १६४० मध्ये शिवदिग्विजयाची रचना झाली ही बखर बडोदें येथें पांडुरंग रामचंद्र नंदुरबारकर यांनीं सुमारें इ. स. १८९५ मध्यें छापून प्रसिद्ध केली. मुद्रित बखरींत हीच पहिली होय. शिवाजी प्रताप (१८९५) नांवाची दुसरी एक बखर याच नंदुरबारकरांनीं प्रसिद्ध केली. शिवदिग्विजय आकारानें व महत्त्वानेंहि मोठी अशी बखर आहे. बाळाजी विश्वनाथानें दिल्लीस जाऊन अवरंगझेबाच्या मुलीच्या मार्फत शाहूची सुटका करून त्यास महाराष्ट्रांत आणिलें याचें वर्णन करणारी एक बखर आहे. शके १६८२ मध्यें पानपतचा घनघोर युद्धसंग्राम झाला. या प्रसंगावर पांच बखरी आहेत. पहिली मोरो हरी नांवाच्या इसमानें नारो सखाराम नामाच्या इसमास लिहिलेली. दुसरी पानपतास स्वतः हजर असलेल्या अताजी माणकेश्वर या राजकारणी पुरुषानें लिहून ठेवलेली तिसरा मल्हारराव होळकर यांनीं सरव मोहिमेची आपले धनि श्रीमंत पेशवे सरकार यास लिहून कळविलेली व 'होळकरांची थैली' या नांवानें प्रसिद्ध असलेली, चवथी कृष्णाजी शामराव यानें लिहिलेली व 'भाऊसाहेबांची बखर' या नांवानें प्रसिद्ध असलेली, आणि पांचवी श्रीमंत मातोश्री गोपिकाबाईसाहेब यांच्या आज्ञेवरून रघुनाथ यादव यानें

तयार केलेली 'भाऊसाहेबाची बखर' ही एका सावकाराच्या दिल्ली येथील कृष्णाजी शामराव नावाच्या गुमास्त्यानें लिहिली आहे. दाससाहेबानीं आरंभ कुंभेरीच्या किल्ल्यात कोंडिलें तेव्हापासूनचे हकीकतीस सुरवात करून ती शेवटचे पानपत येथील युद्धावर्तेच आणून सोडली आहे, व अखेर नानासाहेबाच्या मृत्युचा प्रसंग सांगून बखरीचा शेवट केला आहे. हींतील वर्णनें फारच सरस असून, गद्य वैभवशाली आहे. वीररस व करुणरस यात बहारीचे साधले आहेत. कालविपर्यासाचा दोष जो इतर बखरींत फार आढळतो, तो हींत अत्यंत कमी आहे. रघुनाथ यादव याची बखर विशेष विश्वसनीय आहे. याच प्रसंगावरील नाना फडणवीस यांचे आत्मचरित्रहि उल्लेखनीय असून सरस आहे. पानपतच्या अग्निदिव्यातून ते कसे बाहेर पडले त्याचें वर्णन अपूर्व आहे. ऐन प्रसंगीं पानपतावर सरदारानीं भाऊसाहेबास मदत केली नाहीं त्याचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे :—
"लक्ष सैन्य त्यात मोठे मोठे सरदार असतां एकही त्या समयीं श्रीमंतास आस न जाहला. बहुत दिवस अन्न भक्षिलें कृपा पुत्रवत् केली तितकें चांगला काळ होता तेव्हां करावास दगा लागल्यास प्राण देऊ अशा प्रतिज्ञा. परंतु ईश्वरघटित विपरित काळ त्यांत सोबती कोण होतो! सर्व सुखाचे सोबती." आपल्याविषयीं ते लिहितात, "क्षुधा तिसरे प्रहरीं लागली. तेव्हां चोरीचा पाला सापडला तो खाऊन पाहिला, तो तोंडात जाईना. तसाच सायंकाळीं एका ग्रामाबाहेर आलों. तां एका वैराग्यानें पीठ आणून दिलें. त्याची भाकर खादली. ती अमृतप्रमाण लागली."

पानपतच्या प्रसंगाशिवायच्या दुसऱ्याहि कांहीं बखरी आहेत. नानाफडणवीस यांच्या सांगण्यावरून बाळाजी गणेश यानें मालोजी भोसल्यापासून ते सवाई माधवराव पेशवे यांच्या काळापर्यंतची लिहिलेली बखर. ही बखर सवाई माधवराव यांच्याकरिता मुद्दाम लिहून घेण्यांत आली आहे. ही शके १७०४ मध्यें तयार केली आहे. जयराम स्वामी वडगावकराची बखर शके १७३० ३५ चे सुमाराची आहे. हींत त्या गादीचे संस्थापक शांतलिंगाप्पा यांचे पासून तो महादेवबावा पर्यंत हकीकत आली आहे. हनुमतस्वामींची बखर शके १७१५ मधील असून

तींत समर्थांचें चरित्र देण्यात आलें आहे. रघुनाथ यादव चित्रे यानें 'चित्रगुप्ताची बखर' (शके १६८५ चा सुमार) लिहून तींत शिवाजीची सर्व हकीगत वर्णिली आहे. हिची रचना साधारण प्रतीची आहे. मात्र शब्द अगडबंब वापरण्यात आले आहेत. रघुनाथ यादवापेक्षा मल्हार रामराव चिटणीस (बाळाजी आवजींचा नितनातू) यानें लिहिलेल्या 'शिवछत्रपतींचें सप्त प्रकरणात्मक चरित्र' हा ग्रंथ बऱ्याच दर्जाचा आहे. मात्र कालविपर्यासाचे दोष यात फार झाले आहेत. याच्याच नावावर प्रसिद्ध असलेलें 'राजनीति' हें प्रकरण चांगलं आहे. त्यात राजे लोकांच्या सर्व व्यवहारासंबंधीं सुरेख विवरण केलें आहे. नागपूरकर भोंसल्यांच्या बखरी गंगाधर माधवराव चिटणीस, खंडो भगवंत परभू व विनायक आनंदराव औरंगाबादकर यानीं रचिल्या आहेत. "मराठी साम्राज्याची छोटी बखर" शके १७३९ कार्तिक शु. ८ मीस तयार झाली. बाबाजी भोंसले याच्यापासून तों तहत शेवटील प्रतापसिंह महाराजापर्यंतची सर्व हकीकत या बखरींत आहे. बखर चांगली आहे, पण कर्त्याचें नाव तिच्यात दिलेलें नाहीं. "पेशव्याची बखर" कृष्णाजी विनायक सोहोनी यानीं थोडी मजकूर इतरांना सांगून लिहविली आहे. बखरीची भाषा डौलदार आहे परंतु तींत कालविपर्यासाचे दोष पुष्कळ आहेत. याशिवाय हरिवंशाची बखर अथवा पटवर्धन सरदाराच्या हकीकती, साष्टीची बखर, श्री शाहूमहाराज याची बखर, श्रीमंत नारायणराव पेशवे यांची बखर, रघूजी भोंसल्याची वंशावळी, महिकावतीची बखर, ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर यांच्या निधनाची बखर, गोविंदपंत बुंदेल्याची कैफियत, नागपूरकर भोंसल्याची बखर इत्यादि उल्लेखनीय आहेत. बखरींतील जोरदार भाषेचा नमुना म्हणून पुढें एक ल्हानसा उतारा कृष्णाजी शामराव याच्या भाऊसाहेबाच्या बखरींतून दिला आहे:-

"बागाचा वर्षाव मेघाप्रमाणें जाला. मोठा कडाका जाला. धुराची व धुळीची धुंदी जाली. कोणाचे तोंड कोणाचे दृष्टीस पडेनासें जालें. यंत्राच्या धडाकियानें घोडे मनुष्यें बधिर जालीं. क्षणभर अवघी गर्दी होऊन दोहींकडून हर! हर! म्हणोन एकदाच घोडे घातले. दोहींकडून घोडियाचीं तोंडे आंत शिरलीं. ते समयींचा कडाका तेथील अनुभविक असतील त्यास ठाऊक असेल. ऐशी आग जाली.

नंतर आगीचा मार सहून तरवारीची सणासणी झाली. त्यात ते आधींच रजपूत, त्यात मारवाडी हाडें, त्याचे मर्दुमीचे नवल नाहीं. परंतु मराठियांनीं फार शर्थ केली. ऐसें युद्ध गनिमांत कोणीं केलें नाहीं. मल्हारराव यांचे दरेनें दांतनिसकीस येऊन मोठमोठे खेतात येऊन जिवाअधिक केली. मोठा प्रलय जाहाला. न भूतो न भविष्यति."

सर्व बखरींसंबंधानें सावधानतेची सूचना देतांना सुप्रसिद्ध इतिहास संशोधक विश्वनाथ काशिनाथ राजवाडे म्हणतात, "कोणतीहि बखर घ्या, तींत कालाचा विपर्यास झाला नाहीं असें क्वचित्च आढळेल. रामरगणी कथांच्या पौर्वापर्याचें महत्त्व ह्या बखरनविसांच्या अगदींच लक्ष्यात्न गेलें. शिवाजीचा सूर्यवंशापासून उत्पत्ति, भाऊसाहेबाच्या बखरींतील मल्काजमानीचें रडगाणें इत्यादि कथा कमज्यास्त कल्पित असून क्षुल्लक आहेत. शिवाजीच्या पूर्वीच्या व त्याच्या वेळच्या मुसलमानी राज्याची माहिती, शिवाजीच्या कोणत्याहि मोहिमेचा सगतवार वृत्तांत, शिवाजीच्या किंवा पेशव्याच्या गृहस्थितीची चोख हकीकत ह्या बखरींतून बिलकूल मिळण्यासारखी नाहीं. नवल ह्या बखरींवर भिस्त ठेवून इतिहास लिहिण्याचा प्रयत्न केल्यास, सत्यासत्यतेच्या निर्णयाची कसोटी जवळ नसल्यामुळें, तो वायफळ जाण्याची बहुतेक खात्री आहे. एक धरमल चिटोरें सर्व बखरींच्या बहुमताला हाणून पाडण्यास बस आहे."

इतिहासाचार्य राजवाडे यांचा हा अभिप्राय जमेस धरूनहि असें म्हणता येईल कीं, कथानकाची मांडणी, आकर्षक प्रसंगाची गुंफण, भाषाविलास इत्यादि दृष्टींनीं ऐतिहासिक बखरी शमर टक्के इतिहासाच्या सदरांत टाकण्याजोग्या नसल्या, तरी साहित्याच्या सदरांत अवश्य जमा करण्याजोग्या आहेत.

# १८

## अव्वल इंग्रजींतील साहित्य

मराठी साहित्यगंगेला एकोणिसाव्या शतकांत कांहीं वेगळेच उपप्रवाह मिळून, तिला एक निराळेंच वळण मिळालें. इंग्रजांच्या सान्निध्यानें, सत्तेनें आणि साहित्यानें हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भाषांतील वाङ्मयाला मिश्र स्वरूप प्राप्त झालें यांत शंका नाहीं. हें स्वरूप सर्वस्वी चांगलें नव्हतें, तसेंच सर्वस्वी वाईटहि नव्हतें. किंबहुना सरतमसमाराने पाहतां त्याच्यांत चांगलेपणा अधिक होता व आहे असेंच विचारांतीं ठरेल. एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या सुमारें पाऊणशें वर्षांत जें साहित्य मराठींत तयार झालें, तें मूलतः मौलिक कदाचित् नसलें तरी देखील वैशिष्ट्यपूर्ण व परिणामकारक असेंच होतें. मराठ्यांच्या साम्राज्याच्या सीमा जसजशा लहान होऊं लागल्या, तसतशा इंग्रजी राज्याच्या लाल सीमा दूरवर पसरूं लागून, त्याचे परिणाम सर्व क्षेत्रांत दिसूं लागले. एतद्देशीयांच्या भाषा शिकण्याच्या निमित्तानें, एतद्देशीयांना नव्या प्रकारचें प्राथमिक व दुय्यम शिक्षण देण्याच्या उद्देशानें, खिस्ती धर्माचा प्रसार करण्याच्या निमित्तानें इंग्रज राज्यकर्त्यांनीं, पाश्चिमात्य मिशनऱ्यांनीं, व या दोघांच्या प्रोत्साहनानें व अनुकरणानें येथील लोकांनीं मराठी भाषेंत जी ग्रंथरचना केली व करविली तिच्यावर इंग्रजी ठसा स्पष्ट आहे. या रचनेला सुरवात बंगालमध्ये प्रथम झाली.

*मिशनऱ्यांचे प्रयत्न*

इ. स. १८०० मध्यें कलकत्ता येथें लॉर्ड वेलेस्ली यानीं फोर्ट विल्यिम कॉलेजची स्थापना करून, त्यांत आरबी, फारशी, संस्कृत, बंगाली, हिंदी व

तेलुगु भाषा सनदी नोकरांना शिकविण्याची सोय केली. इ. स. १८०३ मध्ये सुप्रसिद्ध वसईचा तह होऊन मराठ्यांचे व इंग्रजांचे राजकीय संबंध दृढ होताच, फोर्ट विलियम महाविद्यालयात मराठी भाषेचा अंतर्भाव झाला. आतापर्यंत संस्कृत व बंगाली शिकविणाऱ्या डॉ. विलियम कॅरी (जन्म इ. स. १७६१) यांच्याकडे मराठी अध्यापनाचे काम आलें. हें काम करीत असतानाच डॉ. कॅरी यांना इकडील भाषांची गोडी लागून प्राथमिक पुस्तकें व व्याकरणकोशादि ग्रंथ तयार करण्याची स्फूर्ति झाली. याच्यापूर्वी डॉ. कॅरी कलकत्त्याजवळील डॅनिश सत्तेखालीं असलेल्या श्रीरामपुरी ड्रॅग्स्टिट सोसायटीत ख्रिस्ती धर्मप्रसाराचे काम इ. स. १७९३ पासून करीत होते. मराठीचे प्राध्यापक बनताच त्यांना आपल्या प्रचार कार्यांचेंहि स्मरण होऊन त्यांनीं प्रथम मराठी भाषेचें व्याकरण (१८०५) इंग्रजींत तयार केलें. यानंतर मराठी इंग्रजी कोश (१८१०) त्यांनीं तयार केला. या ग्रंथात मराठी शब्द मोडी ठसे करून छापले आहेत. याशिवाय पंडित वैजनाथ शर्मा ऊर्फ विद्यानाथ यांच्या साहाय्यानें त्यांनीं सेंट मॅथ्यु (१८०५), बायबल (१८०७), मंगळ समाचार (१८१०), सिंहासनबत्तिशी (१८१४), पंचतंत्र (१८१५), हितोपदेश (१८१५), रघुजी भोसल्यांची वंशावळ (१८१६) इत्यादि सुमारें पंधरा पुस्तकें मराठींत श्रीरामपुर मिशनऱ्या विद्यमानें प्रसिद्ध केलीं. श्रीरामपुरी मराठी भाषेचा नमुना म्हणून सिंहासनबत्तीशीतील पुढील छोटा उतारा वाचण्यासारखा आहे:—

"अवंतीपुरींत राजा विक्रमादित्य साम्राज्य करीत असे. थके दिवसीं राज्यानें सेवकास् आज्ञा केली तुम्ही कोणते देशाची कथा चरीत्र समजुन या. चाकर राजाज्ञा पावुन अपने देशात भ्रमण करून काश्मीर देशात पावलेत. त्या देशात धनवान् यकें मनुष्यानें मोट यक तळ करले आहे परंतु त्यांत पाणी नसे."

मराठी साहित्य गंगेत एक निराळाच उपप्रवाह बंगालच्या दिशेने येऊन मिळाला असे या उताऱ्यावरून कळून येईल. या उपप्रवाहानें अर्वाचीन मराठी गद्य वाङ्मयाचा एक प्रकारे पायाच घातला असे म्हणता येईल. याचें कारण यापुढें जें गद्य निर्माण झालें त्याला अर्शी महानुभावी गद्याची परंपरा नव्हती, तशीच

बखरींतील गद्याचीहि नव्हती. या दोन्ही सरस व सरस परंपरा मोडून हें नवें गद्य प्रथम तरी इंग्रजी वळणावर व पाश्चिमात्यांकडून किंवा पाश्चिमात्यांच्या मार्फत तयार होऊं लागलें. बंगालप्रमाणें महाराष्ट्रातहि मिशनऱ्यांनीं धार्मिक प्रसार करण्याचें जें कार्य केलें त्यानें मराठी साहित्यांत भर घातली गेली. इ. स. १८१५ मध्यें मुंबईत अमेरिकन मिशनची स्थापना झाली. तत्पूर्वी लंडन मिशनरी सोसायटीचे दोन प्रचारक मुंबईस आले होते. स्कॉटिश मिशनची स्थापना मुंबईत इ. स. १८२२ मध्यें झाली. बॉंबे बुक ॲंड ट्रॅक्ट सोसायटी नांवाची ख्रिस्ती धर्मपर पुस्तकें छापणारी संस्था इ. स. १८२७ पासून आपलें कार्य करूं लागली. या मिशनरी संस्थांनीं धर्मप्रसाराच्या उद्देशानें मराठी भाषेचा अभ्यास केला, एतद्देशीयांकरितां शाळा व दवाखाने यांची स्थापना केली आणि क्रमिक पुस्तकांचीं तसेंच बायबलादि धर्मग्रंथांचीं भाषांतरें करविलीं. इ. स १८२६ पासून तें इ. स. १८७४ पर्यंतच्या सुमारें पन्नास वर्षांत अमेरिकन मिशन, स्कॉटिश मिशन व ट्रॅक्ट सोसायटी यांनीं सुमारें सव्वाशें पुस्तकें मराठींत तयार केलीं. या एका गोष्टीवरून या मंडळींचें कार्य किती जोरानें चाललें होतें त्याची कल्पना येईल. या पुस्तकांच्या लेखकांत रॉबर्ट निस्बिट, रे. मिचेल, रे. फरार, रे. डिक्सन, रे. बार्थ, रे. बाबा पदमनजी, रे. नारायण शेषाद्रि, हरि केशवजी हे प्रमुख होते. यांत ख्रिस्ती धर्माचें महत्त्व गाणारीं पुस्तकें जशीं आहेत, तशींच हिंदुधर्माची अवहेलना करणारीं मूर्तीचा उच्छेद ( १८५० ), पुनर्जन्मनिर्णय ( १८५३ ), खंडोबाची गोष्ट ( १८७४ ), तुळशीचें लग्न ( १८७४ ), ज्ञातिभेद-निर्णय ( १८६५ ), नवसाला पावणें याविषयीं विचार ( १८६८ ), कृष्ण आणि ख्रिस्त यांचीं तुलना ( १८७० )-यासारखींहि पुस्तकें आहेत. याशिवाय बालबोध गोष्टी ( मिसेस फरार, १८३८ ), यात्रिकक्रमण ( हरि केशवजी १८४१ ), बाबाजींची बखर ( बाबाजी रघुनाथ मराठे (१८४४ ) राजाचा पुत्र ( १८७४ ) इत्यादि कथात्मक आणि पातकाविषयीं विचार ( १८४५ ), मचोटीविषयीं ( १८५३ ), गालिप्रदान ( १८६९ ), गुरुजनाचें अर्थशास्त्र ( १८७० ) इत्यादि ज्ञानपर सर्वांगं असलीहि पुस्तकें आहेत. या सर्व ग्रंथनिर्मितींत हिंदूंना आपल्या

धर्मांत ओढून घेण्याचा हेतु स्पष्ट दिसत असला, तरी देखील अप्रत्यक्षपणें मराठी साहित्यवृद्धीच्या कामीं तिचा उपयोग निःसंशय झाला. या साहित्यात नवे विचार आल्यानें, आपल्या इकडील मंडळींनाहि आपल्या विचारांची पारख करता येऊन ते निश्चित् करतां आले. मिशनऱ्यांनीं प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांतील भाषा अशुद्ध असली तरी ती सोपी असल्यानें सोप्या भाषेचें वळण मराठीला लागलें. हेंच सोप्या भाषेचे वळण पुढें बापू छत्रे, हरिकेशवजी यांच्या ग्रंथात पुढें चालू राहिलें मराठी साहित्याचें पाऊल पुढें पडण्याच्या कामीं सुरवातीच्या या ख्रिस्ती वाङ्मयानें मदतच झाली यात शंका नाहीं.

## सरकारी प्रयत्न

इ. स. १८१८ मध्यें पेशवाई नष्ट होऊन महाराष्ट्रात इंग्रजांची सत्ता प्रस्थापित होताच, एलफिन्स्टन माल्कम सारख्या तत्कालीन उदार व समंजस सत्ताधिकाऱ्यांनीं महाराष्ट्रीयांच्या शिक्षणाकडे लक्ष पुरविलें. येथील लोकांबरोबर लवकर किंवा उशीरा इंग्रजांची फारकत झालीच पाहिजे, आणि अशा फारकतीच्या प्रसंगीं ती अडाणी व जंगली लोकांबरोबर न होता सुविद्य व सुसंस्कृत लोकांबरोबर व्हावी हें बरें, अशा उदार विचाराचे एलफिन्स्टनसाहेब होते. अशाच प्रकारचे विचार इंग्लंडमध्येंहि पार्लमेंटच्या सभासदांचे होते. इ. स १८१३ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीला व्यापाराची सनद देतांना, हिंदी लोकांच्या शिक्षणाकरिता तिनें एक लक्ष रुपये खर्च केले पाहिजेत अशी अट पार्लमेंटनें घातली होती. इ. स. १८१५ मध्यें मुंबईसरकारच्या ताब्यात असलेल्या प्रदेशांत गरीबांना शिक्षण देण्याकरितां एक सोसायटी किंवा सभा स्थापन करण्यांत आली होती कंपनीच्या हातीं संपूर्ण सत्ता येतांच, हेच प्रयत्न मोठ्या प्रमाणावर करण्यांत आले मुंबई, पुणें, नाशिक इत्यादि ठिकाणीं प्राथमिक व दुय्यम शिक्षण देणाऱ्या पाठशाळा कंपनी सरकारनें स्थापन केल्या. इ. स १८२० मध्यें नेटिव्ह स्कूल बुक ॲंड स्कूल सोसायटीची स्थापना होऊन तिला पांच हजार पौंडांचे सरकारी साहाय्य मिळू लागलें. याच सोसायटीचें इ. स. १८२७ मध्यें बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन

सोसायटी असे नाव मिळालें. ही संस्था इ. स. १८४० पर्यंत चालली. पुढें हिच्या शाळा एलफिन्स्टन शिक्षणसंस्थेला जोडून देण्यात आल्या व त्यांच्यावर देखरेख ठेवण्याचें काम नवीन निघालेल्या बोर्ड ऑफ एज्युकेशनला सोंपविण्यात आलें. बॉबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीनें पाश्चिमात्य व एतद्देशीय विद्वानाना उत्तेजन देऊन त्यांच्याकडून शालोपयोगी-बालोपयोगी अशीं शेंकडों पुस्तकें तयार करविलीं. असल्या पुस्तकांच्या एका ढिगाकडे पाहून ले. ब्रिग्ज यानें "हें काय ?" अशी चौकशी माउंट स्टुअर्ट एलफिन्स्टन जवळ करताच त्या द्रष्ट्यानें उत्तर दिलें, "एतद्देशीयांच्या शिक्षणाची ही सोय आहे. परंतु युरोपकडे परत जाण्याचा आपला हा राजमार्ग होय." ज्या दिरंगाईनें व शांततेनें इंग्रजांनीं हिंदुस्थानचा राज्यकारभार इ. स. १९४७ मध्यें हिंदी लोकाना सोंपून स्वदेशीं प्रयाण केलें, त्यांच्याकडे पाहिलें असताना एलफिन्स्टन साहेबाचें भविष्य खरेंच ठरलें असे म्हटलें पाहिजे. सोसायटीनें बाळगोष्टी (टॉमरॉड), बालमित्र बोधवचन (बापू छत्रे), गणित भाग १-२ (जॉर्ज जर्व्हिस), लिपीधारा (सोसायटीचें पंडित मंडळ), पदार्थविज्ञान (हरि केशवजी), इत्यादि पुस्तकें प्रसिद्ध करून शाळकरी विद्यार्थ्यांची उत्तम सोय केली. या सर्वांत सोसायटीनें परशुरामपंत तात्या गोडबोले, बाळशास्त्री घगवे, गंगाधरशास्त्री फडके, सखाराम जोशी व दाजीशास्त्री शुक्ल अशा पाच पंडिताकडून जो "महाराष्ट्र भाषेचा कोश" (१८२९ इ. स.) करविला, तें तिचें सर्वोत्तम कार्य होय. यानंतर १८३१ सालीं जे. टी. मोलस्वर्थ यानीं मराठी इंग्रजी कोश तयार केला. यानींच सुरू केलेला इंग्रजी मराठी कोश इ. स. १८४७ मध्यें मेजर कँडी यानीं पूर्ण केला. सोसायटीचे सेक्रेटरी जॉर्ज जर्व्हिस यानीं जगन्नाथशास्त्री क्रमवंत, गंगाधरशास्त्री फडके आणि बाळशास्त्री घगवे याना मराठी भाषेचें व्याकरण तयार करण्यास सांगितलें. या पंडितानीं आपापलीं व्याकरणें तयारहि केलीं. परंतु शेवटीं दादोबा पांडुरंग तर्खडकर यांनीं तयार केलेलें व्याकरण (इ. स. १८३६) हें उत्कृष्ट ठरून त्यालाच राजमान्यता व लोकमान्यता लाभली. वर उल्लेखिलेल्या पुस्तकांशिवाय मुंबईचे गव्हर्नर एलफिन्स्टन यानीं सुरू केलेल्या इंजिनिअरिंग व मेडिकल स्कूलच्या मराठीतून शिक्षण घेणाऱ्या

विद्यार्थ्यांना रसायनशास्त्र, पदार्थविज्ञान, कर्तव्य भूमिति, यंत्रशास्त्र, वैद्यक, इत्यादि शास्त्राची माहिती करून देणारी तसेच भूगोल, ज्योतिष, शिक्षणशास्त्र इत्यादि विषयावर शेंकडों पुस्तकें बाँबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या आर्थिक उत्तेजनामुळेंच केवळ तयार झाली. लहान पुस्तकांना बारशे रुपायापर्यंत व मोठ्या पुस्तकांना दोन हजार रुपायापर्यंत बक्षीस देण्यात येत असल्यानें, अनेक लेखक पुढें सरसावले. सोसायटीचे पहिले सेक्रेटरी जॉर्ज जर्व्हिस यांनीं इ. स. १८२५ मध्यें या बाबतींत एक जाहीरपत्रक प्रसिद्ध करून त्यांत हा सर्व खुलासा केला होता. भाषांतराकरितां जी भाषा योजावयाची तिच्यासंबधानें सदरहू पत्रकात म्हटलें आहे तें असें :—"जी देशभाषा सर्व लोक समजतात ती ग्रंथास घ्यावी. प्रौढ भाषेचे शब्द घालून दाटून अवघड करू नये." या सुचनेचा मोठा फायदा हा झाला कीं, संस्कृतप्रचुर अशा प्रौढ मराठींत ग्रंथरचना न होता, ती प्रसादपूर्ण व सोप्या मराठींत होऊं लागली. जर्व्हिस साहेबाच्या इच्छेप्रमाणें हरि केशवजी पाठारे यांचीं शास्त्रीय पुस्तकें सुबोध व घरगुती मराठींत तयार झालीं. ग्रंथप्रकाशनाला दुसरी मदत दक्षिणा प्राईझ कमिटी (इ. स. १८९४ पासुन डेकन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी) कडून झाली. पेशवाईत श्रावण महिन्यात ब्राह्मणाना जी दक्षिणा वाटत तिच्यापैकीं कांहीं रकम एलफिन्स्टननें पुण्याची संस्कृत पाठशाळा व ग्रंथांना उत्तेजन म्हणून वापरण्याचें ठरविलें. या कामीं सुमारें तीस हजार रुपये खर्च होते. अशा रीतीनें विविध प्रकारचें साहित्य सोसायटीच्या प्रोत्साहनानें व दक्षिणा प्राइझ कमिटिकडून होत असताना, त्यात इ. स. १८४० पासून सोसायटीच बंद करण्यात आल्यानें खंड पडला. लॉर्ड बेंटिकच्या कारकीर्दीत कंपनी सरकारनें देशी भाषाप्रीत्यर्थ होणारा खर्च अनाठायीं व अधिक ठरवून तो बंद करण्याचा निर्णय घेतला. पुढें बोर्ड ऑफ एज्युकेशनची स्थापना झाली. त्याचे मुख्य सर अर्स्किन् पेरी हे गृहस्थ होते. याना मराठीविषयीं मुळींच प्रेम नव्हतें. याच सुमारास देशी साहित्याला कमी लेखणाऱ्या मेकॉले साहेबाच्या खटपटीनें एतद्देशीयाना इंग्रजींतून शिक्षण देण्याचें धोरण सरकारनें ठरविलें. इ. स. १८५७ सालीं मुंबई विद्यापीठाची स्थापना होऊन पहिलीं कांहीं वर्षे

बी. ए. च्या वर्गात मराठी शिक्षणाची सोय होती. पण पुढें तीहि बंद करण्यात आली. उदार व थोर अन्तःकरणाच्या राज्यकर्त्यांनीं देशी भाषांच्या प्रगति करण्याचें जें धोरण सुरुवातीला ठेविलें होते, त्यात पचवीस वर्षांतच बदल होऊन जिकडे-तिकडे इंग्रजीचा बडेजाव सुरू झाला. हॅलिफॅक्स साहेबानें (इ. स. १८५४) सर्व हिंदुस्थानात प्राथमिक शिक्षणाखेरीज सर्व शिक्षण इंग्रजी भाषेच्या माध्यमातून देण्याचें नक्की केलें. यानें देशीभाषांचें सरकारी मीठ अजिबात तुटलें असें झालें तरी जो फायदा झाला तोहि कांहीं थोडा नव्हता इतकेंच नाहीं तर सरकारी साहाय्यावाचून ग्रंथकारांनीं स्वप्रेरणेनें ग्रंथरचना चालू ठेविली.

## स्वतंत्र विचाराचें साहित्य

ही ग्रंथ रचना केवळ भाषांतरात्मक, केवळ इंग्रजी वळणाची, केवळ बालोपयोगी शालोपयोगी, न्यूनगंडानें प्रेरित झालेली, अशी न होता निव्वळ थोडें फार स्वतंत्र तेज चमकूं लागलें. बापू छत्रे, हरि केशवजी, बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग, परशुरामपंततात्या गोडबोले, भाऊ महाजन, कृष्णशास्त्री चिपळूणकर इत्यादि मंडळींनी इंग्रजी विद्येबरोबरच इंग्रजी साहित्यात असलेल्या चांगल्या गोष्टी आत्मसात करून, नवीन पद्धतीचें साहित्य निर्माण करण्याचें सुरू केलें. वर्तमानपत्रांनी व मासिकांनीं लोकजागृति लवकर होते ही खूणगाठ मनात बांधून बाळशास्त्री जांभेकरांनीं दर्पण नावाचें वृत्तपत्र (१८३२) व दिग्दर्शन नावाचें मासिक सुरू केलें. भाऊ महाजन यांनीं रयतेच्या 'अडचणी' व 'गाऱ्हाणी' स्पष्टपणें सरकारच्या नजरेस आणण्याच्या हेतूनें "प्रभाकर" (१८४०) साप्ताहिक सुरू केलें. बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी प्रसिद्ध करीत असलेलें भाषांतरात्मक वाङ्मय म्हणजेच सारसर्वस्व असें नसून आपलेंहि जुनें वाङ्मय पुनर्मुद्रण करण्याच्या व अभ्यासाच्या योग्यतेचें कसें आहे तें पांडुरंग बापू जोशी पाळसकर यांनीं ज्ञानचंद्रोदय मासिकाच्या (१८४०) द्वारें सिद्ध केलें. यांत जुन्या कवींची कविता क्रमशः येत असे. माधव चंद्रोबा डुकले (१८२५ ते १८८५) यांनीं 'सर्वसंग्रह' (१८६०) मासिक सुरू करून असाच प्रयत्न मोठ्या प्रमाणावर

नेश्वर, वामन पंडित, मोरोपंत, विठ्ठल, आनंदतनय, रामजोशी, रामदास, नामदेव इत्यादि कवींच्या कविता 'लोककल्याणार्थ' शुद्ध करून माधव चंद्रोबांनीं छापिल्या. जुन्या कवींच्या साहित्याचें मथन करून त्यांतराल "नवनीत" (१८५४) ग्रंथरूपानें परशुरामपंत तात्या गोडबोले यांनीं लोकांसमोर ठेवलें. खिस्ती मिशनऱ्यांनीं स्वधर्मप्रसारार्थ "ज्ञानोदय" (१८४२) पत्र सुरू करताच मोरभट दांडेकर या पंडितानें उपदेशचंद्रिका (१८४४) नांवाचें मासिक सुरू करून मिशनऱ्यांच्या अपप्रचाराचा चांगला समाचार घेतला. डॉ. जॉन विल्सन या पाद्री गृहस्थानें "हिंदुधर्म प्रसिद्धीकरण" नांवाचीं दोन पुस्तकें (१८३२ व १८३५) प्रसिद्ध करून हिंदुधर्माची त्यांत यथेच्छ निंदा केली होती. मोरभट दांडेकरांनीं आपल्या मासिकांत या पुस्तकाचीहि चांगली हजेरी घेतली. याच कारणाकरितां १८५२ सालीं कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं 'विचार लहरी' नांवाचें वर्तमानपत्र सुरू करून खिस्त्यांची दुर्दूर नष्ट करण्याचा प्रयत्न केला. खिस्ती धर्मोपदेशकांच्या कारवायांना भुलून बाटणाऱ्या हिंदु लोकांना आपल्या धर्माची व संस्कृतीची थोरवी कळावी या हेतूनें विष्णु भिकाजी गोखले ऊर्फ विष्णुबुवा ब्रह्मचारी (इ. स. १८२५-१८७१) यांनीं वेदोक्त धर्मप्रकाश (१८६९) नांवाचा सात आठशें पानांचा ग्रंथ लिहून जी कामगिरी केली ती अवश्य उल्लेखनीय आहे. यांत पन्नास प्रकरणें असून त्यांत वेदोक्त धर्म, न्याय, निराकार देव, अवतार कल्पना, आत्मज्ञान, हठयोग, राजयोग, राजनीति, मनशास्त्र इत्यादि हिंदुधर्मदृष्ट्या महत्त्वाच्या गोष्टींचें विवेचन केलें आहे. प्रथम हिंदु असून मागाहून खिस्ती बनलेल्या बाबा पद्मनजी यांनीं आपल्या ग्रंथांत खिस्ती धर्माचा सर्वत्र जो उदोउदो केला होता त्याला तसेंच डॉ. विल्सन यांच्या ग्रंथाला या ग्रंथानें चांगलेंच प्रत्युत्तर त्याकाळीं दिलें यांत शंका नाहीं. विष्णुबुवांच्या ग्रंथाची भाषा चांगली प्रौढ, तर्कयुक्त व सावेश आहे.

## ललित साहित्य–संस्कृत नाटकांचीं रूपांतरें

आपल्या धर्मांतील अभिमानास्पद गोष्टींकडे स्वभाषकांचें लक्ष ज्याप्रमाणें विष्णुबुवा ब्रह्मचारी, मोरभट दांडेकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं वेधिलें

त्याचप्रमाणें आपल्या मराठी व संस्कृत साहित्यांतील गोमटारवद भागाकडे रसिकांचें लक्ष परशुरामपंत तात्या गोडबोले ( इ. स. १७९९–१८७४ ), कृष्णशास्त्री राजवाडे ( इ. स. १८२०–१९०० ) गणेशशास्त्री लेले ( इ. स १८२५–१८९८ ) व दादोबा पांडुरंग ( इ. स. १८१४ १८८२ ) यांनीं वेधिलें. सदाशिव काशिनाथ ऊर्फ बापू छत्रे, बाळशास्त्री जांभेकर, हरि केशवजी पाठारे ही मंडळी प्रथकार या नात्यानें कितीहि योग्य असली, बापू छत्रे व हरि केशवजी हे कितीहि रसाळ भाषांतरकर्ते असले, तरी त्यांना इंग्रज सरकारी अधिकारी व मिशनरी यांच्याकडून शाल्यानें, त्यांच्या ग्रंथांत आत्मविश्वास किंवा आत्मतेज फारसें कोठें दिसत नाहीं. बाळमित्र ( चिल्ड्रेन्स फ्रेंडसचें भाषांतर ) व इसापनीति ( ईसॉप्स फेबल्सचें भाषांतर ) या दोन सुंदर व सरस भाषांतरांनीं बापू छत्रे यांनीं आधुनिक गद्यसाहित्याचा पाया रचला यांत शंका नाहीं तरीपण ह्या ग्रंथांना स्वयंप्रेरणेचें श्रेय म्हणता येणार नाहींत. साहेबांच्या प्रेरणेनें तयार झालेले ते उघडउघड दिसतात. परशुरामपंततात्यांनीं मात्र इंग्रजी विद्यारूपी वाघिणीचें दूध पिणाऱ्यांना संस्कृत साहित्यांतील व मराठी साहित्यांतील गोमटाची लज्जत दाखविली. वेणीसंहार (१८५७), उत्तररामचरित (१८५९), शाकुंतल (१८६१), मृच्छकटिक, (१८६२), नागानंद (१८६५), पार्वती परिणय (१८७२) अशा एकाहून एक सरस संस्कृत नाटकांना त्यांनीं बेमालूम मराठी वेष दिला. संस्कृत साहित्याप्रमाणें मराठी साहित्याचा रसिकतेनें रसास्वाद घ्यावा म्हणून त्यांनीं मोरोपंतांच्या केकावलीवर केकादर्श (१८६७) नांवाची सुंदर टीका लिहिली. काव्य करणाऱ्यांना मार्गदर्शक होणार त्यांचें वृत्तदर्पण (१८६०) लहान असलें तरी उल्लेखनीय आहे. तात्यांचे ग्रंथ भाषांतरात्मक असलें तरी त्यांत हिंदुसंस्कृतीचा व आत्मतेजाचा ठसा स्पष्ट दिसतो. एतद्देशीयांना साहित्य व संस्कृति हीं दोन्ही नाहींत, असें म्हणणाऱ्या मेकॉलेसाहेबांसारख्यांना तात्यांनीं आपल्या साहित्यानें रोखठोक उत्तर दिलें कृष्णशास्त्री राजवाडे यांनीं मालतीमाधव (१८६१), मुद्राराक्षस (१८६७), अभिज्ञान शाकुंतल (१८६९), विक्रमोर्वशीय (१८७४) अशीं चार संस्कृत नाटकांचीं

भाषांतर केलीं व उत्सवप्रकाश व ऋतुवर्णन हीं दोन स्वतंत्र काव्यें रचिलीं. याशिवाय अलंकारविवेक (१८५३) नावाचा ग्रंथहि त्यांनीं तयार केला गणेश-शास्त्री लेले यांनीं जानकीपरिणय (१८६५, मालविकाग्निमित्र (१८६७), विद्धशालभंजिका (१८८९), अशीं तीन संस्कृत नाटकांचीं भाषांतरें केलीं त्यांनीं केलेलें रघुवंशाचें पद्यात्मक भाषांतर एकेकाळीं फार लोकप्रिय व प्रसिद्ध होतें. या रेराज यांनीं शिवाजीचरित्र, गंगाचरित्र, सीमंतिनीचें आख्यान इत्यादि काव्यें तयार केलीं. यांची भाषाशैली सर्वत्र प्रसादपूर्ण व ओघवती आहे. दादोबा पांडुरंग हे त्यांच्या व्याकरणाबद्दल प्रसिद्ध असले, तरी चांगले रसिक टीकाकार व काव्याचे मोक्ते होते. त्यांनीं मोरोपंतांच्या केकावलीवर विस्तृत व मार्मिक टीका लिहून तिला आपल्या मातापितरांचें 'यशोदा-पांडुरंगी' (१८६५) असें नाव दिलें. दादोबांनीं इ. स. १८७० मध्यें जें आत्मचरित्र लिहिलें तें तर केवळ मराठीचें आहे. या काळांत जीं अत्यंत वाचनीय अशीं दोन आत्मचरित्रें लिहिलीं गेलीं त्यांत याचा अंतर्भाव होत असून, दुसरें बाबा पदमनजी यांचें 'अरुणोदय' नांवाचें आत्मचरित्र होय या दोन आत्मचरित्रांवरून तत्कालीन देश-धर्म समाजस्थितीचें उत्तम ज्ञान होतें.

## स्वतंत्र नाटकें

यान्त काळांत जीत परधार्जिणेपणा किंवा परभृतपणा मुळींच नव्हता अशी एक साहित्याची शाखा नवीनच तयार होऊन पुढें तिचा घेरेदार व मनोहर वृक्ष तयार झाला. ही शाखा नाट्यसाहित्याची होय. सांगलीचे राजे चिंतामणराव अप्पासाहेब यांनीं इ. स. १८४२ मध्यें सांगलीस आलेल्या भागवत या नावाच्या एका कर्नाटकी कंपनीचीं कांहीं नाटकें पाहिलीं तीं त्यांना ओबडधोबड व बीभत्स वाटलीं. तेव्हां त्यांनीं आपल्या पदरीं असलेल्या विष्णुदास भावे यांना मराठींत नम्र व चांगलीं नाटकें तयार करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें विष्णुदासांनीं 'वरेच महाराष्ट्रग्रंथ' वाचले व 'पौराणिक इतिहास समजून घेतला.' इतकी पूर्वतयारी झाल्यावर त्यांनीं सीतास्वयंवर नाटक तयार करून त्याचा प्रयोग इ. स. १८४३

मध्यें श्रीमंतांना करून दाखविला. तो प्रयोग उत्तम झाल्याने त्यांच्या कर्त्यास उत्तेजन मिळून त्यानें पुढें रामजन्म, सीताहरण, रावणवध, द्रौपदीस्वयंवर इत्यादि सुमारे वीस पौराणिक नाटकें तयार केलीं. या नाटकांत पद्यभाग तेवढा लिहिलेला असे व गद्यभाग नगाना तोंडी सांगण्यात येई. विष्णुदास भावे यांनी नाट्यवाङ्मयाचा पाया रचताच, त्याच्यावर इमारत तयार करण्याचें काम इतरांनी सुरू केलें. यांत विनायकशास्त्री नातू (नलनाटक-श्री भिल्लणी नाटक), लक्ष्मण गोपाळ दीक्षित (मेधावती परिणय, रुक्मिणीहरण), रावजी बाळकृष्ण लेले (गोपीचंद, श्रियाळचांगुणासत्वदर्शन, सुलोचना, रावणवध), रघुनाथ शंकरशास्त्री अभ्यंकर (विराटपर्व, हरिश्चंद्रसत्वदर्शन), दत्तात्रय वासुदेव जोगळेकर (चित्रसेन), महादेव बाळाजी नेने (सैरंध्री), विनायक जनार्दन कीर्तने (जयपाळ) हे मुख्य असून यांनी पौराणिक नाटकें तयार केलीं. यांत सूत्रधार, विदूषक, गणपति, सरस्वति यांचे प्रवेश झाल्यावर मुख्य नाटकाला सुरुवात झाल्याचें बहुतेक नाटकांत दाखविलें आहे. पद्य रागदारीचीं व मधून मधून आर्या, साकी, श्लोक, दिंडी वगैरे प्रकारचीं आहेत. संवाद गद्य आहेत परंतु विनोद शब्दनिष्ठ, ओबडधोबड व बाष्कळ स्वरूपाचा आहे. पौराणिक नाटकांप्रमाणेंच कांहीं ऐतिहासिक स्वतंत्र अशीं नाटकेंहि रचिलीं गेलीं. विनायक जनार्दन कीर्तनेकृत थोरले माधवराव पेशवे, वीरेश्वर सदाशिव छत्रेकृत नारायणराव पेशवे, गोंडो सखाराम घाटेकृत अफझलखानाचा मृत्यु व दत्तात्रय रंगो कद्दीकृत सवाई माधवराव हीं अशा पैकीं नाटकें होत. कीर्तन्यांचें 'थोरले माधवराव पेशवे' नाटक एकेकाळीं रंगभूमीवर चांगलेंच लोकप्रिय होतें. सामाजिक नाटकांत महादेव बाळकृष्ण चितळेकृत मनोरमा (१८७१) व रघुनाथ शंकरशास्त्री अभ्यंकरकृत प्रबोधचिंतु अथवा स्वैरसंचार (१८७१) हीं नाटकें खूपच गाजलीं. याच काळांत कांहीं काल्पनिक नाटकेंहि वा. रा. मोडकांनी, गोंडो भिकाजी मराठे, रावजी मनोहर ताकभाते यांनी तयार केलीं. हीं नाटकें कला दृष्ट्या उच्च प्रतीचीं नसलीं तरी तीं स्वतंत्र असल्यानें त्यांची मातब्बरी भाषांतरित रूपांतरित वाङ्मयापेक्षा केव्हांहि विशेष समजली पाहिजे. बॅरन नेटिव्ह

एज्युकेशन सोसायटीचा आश्रय नंद झाल्यावर ही नाटकें तयार झाली हीहि गोष्ट लक्षात ठेवण्याजोगी आहे साहित्याची आवड लोकाच्या ठिकाणी चागलीच निर्माण झाली होती त्याचें हे द्योतक आहे. या सुमारे शभर नाटकाकडे पाहिलें असतांना आपल नाट्यवाङ्मय तरी परोपजीवी नव्हतें हें पाहून समाधान वाटतें.

## कथात्मक वाङ्मय

कथात्मक वाङ्मयात सिंहासनबत्तीशी (वैजनाथ शर्मा), हितोपदेश, वेताळ पचविशी (सदाशिव काशिनाथ छत्रे) इसापनीति (१८३०) बाळमित्र (सदाशिव काशिनाथ छत्रे), यात्रिक क्रमण (हरि केशवजी पाठारे), आरबी भार्षेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी, (कृष्णशास्त्री चिपळूणकर) बादशहा आणि बिरबल याच्या गोष्टी, रॉबिनसन क्रूशो (रावजीशास्त्री गोडबोले), रासेलस (कृष्णशास्त्री चिपळूणकर), कादबरीसार (परशुरामपत गोडबोले) इत्यादि सरस भाषातरानीं काहीं वर्षे लोकाची करमणूक केली असली, तरी त्याचे पूर्ण समाधान त्यानीं होऊ शकलें नाही स्वतत्र काल्पनिक कादंबऱ्या याच काळात तयार व्हायला सुरुवात झाली. बाबा पद्मनजींच्या "यमुना पर्यटन" (१८५७) या सामाजिक कादबरीनें मराठी कादंबरी वाङ्मयाचा पायाच घातला असे म्हणावयास हरकत नाहीं ख्रिस्ती धर्माच्या पिवळ्या चष्म्यातून पाहावी यमुना हिंदुधर्माकडे बघत असल्यानें तिला हिंदूंच्या ससारांत जिकडेतिकडे अज्ञान, जाच, दाभिकपणा भरलेला दिसतो हिंदु विधवाची दु स्थिति या कादबरींत भडक रगानें रगविली आहे अद्भुतरसात्मक कादंबऱ्यात लक्ष्मण मोरेश्वरशास्त्री हळबेकृत मुक्तामाला (१८६१), रत्नप्रभा (१८६६), नारो सदाशिव रिसबूडकृत मजुघोषा (१८६८), विश्वासराव (१८७०), केशव लक्ष्मण जोशीकरकृत विचित्रपुरी (१८७०) याचा मुख्यत्व उल्लेख केला पाहिजे. गुहा–तळघर–किल्ले–अरण्ये–विमानाचे अपघात–सकटपरंपरा इत्यादि मालमसाला वापरून या कादबऱ्याना जितक्या अतिरजित करता येईल तितक्या करण्याचा प्रयत्न त्याच्या लेखकानीं केला आहे. स्वातत्र्य नुकतेंच गेल होतें, राष्ट्रजागृति अजून झाली नव्हती, अशा त्या अर्धवट गुंगीच्या

अवस्थेत असलेल्या समाजाला अद्भुतरम्यात्मक कादंबऱ्या आवडणें अगदीं स्वाभाविक होतें. याच काळांत दोन ऐतिहासिक कथाग्रंथ तयार झाले. मोरोबा कान्होबा यानीं घाशीराम कोतवाल (१८६३) लिहून त्यात पेशवाई अखेरच्या स्थितीचें अर्धवट ऐतिहासिक असें चित्र रेखाटलें आहे. यात इतरहि अनेक गोष्टी आल्यानें जरी मनोरंजन साधलें तरी मुख्यत्वा राहिलेलें नाहीं. त्यामानानें रा. भि. गुंजीकर यांची मोचनगड (१८७१) ही ऐतिहासिक कादंबरी बरी आहे.

## इतिहास

इतिहासाच्या क्षेत्रात कांहीं स्वतंत्र पुस्तकें या काळात तयार झालीं. पूर्वीच्या काळचे शास्त्रीय दृष्टीनें लिहिलेले इतिहास मराठींत बखळ बखळ नाहींतच. महाराष्ट्राचा सुसंगत इतिहास प्रथम एल्फिन्स्टनादि युरोपियन लोकानीं लिहिला. त्याच्याच पुस्तकाचीं भाषांतरें आपल्या लोकानीं व कांहीं अशीं त्यानींहि मराठींत केलीं. ग्रांट डफच्या मराठ्याच्या इंग्रजी इतिहासाचें भाषांतर कॅप्टन डेव्हिड केपन व बाबा साने यानीं मिळून इ. स. १८२९ मध्यें 'मराठ्याची बखर' या नावानें प्रसिद्ध केलें. हा इतिहास निरत मनोवृत्तीनें ग्रांट डफनें लिहिला होता. त्यात अनेक घटनांच्या व सिद्धांताच्या चुका होत्या. नीळकंठ जनार्दन कीर्तनें यानीं प्रथम ग्रांट डफच्या इतिहासावर टीकास्त्र सोडलें "ग्रांट डफकृत मराठ्याच्या बखरीवर टीका" (१८६७) या त्याच्या निबंधानें एतद्देशीयाना ऐतिहासिक दृष्टि दिली. इ. स. १८६२ च्या सुमारास लोकहितवादी (गोपाळराव हरि देशमुख) यानीं भोसले, शिंदे, होळकर, गायकवाड इत्यादि घराण्याची माहिती प्रसिद्ध केली. विष्णु गोपाळ भिडे यानीं इ. स. १८६६ मध्यें असल ऐतिहासिक कागदपत्राचा उपयोग करून सातारच्या भोसले राजघराण्याचा इतिहास लिहिला. रंगराव बाळाजी फडके यानीं १८५७ सालच्या बंडाचा इतिहास (१८६०) प्रसिद्ध केला. यात इंग्रजाना जय मिळाल्याबद्दल ईश्वराचे आभार मानले आहेत. याच विषयावर १८७४ मध्यें विनायक कोंडदेव ओक यानीं 'शिपायाच्या बंडाचा इतिहास' नावाचें पुस्तक लिहिलें. यात बंडवाल्यांच्या

शौर्याची प्रशंसा केली आहे. कांहीं स्वतंत्र चरित्र ग्रंथहि याच सुमारास प्रसिद्ध झाले. कॅप्टन मॅकडोनाल्डकृत 'नाना फडणवीस यांची बखर' (१८५२), भास्कर हरि भागवतकृत राजा राममोहनराय (१८५८), रामचंद्र पांडुरंग आजरेकरकृत श्री विष्णुबोवा ब्रह्मचारी हीं अशापैकीं चरित्रें होत. मराठी ज्ञान-प्रसारक मासिकाच्या द्वारेंहि शिवाजी महाराज, अहल्याबाई, बुद्ध, महंमद इत्यादींचीं चरित्रें प्रसिद्ध करण्यांत आलीं आहेत.

## निबंध

स्वतंत्र विचारांनीं सजविलेल्या साहित्यशाखेंत निबंध प्रबंधाचाहि उल्लेख करता येण्याजोगा आहे. बाळशास्त्री जांभेकरांनीं आपल्या 'दर्पण' व दिग्दर्शन या नियतकालिकाच्या द्वारें तसेंच भाऊ महाजन यांनीं आपल्या प्रभाकर साप्ताहिकांतून समाजाच्या प्रगतीला पोषक असे अनेक निबंध लिहिले. ज्ञानप्रसारक ( १८५० ) पुणें पाठशाला पत्रक ( १८६१ ), विविध ज्ञानविस्तार, चंद्रिका ( १८५४ ) दंभहारक ( १८७१ ), ज्ञानसंग्रह ( १८७२ ) यांहि मासि-कांतून वाङ्मयविषयक व सामाजिक निबंध अनेक प्रसिद्ध झाले. यांपैकीं बरेच भारदस्त व माहितीपूर्ण आहेत. इ. स. १८३४ मध्ये स्थापन झालेल्या मुंबई टेंपरन्स सोसायटीच्या विद्यमानें मद्यपानाचा निषेध करणारे पुष्कळ निबंध प्रसिद्ध करण्यात आले. आळस व कर्जबाजारीपणा यावरहि कांहीं निबंध प्रसिद्ध झाले. १८५० सालीं डेक्कन व्हर्नाक्युलर सोसायटीनें गोविंद नारायण यांचा 'मद्यनिषेधक बोध' नावाचा निबंध प्रसिद्ध केला. "हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति" या विषयावर रामकृष्ण विश्वनाथ यांनीं विचारपरिप्लुत असा निबंध १८४३ त तयार केला. हा निबंध सडेतोड विचारांनीं व उपरोधपूर्ण शैलीनें नटलेला आहे. न्यायाच्या बाबतींत 'हा काळा, हा गोरा' असा जो भेद करण्यात येई त्यावर यात टीका आली असून शेवटीं म्हटलें आहे, "वाः काय ही न्याय करण्याची उत्कृष्ट चाल! मग कंपनीसाहेबानें जो दोर ठेविला आहे, त्याचें आपण कां बरें आश्चर्य मानावें! कीं 'हिंदुस्थानात राज्य नव्हे, लष्करी

अंमल व दिवाणी हुकूम आहे. " भवानी विश्वनाथ कानविंदे याच्या "मुंबईतील सुशिक्षित तरुण हिंदुलोक" या निबंधात मातृभाषेकडे होत असलेल्या दुर्लक्षा बद्दल खेद प्रदर्शित केला आहे. काशिनाथ बाळकृष्ण मराठे याच्या *'नावल व नाटक याविषयी निबंध'*, १८७२ यात तत्कालीन कादंबऱ्या व नाटकें यांतील ठळक दोष दाखवून, लेखकानें या दोन वाङ्मयप्रकाराच्या बाबतींत कोणत्या गोष्टी लक्षांत ठेवल्या पाहिजेत त्या सांगितल्या आहेत.

ज्यांनी विविध विषयांवर बरेच व सरस निबंध लिहिले अशा लेखकांत रा. ब. गोपाळ हरि देशमुख ऊर्फ लोकहितवादी (इ. स. १८२३-१८९२), गोविंद नारायण माडगावकर (इ. स. १८१५-१८६५), कृष्णशास्त्री चिपळूणकर (इ. स. १८२४-१८७८), विष्णुबुवा ब्रह्मचारी (१८२५-१८७१), विष्णुशास्त्री पंडित (१८२७-१८७६), आणि ज्योतिबा फुले (१८२७-१८९०) यांचा सहज अंतर्भाव करता येतो या सर्वांच्या निबंधात समाजाविषयींची तीव्र तळमळ व विविध सुधारणा व्हाव्यात अशी इच्छा हीं स्पष्ट दिसतात. आपल्या समाजातील दोष दाखवून स्वजनाचा तेजोभंग केल्याबद्दल लोकहितवादींवर विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं कडक प्रहार आपल्या निबंधमालेच्या द्वारें केले असले, तरी लोकहितवादींच्या कार्याचे महत्त्व रतिमात्रहि कमी होऊ शकत नाहीं. प्रभाकर, ज्ञानप्रकाश, इंदुप्रकाश, वृत्तवैभव इत्यादि नियतकालिकांतून त्यांनीं शेंकडो पत्रें लिहून आपल्या समाजाच्या डोळ्यांत अंजन घातिलें. "देश अज्ञानानें बुडाला तेव्हां ज्ञान सर्वत्र शतमुखांनीं वाढविलें पाहिजे," "लोकांस त्यांची वास्तविक स्थिति कशी आहे ती कळून त्यांनीं सुधारलें पाहिजे," त्यांनीं विचार केला पाहिजे-इत्यादि विचार त्यांच्या निबंधांतून अनुस्युत झाले आहेत. त्यांच्या व्यासंगाबद्दल व विद्वत्तेबद्दल मालकारानांहि आदर होता. आपले पुरोगामी विचार कोणाच्याहि रागलोभाची पर्वा न करता त्यांनीं निस्पृहपणें समाजासमोर मांडिले स्वदेशीचा प्रसार करण्याच्या हेतूनें " याजकरितां सर्वांहीं असा कट करावा कीं जे आपले देशांत पिकेल तेंच नेसू तेंच वापरू कसेंही असो आणि तितक्यात चांगले विद्या व जिन्नस उत्कृष्ट करावयाच्या

विद्या शिकू (इतरांसाठीं) लोकांस समजवावें की, तुम्ही मूर्ख आहां विचार करीत नाहीं यास्तव विचार करा व विद्या शिका विलायतेतील लोकांप्रमाणें अकल्यान व्हा म्हणजे तुम्हास लक्ष्मी अनुकूल होईल," असें त्यानीं लिहिले आहे पुनर्विवाहाच्या बाबतींत ते सर्वस्वी अनुकूल होते. "ईश्वरानें स्त्री व पुरुष सारखे उत्पन्न केले व उभयतांचे अधिकार समसमान आहेत असें असता पुरुषास पुन्हा विवाहाची आज्ञा आणि स्त्रियास मात्र मनाई हा केवढा जुलूम आहे." असे ते म्हणतात. "शास्त्र हे कायदे आहेत व जे अनहितकारक कायदे असतील ते सोडून दुसरे करण्यास काही चिंता नाहीं," या त्यांच्या स्पष्टोक्तींत आगरकराच्या विचाराचीं पूर्वचिन्हें स्पष्ट दिसतात. बालविवाह, जरठकुमारी विवाह यांच्या विरुद्ध ते असून, याहि बाबतींत त्यानीं इ स १८४८ मध्यें काही पत्रें प्रसिद्ध केली. हरिजन उर्फ अस्पृश्य (अस्पृष्ट) यांच्याहि संबंधीं रावबहादुराचे विचार त्यांच्या थोर अन्तःकरणाची साक्ष पटवितात. एका पत्रात हे थोर ब्राह्मण म्हणतात 'ब्राह्मण महाराची निंदा करितात त्यास शिवत नाहींत व इंग्रजाजवळ प्रीतीनें रहतात इ पाहून मला आश्चर्य वाटते शास्त्रा प्रमाणें पाहिले असता महार बरे परंतु इंग्रजाचे मंडळींत ब्राह्मण असू नयेत" (लोकहितवादी निबंधसंग्रह पृ. ३०१). जातिभेद व वर्णव्यवस्था याहि संबंधींचे त्यांचे निबंध स्वतंत्र व विचारप्रवर्तक आहेत त्यांच्या सर्व निबंधाचा साकल्यानें विचार केला असता, सामाजिक विचाराच्या क्षेत्रात ते आगरकराच्या तोडीचे निबंधकार होते असें निःशंकपणें म्हणता येईल

गोविंद नारायण माडगावकर यांचे शुचिर्भूतपणा (१८४९), ऋणनिषेधबोध (१८५०), सत्यनिरूपण (१८५२), दारूपासून अनर्थ (१८५५) इत्यादि निबंध पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले. या शिवाय ज्ञानप्रसारक मासिकांत त्यानीं काहीं सामाजिक व आर्थिक निबंध लिहिले. यांची भाषा शुद्ध, सरळ आणि गोड आहे. कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं मराठी शाळापत्रक, ज्ञानप्रकाश व विचारलहरी या नियतकालिकाच्या द्वारें अनेक विषयाचें विवेचन केलें त्यांचे मराठी व्याकरणा वरील निबंध व ग्रंथपरीक्षणें हीं मार्मिक व मुद्देसूद आहेत त्यांची भाषाशैली

सौम्य व प्रसन्न आहे. कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारख्या रसिक व विद्वान पित्याच्या हाताखालीं शाळापत्रकांत उमेदवारी केल्यानेंच विष्णुशास्त्री पुढें ओजस्वी लिखाण करूं शकले. कृष्णशास्त्र्यांच्या "अनेकविद्या मूलतत्त्वसंग्रह' (१८६१) या ग्रंथांतहि अनेक विषयांवर सुबोध शैलीनें लिहिलेले लेख आहेत. विष्णुबावा ब्रह्मचारी यांच्या वेदोक्तधर्मप्रकाश या ग्रंथाचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. त्याशिवाय 'सुखदायक राज्यप्रकरणी निबंध (१८६७)' व 'सहजस्थितीचा निबंध (१८६१)' हेहि त्यांचे निबंध पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले असून विचारप्रवर्तक आहेत. त्यांची विचारसरणी स्वतंत्र, उदार व जोरदार होती. विश्वकुटुंबवादाविषयीं १८६७ सालीं प्रसिद्ध केलेले त्यांचे विचार आजहि ताजे वाटतात. सुखदायक राज्यप्रकरणांत एके ठिकाणीं ते म्हणतात, "...या प्रमाणें सर्व प्रजा एक कुटुंब व सर्व जमीन हाच एक भाग व त्यांतून जे जे निपेल ते ते सर्वांचें एक या प्रमाणें राज्यव्यवस्था अमलीं म्हणजे सर्वांना सर्व उपभोग मिळतात. व सर्वांना उत्तम खावयास मिळतें व सर्वांना उत्तम विपुल वस्त्रें व अलंकारभूषणें मिळतात व सर्वांना नाच, तमाशे, बैठकी पहावयास सांपडतात. कोणास कांहीं प्राप्त होत नाहीं असे होतच नाहीं. म्हणून सर्व लोक पूर्णकाम होतात यामुळें कामाच्या अपूर्णतेनें क्रोध येणें हें शिल्लक रहात नाहीं. आणि क्रोध नसल्यामुळें गुन्हा करणें किंवा गुन्हा करण्यास्तव मत्सर धरून वसणें यांचा लवलेशहि शिल्लक राहत नाहीं. यामुळें हाच प्रजेचा व राजाचा परमेश्वर असावा तसा सत्य आहे." समाजसत्तावाद किंवा कम्युनिझम मध्यें जशा प्रकारची राज्यव्यवस्था असते, तशाच प्रकारची व्यवस्था आपल्या निबंधांत इतक्या पूर्वकाळीं लिहिल्याबद्दल त्यांच्याविषयीं सादर कौतुक वाटूं लागतें.

स्त्रीशिक्षणाचा उपक्रम प्रथम मुंबईत इ. स. १८२४ त अमेरिकन मिशननें केला. मिशनऱ्यांच्या शाळेंत मुलींना पाठवायला लोक सुरुवातीला तयार नव्हते. पुढें या विषयावर ज्ञानप्रसारक मासिकांत व इतरत्रहि अनेक लेख प्रसिद्ध झाल्यावर पालक मुलींना शाळांत पाठवूं लागले. इ. स. १८४१ मध्यें जोतिराव फुल्यांनीं पुण्यांत एक मुलींची शाळा काढिली. अशा तऱ्हेनें स्त्रीशिक्षणाला सुरुवात होतांच स्त्रियांच्या पुनर्विवाहाचा प्रश्न आपोआपच पुढें आला. इ. स. १८४२ त

भाग चांगला आहे. परंतु ब्राह्मणजातिविषयीं त्यांच्या विचारसरणींत जो कळकळीत द्वेष आढळतो, त्याला वस्तुस्थितीचा आधार फारच अल्प आहे. त्या काळांत ते वागत होते, त्यांत ब्राह्मणाप्रमाणें मराठे व प्रभू हेहि अस्पृश्यांना दूर ठेवीत असत. ब्राह्मणशिक्षक तर अस्पृश्यांना शिकवावयास तयार नसत, तसेंच प्रभू शिक्षकहि तयार नसत. दादोबा पांडुरंगांनी आपल्या आत्मचरित्रांत याचा उल्लेख केला आहे. भाऊजी प्रभू नावाचे शिक्षकानीं बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या शाळांतून कुळवाड्यांच्या मुलांना जगन्नाथ शंकरशेट व इतर पारशी व युरोपियन सभासदांच्या मदतीनें काढून टाकिलीं व असा घाट घातला कीं, कुळवाड्याचीं मुलें शाळेंत आल्यास प्रभू लोकांच्या मुलांस येण्यास आपण मनाई करूं! त्या काळची परिस्थिति तशी होती. तिच्याकडे आजच्या दृष्टीनें पाहून चालणार नाहीं. दादोबा पांडुरंग म्हणतात, "त्यांच्या त्या काळच्या आग्रही समजुतीप्रमाणें त्यांना मोठा दोष देतां येतो असें मला वाटत नाहीं. अद्यापि आतां इतके शिक्षित लोक झाले आहेत व सुधारलेपणाचा मोठा अभिमान बाळगतात त्यांच्याहि मनांतून ही व्याधि मुक्त नाहीं. किंबहुना तेव्हांपेक्षा आतां जातिद्वेष आतून अधिक वाढल्यासारखा दिसतो." मराठ्यांचें राज्य महाराष्ट्रावर दीडशें वर्षें होतें, अनेक मराठा संस्थानें महाराष्ट्रांत तसेंच महाराष्ट्राबाहेर होतीं, असें असून मराठ्यांच्या शिक्षणाची प्रगति मंदगतीनें झालेली आपण पाहतों. ब्राह्मणांच्यामुळें मराठ्यांचें शिक्षण झालें नाहीं हें म्हणणें वस्तुस्थितीला धरून नाहीं. एकेकाळीं खुद्द ब्राह्मणांचें शिक्षणहि इतरांच्या मनानें बेताबेतानेंच होतें. धार्मिक गुलामगिरी ही ऐच्छिक गोष्ट आहे. ज्या ब्राह्मणेतरांना आपल्या घरीं भटांना बोलावयाचें नसेल त्यांनी बोलवूं नये. आम्हांला बोलवाच, असा हट्ट ब्राह्मण कधींहि धरणार नाहीं व पूर्वींहि त्यांनीं कधीं धरला नव्हता. ज्या काळांत लोकहितवादी, विष्णुबुवा ब्रह्मचारी, विष्णुशास्त्री पंडितासारखे उदार मनाचे ब्राह्मण सर्व हिंदूंच्या उद्धाराकरितां झटत होते, त्या काळांत "ब्राह्मणांचें कसब" या सारखें पुस्तक ज्योतिबांनी लिहिल्यामुळें, त्यांच्या लेखनाला शास्त्रशुद्धतेच्या अभावाचा मोठाच दोष लागला आहे.

ब्राह्मणद्वेषापायीं ब्रह्मदेव, मत्स्य, कच्छ, वराह, नृसिंह इत्यादि अवताराच्या संबंधीं 'गुलामगिरी' या पुस्तकात त्यानीं जें विवेचन केलें आहे तें नाविन्यपूर्ण असलें तरी केवळ काल्पनिक व बीभत्स आहे. "जोतिराव आणि धोंडिबा याचा संवाद"–अशा रूपानें असलेल्या गुलामगिरी या पुस्तकात तर्कशास्त्राला धरून असें फारच थोडें विवेचन आहे. दूषित पूर्वग्रहाच्या चष्म्यातून लेखकानें ब्राह्मणाकडे पहावयाचें ठरविल्यानें त्याला कोणताच सद्गुण ब्राह्मणात आढळलेला नाहीं. ब्राह्मण क्षत्रिय वैश्य असे त्रैवर्णीक आर्य समजले जात असून, ज्योतिरावांनी फक्त ब्राह्मणानाच आर्य कल्पून त्याच्याकडून शूद्रातिशूद्राना अनन्वित त्रास झाला असे म्हटले आहे. विप्रिय म्हणजे विप्र, नारसिंह म्हणजे सिंहाची बायको, मार्तंड म्हणजे मारतोंड, मियामल्हार म्हणजे मिया नावाच्या मुसल्मानानें मल्हार नावाच्या ब्राह्मणेतराच्या आश्रयानें केलेला राग, म्हसोबा म्हणजे महासुभा, उपाध्ये म्हणजे उपाधि देणारे, रक्षक म्हणजे राक्षस, भ्रष्ट म्हणजे भट्ट इत्यादि ज्योतिरावानी सुचविलेल्या व्युत्पत्तींत विनोद भरपूर असला तरी सत्य नावाला सुद्धां नाहीं. त्यावेळचे समजस देशाभिमानी लोक इंग्रज लोकास व मिशनरीस हाकून लावल्याशिवाय देशाची उर्जित स्थिति व्हावयाची नाहीं असे म्हणत. इ. स १९४२ सालीं काँग्रेसनें महात्मा गांधींच्या प्रेरणेनें इंग्रजाना 'भारत छोडो' असे निक्षून ठरावाच्या रूपानें सांगितलें. असे असून ज्योतिरावांना मात्र यात भयाचा बाबा वाटला, यावरून त्याचा दृष्टिकोण कसा सदोष होता तें कळतें असें असलें तरी त्याकाळीं भूतदयेचा व समानतेचा संदेश त्यानीं जो दिला व त्याप्रमाणें स्वतः झीज सोसून त्यानीं जें शिक्षणप्रसाराचें व अस्पृश्योद्धाराचें कार्य केलें तें निःसशय अविस्मरणीय असेंच आहे. त्याना महात्मा ज्योतिराव फुले म्हणायाचे तें याचकरिता.

### काव्य

काव्याच्या प्रातात खरोच स्वतंत्रपणा आढळतो पेशवाई नष्ट झाल्यावर पोवाडे व लावण्या रचणाऱ्या शाहिराचा मोठाच आश्रय नाहींसा झाला दुसरे

बाजीराव पेशवे यांच्यावर प्रभाकरानें जो पोवाडा रचला आहे त्यांत तसेंच सातारच्या प्रतापसिंह महाराज यांच्यावर सगनभाऊनें जो पोवाडा रचला आहे त्यांत, स्वातंत्र्यलक्ष्मी नष्ट झाल्याचें दुःख शाहीरांना किती झालें होतें तें स्पष्ट होतें. "कांहीं तरी सोद पुढें दिसेना जीव जगायाला। कोणास जावें शरण कोण हरि देईल खायाला," असें मोठ्या कळवळ्यानें या स्थितीचें वर्णन प्रभाकरानें केलें आहे. पेशवाई बुडाल्यावर शाहीरांना बडोद्यात दुसऱ्या सयाजीराव महाराजांकडून (इ. स. १८१९ ते १८४७) चांगला आश्रय मिळाला. त्यावेळीं बडोद्यात चालू असलेल्या पुष्कळ खिचडी वाटण्याच्या पद्धतीनें अनेक कुटुंबांचें आपत्काळीं रक्षण झालें. या बाबतींत प्रभाकर म्हणतो, "भक्तजनाचें माहेर देशावर श्री पंढरपूर। याचप्रमाण हें योग्य बडोदें सर्व लेश करी दूर॥ नित्य उठून वाटितात खिचडी॥ ब्राह्मणही महाशूर। स्त्रिया पुरुष मुलीमुलांसकट पोट होतें भरपूर॥ पुण्यवान गायकवाड जगनीतळांत ते मशहूर। सर्व कनकमय लोक घरोघर नित्य सोन्याचा धुर॥ ..विश्वकुटुंबी श्रीमंत ते तर तूर्त पनेला भतरले। गायकवाड आहेत म्हणून हें समस्त ब्राह्मण सावरले। तानसेन पंथाचे गवय्ये तेहि प्रभूनीं आवरले। कर्रां तोडे हातात दुपेटे लाल जरीचे पांघरिले।" आपल्याला झालेल्या कर्जांतूनहि उद्धरण्याची प्रभाकरानें दुसरे सयाजीराव यांजवर रचलेल्या पोवाड्यात केली आहे. तो म्हणतो, "प्रभाकर कवीश्वर गुंतला पहा कर्जाच्या कमळांत। द्रव्य छुपेना प्रकाश पडल्या सुटून जाईल स्वच्छंदांत". प्रभाकरानें द्रव्य मिळविण्याच्या आशेनें नाना शंकरशेट, जिजाजी व पेस्तनजी शेट, साष्टी कलेक्टर ऑफिसांतील मंडळी यांच्यावरहि पोवाडे रचले यावरून त्याची परिस्थिति किती हलाखीची झाली असली पाहिजे हें दिसतें. या त्याच्या काव्यांत स्वतंत्रता असला, त्याची भाषा प्रासादिक असली, तरी पूर्वीच्या त्याच्या लावण्यांतील तेज यांत नाहीं. सगनभाऊच्या काव्याची हीच तऱ्हा आहे. स्वातंत्र्याचें वैभव पाहिलेल्या शाहिराकडून नव्या आंग्लशाहीवर सरस काव्य होणार कसें?

याहि काळांत जुन्या प्रकारची काव्यरचना अधून मधून होत होती, हें

अनंतसुत विठ्ठलबोवा ऊर्फ कावडीबोवा याच्या "दत्तप्रबोध" (शके १७८२) ग्रंथावरून समजतें. या ग्रंथाच्या सुमारें चौदा हजार ओंव्या असून, त्यात नारद, पद्म व शिव इत्यादि पुराणाच्या आधारें मुख्यत. दत्ताच्या कथा व तदनुषंगानें जनार्दनस्वामी, एकनाथ, निंबराज, दासोपंतादि दत्तभक्तांच्या कथा आल्या आहेत. गुरुचरित्रापेक्षा या ग्रंथात अनुसूया व दत्त यांचा तत्त्वज्ञानपर संवाद विस्तारानें आला आहे. तसेच जनार्दन एकनाथांच्या ज्या कथा आहेत त्याहि स्वतंत्र व गुरुचरित्रात नसलेल्या अशा आहेत. ग्रंथाची भाषा सुबोध व रसाळ आहे. श्रोत्यांना विनवणी प्रेमळपणानें करण्यात आली आहे. विठ्ठलबोवा म्हणतात, "ग्रंथरूपी हें मानससरोवर। येथ हंसरूपी तुम्ही श्रोते सुंदर। अर्थमुक्ताफळें सेवणार। आणि निवडणार दुग्धपाणी ॥" ग्रंथाची सुरुवात व समाप्ति कोठें व केव्हा झाली त्याविषयी कवि म्हणतात, "हृदयभुवनीं श्रीदत्त। प्रगटोनि वदविला ग्रंथ। आरंभ जाला माळव्यांत। स्थळविस्तार परियेसा ॥ ॐकार अवंतिका-मध्यस्थान। इंद्रपुरनामाभिधान। तेथें चाळीस अध्याय संपवोन। साधिलें प्रयाग तेथोनी ॥ पाहावें द्वारकाधीशासी। म्हणोनि निघालों वेगेंसी। पावलों येवोनि गुर्जरदेशीं। देवतीर्थ क्षेत्रासी पाहिलें ॥ रेवाडाकुंडमध्यस्थ। क्षेत्र बडोदें विख्यात। वसती साधुसंत योगी महंत। दैवतें अद्भुत महास्थानें ॥ या क्षेत्रीं सुरस। अध्याय जाले एकतीस। पूर्वीचे असती चाळीस। एवं एकाहत्तर रचियेलें। श्रीमद्दत्तकृपाप्रसादेंकरोन। थोडक्या शब्दें जालें निरोपण। तुम्ही संतमातुश्याघन। गोड करून घेइजे ॥ शालिवाहन शके सत्राशें ब्यायशीं। संवत एकुणिसें सोळासी। प्रजापति नाम संवत्सरासी। परिपूर्तीसी ग्रंथ आला ॥ ...अनंतसुत विनवी संतांसी। अनन्य भावें शरण पदांसी। सांभाळिजे दीनासी। अभयदानासी देइजे ॥ इति श्रीदत्तप्रबोध ग्रंथ। श्रवणेंचि पुरती मनोरथ। सदा परिसोत भाविकभक्त। एकाहत्तरओंव्यागाथगोड हा ॥" जवळ जवळ श्रीधर कवींची आठवण करून देणारा विठ्ठलबोवांचा हा ग्रंथ बडोदें येथें शके १८२२ मध्यें दामोदर सावळाराम आणि मंडळीनें पूर्णचंद्रोदय छापखान्यात छापून प्रसिद्ध केला. हंसराज (शके १७२० ते १७७७) यांची रामदासी

पद्धतीची वेदांतविषयक कविता याच काळातील होत. वेदांतासारखा विषयहि सुगम करून सांगण्याची याची शैली वाखाणण्याजोगी होती. उदासवृत्तिचें वर्णन त्यांनीं असें केलें आहे, "स्तब्धता परी जड नव्हे। सावध परी न हेलावे। टंगेपणही न सरावें। हे उदासवृत्ति."

विठोबा अण्णा दप्तरदार (इ. स. १८१३ ते इ. स. १८७३) यांनीं पदें, फटका वगैरे बराच स्फुट व स्वतंत्र कविता लिहिली आहे. याची कविता चंद्रशेखर म्हणतात त्याप्रमाणें प्रासादिक व रसवती आहे. मात्र ती जुन्या वळणाची व उपदेशात्मक आहे. राजा सर टी. माधवराव (इ. स. १८२१ १८९१) याची कविता स्वतंत्र पण उपदेशात्मकच मुख्यतः आहे. त्याच्या आर्या मोरोपंती आर्यांची आठवण करून देतात भास्कर दामोदर पाळंदे (इ. स. १८१२ ते इ. स. १८७४ याची कविता स्वतंत्र असून विविध वृत्तात्मक व पद्यात्मक आहे. त्यांनीं रत्नमाला नावाचा एक उत्कृष्ट ईश्वरभक्ति पर पद्यग्रंथ लिहिला आहे. त्यांची कविता भक्तिरसानें ओतप्रोत भरली आहे. त्यांच्या रत्नमाला काव्यावर मोरोपंताच्या केकावलीची दाट छाया पडलेली स्पष्ट दिसते. महादेव मोरेश्वर कुंटे (इ. स. १८३५ ते इ. स. १८८८) यांचें काव्य अगदीं स्वतंत्र शैलीचें आहे. वर्डस्वर्थ कवि प्रमाणें सामान्य लोकांच्या मापेंत यांनीं आपल्या 'राजाराम महाराज,' 'राजा शिवाजी' व 'मन' या काव्यांची रचना केली आहे बालसमाजीचें कुम्यांनीं केलेलें वर्णन किती हृद्य आहे तें पहा:—"चिमुकली पगडी झळके शिरीं। चिमुकली तरवार धरी करीं! चिमुकला चढवी वर चोळणा। चिमुकला सरदार निघे रणा॥" शिवराम रामकृष्ण निलसुरे (मृत्यु इ. स. १८७८) याची कविता स्फुट व कथनपर अशी आहे. 'नगर दहन' हें यांचें काव्य अन्यापेक्षीं असून, त्यात करुणरसाचा परिपोष चांगला झाला आहे परशुरामपंत तात्या गोडबोले, कृष्णशास्त्री चिपळूणकर, गणेशशास्त्री लेले ही या काळातील विशेष प्रसिद्ध अशी कवि मंडळी होती. परंतु या तिघांच्या काव्यांत स्वतंत्रपणा असा फारच थोडा आहे. उत्तररामचरित व मृच्छकटिक यांतील परशुरामपंत तात्याची रूपांतरित कविता

प्रौढ, सुलभ व हृदयंगम आहे. कृष्णशास्त्र्यांचें मेघदूताचें भाषांतर अत्यंत रमणीय आहे. याशिवाय त्यांच्या अनेक अन्योक्ति मार्मिक व बहारीच्या आहेत. गणेशशास्त्री लेले यांनीं केलेलें रघुवंशाचें पद्यात्मक भाषांतर सरस आहे.

## साहित्याचें मूल्यमापन

इ. स. १८१८ पासून ते इ. स. १८७४ पर्यंतच्या सुमारें साठसत्तर वर्षांच्या कालावधींत लहान मोठीं अशीं अदमासें एक हजार पुस्तकें तयार झालीं. न्यायमूर्ति रानडे यांनीं सरकारच्या हुकुमावरून इ. स. १८६४ मध्यें जो वृत्तांत तयार केला त्यांत ६६१ ग्रंथांचा निर्देश आहे. इतर देशी भाषांच्या मानानें ही संख्या निःसंशय अधिक असली, तरी जें साहित्य निर्माण झालें तें सामान्य प्रतीचेंच झाल्याचें न्यायमूर्तींनीं म्हटलें आहे. उत्तम साहित्याच्या सदरांत पडू शकेल असा एकहि ग्रंथ एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पाऊणशे वर्षांत मराठी वाङ्मयांत तयार झाला नाहीं. लोकहितवादी, विष्णुबुवा ब्रह्मचारी, नीळकंठराव कीर्तने, दादोबा पांडुरंग, महादेव मोरेश्वर कुंटे, बाळशास्त्री जांभेकर, ज्योतिबा फुले अशासारखी पांच दहा मंडळी स्वतंत्र प्रज्ञेची व प्रतिभेची या काळांत झालेली आढळतात. यांच्या वाङ्मयांत नावीन्य, ताजेपणा व तेज यांचा प्रत्यय बऱ्याच अंशानीं येतो. लोकहितवादींच्या "शतपत्रां"त, विष्णुबुवांच्या "वेदोक्तधर्मप्रकाशा"त, कुंट्यांच्या "राजा शिवाजी"त, जोतिबांच्या गुलामगिरी पुस्तकांतील कांहीं भागांत विचारांचा ताजेपणा व दमदारपणा निःसंशय आढळतो. समाजाला जागृत करण्याचें, डिवचण्याचें सामर्थ्य यांच्या लिखाणांत आहे. बाकीचें सारें वाङ्मय परधार्जिणें, परभृत, पराश्रित असेंच आहे. एतद्देशियांना अजिबात ज्ञानाचा, वाङ्मयाचा गंध नाहीं, तेव्हां त्यांना धुळाक्षरें शिकविण्यापासूनची तयारी केली पाहिजे अशा भावनेनें, सरकारी प्रोत्साहनानें व मिशनऱ्यांच्या प्रयत्नानें तयार झालेलें हें वाङ्मय आहे. याचें स्वरूप मुख्यतः बालोपयोगी, शालोपयोगी असें आहे. सुरुवातीला याचें स्वरूप प्रायः गद्यप्रधान असल्यानें व याला इंग्रजांची स्फूर्ति लाभल्यानें, महामहो-

पाध्याय दत्तोपंत पोतदार यांनी मराठी गद्याचा इंग्रजी अवतार असें म्हटले आहे. खरोखर हा एक अवतारच होता, यांत स्वतंत्र तेज मुळींच नव्हतें. इ. स. १८१८ ते १८३९ या मुदतींत तयार झालेल्या माधवराव मुनशीकृत सभासदी बखरींतील जुन्या तेजस्वी गद्याशीं बापू छत्रे यांच्या बाळमित्र (इ. स. १८२८) या तत्कालीन गाजलेल्या पुस्तकातील गद्याची तुलना केली असता, दोहोंतील फरक स्पष्ट होतो. माधवराव मुनशी म्हणतात "श्रीमत् जगदीश्वराप्रति नमन करून ग्रंथ लिहिण्यास प्रारंभ करितों कीं, पूर्वी हा ग्रंथ साहेब आलिशान मिस्तर इल्फिन्स्टनसाहेब बहादुर यांनीं मेजरअली मुनशी यांजकडून उर्दू भाषेंत करवून याचें नाव आगयेफ महफील असें ठेवून सन १८०४ या साली छापखान्यात देऊन छापविला. परन्तु जे लोक पारसी विद्येंत प्रवीण नाहींत त्यांचें समजुतींत येत नाहीं. याजकरितां मजकूरीचे मराठी भाषेंत तर्जुमा केला असता दक्षणी सर्व लोकाचे समजुतींत चांगला येईल म्हणोन श्रीमन्महाराज आदिपुरुषांचे गादीचे छत्रपति स्वामी यांणीं आज्ञा केल्यावरून माधवराव मुनशी यांणें त्यांतील सार अर्थ काढून या पोथीची योजना करून इचें नाव सभासदी असें ठेविलें एतिवाय - हा ग्रंथ वाचून जो कोणी मनन करील त्यास सर्व हिंदुस्थानचें वर्तमान येथपर्यंत समजेल कीं, कोणी सामान्य लोक त्याजपुढें येणिप्रीची कल्पना थोडू शकणार नाहीं." बाळमित्रकार म्हणतात, "असे बोलणें होऊन तीं मुलें (बाई व बापू) निजावयास गेलीं. दुसरा दिवस उगवला तों तीं उजाडता उठावीं तीं प्रहर दिवस येईपर्यंत अंथरुणावरच होतीं. अधिक वेळ निजतात त्याचें अंग जड होतें, कांहीं सुचत नाहीं, तसें मासूम आणि आईस झालें. शेवटीं कोणीं हाक न मारिता, तीं आपले आपण कावरीबावरीं झालेलीं उठलीं. मग त्याचें मनात आलें कीं, आपण सगळा दिवस दुर्वें तें करू. तेणेंकरून त्यांचें विचार अमळ सतोष वाटला." बापू छत्रे यांच्या भाषेत मार्दव निःसंशय आहे. परंतु सभासदीतील उताऱ्यात जें तेज आहे तें त्यांच्या किंवा तत्कालीन कोणत्याच गद्यात सामान्यतः आढळत नाहीं. ओजस्वी आणि आत्मप्रत्ययी वाङ्मय या काळात तयार झालेंच नाहीं. स्वातंत्र्य गेल्यानें लढाऱ्या ठिकाणचें तेज व आत्मप्रत्यय

नाटिकांच्या नंतर प्रसिद्ध झाल्या. या गोष्टीवरूनहि या क्षेत्रातील त्यांची कामगिरी इतरांना कशी उत्तेजक व मार्गदर्शक ठरली हें दिसून येईल.

## एकांकिका व नाटिका

गेल्या काही वर्षांत एकांकिकांचा व नाटिकांचा बराच प्रसार झाला. रेडिओ, शाळा, वगैरे ठिकाणीं या एकांकिकांचे प्रयोग सामान्यतः होत असतात. सर्वच एकांकिकांचा या रूपरेषेत उल्लेख येणें अशक्य आहे. तरी काहीं लेखकांचा उल्लेख केला पाहिजे. अशा लेखकांत 'प्रेक्षकांनो क्षमा करावी' इत्यादि सहा एकांकिकांचे कर्ते वसंत सबनीस, परोपकारी शंभु (१९३७) या नाटिकेचे कर्ते पां. गु. काळगांवकर, जावें त्यांच्या वंशा व प्रेमाविना भिकारी या नाटिकांचे कर्ते माधव कृष्णाजी कुलकर्णी (जन्म २ फेब्रुआरी १९१४) चिपळूणचील बंडल, विष प्याला, पद्मावतीचा डाग इत्यादि नाटिकांचे कर्ते वी. म. बापट, ठिणगी कर्ते वि. भ. कुलकर्णी, कलावंताणी चौकट गुलाम, मामा फडणविस (१९६० इत्यादि विनोदी एकांकिका लिहिणारे सुप्रसिद्ध लेखक प्रा. पद्माकर डावरे (यांनीच मृत्युंजय नावाचे सामाजिक नाटक लिहिलें आहे) आराधना सारख्या संगीत प्रधान नाटुकले कर्त्या श्रीमती ज्योत्स्ना भोळे, आजोबाच्या मुली कर्ते माधव मनोहर, स्मशान घाटचे घोड, काचेचे घर, अंधारी रेखा कर्ते गो. ग. पारखी, वडिलार्जित तट कर्ते दि. वि. जोशी, चेकमेट कर्ते जयवंत दळवी, न उमगलेले कर्ते गो. नी. दांडेकर; पुन्हा गोकुळ कर्ते मामा वरेरकर, उपकार आणि इतर नाटिका कर्ते डॉ. गो. के. भट, अमृत घर तुझ्या घरी, अमर हा माझा झाला कर्ते मधुकर आष्टीकर, घन तमीं शुक्र इत्यादि सात एकांकिका लिहिणारे रत्नाकर मतकरी, झपाटलेले घर कर्ते श्री. घोड, बुद्धिबळाचा डाव कर्ते बबन इत्यादिंचा उल्लेख करता येईल. अनंत काणेकर व पु. ल. देशपांडे, विजय तेंडुलकर यांच्या एकांकिकांचा त्यांच्या नाट्यांबरोबर इतरत्र उल्लेख व आल्यान येथे केला नाहीं.

भा. वि. वरेरकर आणि नाट्यसंस्था इ. स. १९३३ मध्यें नाट्यक्षेत्रात

सुधारणा करण्याच्या हेतूनें एक सांघिक प्रयत्न करून पाहण्यांत आला. हा प्रयत्न दोन तीन वर्षे चालून पुढें बंद पडला. रंगभूमीवर कांही तरी बदल घडवून आणण्याच्या प्रामाणिक इच्छेनें तो करण्यात आला होता यात शंका नाहीं. नाटकें अधिकाधिक वास्तवतापूर्ण, कलापूर्ण व समाजस्थितिद्योतक व्हावींत अशा इच्छेनें नाट्यमन्वंतर लिमिटेड या संस्थेची स्थापना ता. १ जुलै १९३३ रोजीं झाली. या संस्थेंत केशवराव दाते, केशवराव काळे, केशवराव भोळे, श्री. वि. वर्तक व पार्श्वनाथ आळतेकर यांच्यासारखी कर्तबगार चालक मंडळी असून दाते–काळे–ज्योत्स्ना भोळे–पद्मावती वर्तक–आळतेकर इत्यादि कुशल व सुशिक्षित नटनटींचा संच होता.

नाटक हें खरेखुरें संसाराचें चित्र दिसावें म्हणून स्त्रियांचीं कामें स्त्रियांनींच करणें, स्वगत व एकीकडे या जुन्या नाटकांतील भाषणप्रकाराचा नायनाट करणें, खरीं दारें, खऱ्या खिडक्या दाखविणाऱ्या 'फ्लॅट्सीन्स'ची योजना करून दारें-खिडक्या खाच-कारजी गुंडाळून ठेवणारे जुन्या प्रकारचे पडदे काढून टाकणें, पार्श्वसंगीताची योजना करून, कथानकांतील भावभावनांप्रमाणें बेतशीर पद्यांची योजना करणें, रंगभूमीवर एकाचें भाषण चालू असताना दुसऱ्यांनीं तें मुकस्तंभाप्रमाणें ऐकण्याची प्रथा बंद करणें, आयुष्यांतील अटीतटीचे व क्षोभकारक प्रसंग रंगवून, पूर्वावस्थानिवेदनाच्या तंत्रानें कथानकाचा मागील भाग वर्णन करणें इत्यादि सुधारणा घडवून आणण्याचा मनापासून प्रयत्न नाट्यमन्वंतरनें केला. हा प्रयत्न पुढें फार दिवस टिकला नसला तरी थोडे दिवस या संस्थेनें नवनाट्य लोकांना दाखविलें यांत शंका नाहीं. नाट्यमन्वंतरकरितां श्रीधर विनायक वर्तक यांनीं आंधळ्यांची शाळा (१९३३), लपंडाव (१९३३) व तक्षशीला अशीं एकाच वर्षांत तीन नाटकें लिहिलीं. हीं तिन्हीं नाटकें रंगभूमीवर येऊन कांहीं दिवस त्यांनीं नाट्यमन्वंतर झाल्याचा भास निर्माण केला. समाजाच्या जिव्हाळ्याचे विषय आणि आधुनिक नाट्यतंत्र यामुळें हीं नाटकें चांगलींच लोकप्रिय झालीं. आंधळ्यांची शाळा हें गॉल्स्वर्दी नाटकातील विषयावर पण स्वतंत्रपणें रचण्यात आलें असून, तक्षशीला हें भाषांतरात्मक आहे. वर्तकांच्या नाटकांतील प्रधान

करचना कल्पपूर्ण, स्वभावरेखन सूक्ष्म व मार्मिक आणि संवाद सुटसुटीत व पात्रांचा स्वभावपरिपोष करणारे आहेत. मात्र त्यांच्या नाटकांत वर्णन केलेले प्रसंग वास्तवतापूर्ण किंवा समाजात नेहमीं घडणारे असे न मानता, कांहीं थोड्या लोकांच्या चावर्तीत घडणारे अपवादस्वरूपाचे मानले पाहिजेत. आंधळ्यांच्या शाळेंतील सुशिलेवर मनोहर विश्वनाथ-अण्णासाहेब या तिघांचेंहि मनापासून प्रेम असून लपंडावातील विनायकरावावर उर्मिला व उषा या दोघींचें प्रेम असतें. हिंदुसमाजात हे प्रकार अजून तरी क्वचित् घडणारे असल्यानें, या नाटकांना आणि त्यांतील पात्रांना प्रातिनिधिक मानणें चुकीचें ठरेल.

## नाटककार आचार्य अत्रे

आचार्य अत्रे (जन्म १३ ऑगष्ट १८९८) यांच्या नाटकांसंबंधीं विचार करतांना, मराठी रंगभूमीच्या ज्या परिस्थितींत त्यांनीं आपलीं नाटकें लिहिलीं ती परिस्थिति लक्षांत घेतली पाहिजे. इ. स. १९३१ ते १९४० हा दसका मराठी रंगभूमीच्या दृष्टीनें जोगमीच्या गेला. १९१५ ते १९२५ पर्यंतचा काळ मराठी रंगभूमीचा वैभवकाल म्हणून सांगता येईल. त्यानंतर तिला एक प्रकारची घसरगुंडी लागली. त्यांत बोलपटाची भर पडताच, प्रेक्षकांच्या झुंडीच्या झुंडी रंगभूमि सोडून रजतपटाकडे धावत गल्या. एखादें गडांतर यावें आणि मागसानें अनिच्छया शरणागत व्हावें, त्याप्रमाणें रंगभूमीची स्थिति होऊन ती निपचित पडली. आता या महाराष्ट्रांतल्या लाडक्या रंगभूमीचें होणार तरी कसें या विचारात जागते लोक पडले. रुग्णाइताच्या बिछान्याभोवती मन्यातुन्या वैद्यांची व डॉक्टरांची गर्दी सुरू झाली आणि त्यांनीं नवे नवे मंत्र तंत्रांचे इलाज करून रंगभूमीला जगविण्याचे प्रयत्न केले. अशा प्रयत्नांत मामा वरेरकर, नाटिकाकार गद्रे, माधवराव जोशी, नाट्यमन्वंतरकर यांचे प्रयत्न प्रमुखत्वें सांगता येतील. या च्याटणानीं रंगभूमीला कांहीं गुण येईना. बोलपटगृहाकडे धावणाऱ्या प्रेक्षकांना नाटकें बघायला भाग पाडणारा कोणी तरी चतुर नि कसबी नाटककार हवा होता.

आचार्य अत्रे यांच्या रूपानें हवा होता तो नाटककार रंगभूमीला मिळाला.

अत्र्यांचीं नाटकें रंगभूमीवर यशस्वी झालीं याचें कारण निश्चित काळांतील बहुजनसमाजाच्या मनाची परीक्षा करून त्यांनीं असें ठरविलें कीं, रंगभूमीच्या पडत्या काळात विनोदाचा खमंग व चुरचुरीत मसाला वापरल्याशिवाय प्रेक्षकांचा नाट्यविषयक मरगळलेली भूक प्रज्वलित होणार नाहीं. साहजिकच विनोदप्रधान अशीं चरचरीत नाटकें लिहून आपसमरण अशा रंगभूमीला त्यांनीं प्रथम हसरा, नंतर चेतनायुक्त व नंतर सतेज बनविली. याचा परिणाम होऊन प्रेक्षकांच्या झुंडीच्या झुंडी त्यांचीं नाटकें पाहायला लोटू लागल्या.

अत्र्यांच्या नाटकांचे माझ्या दृष्टीनें तीन गट सहज पडतात. पहिल्या गटात साष्टांग नमस्कार, भ्रमाचा भोपळा, लग्नाची बेडी, पराचा कावळा, पाणिग्रहण व कवडीचुंबक हीं प्रहसनात्मक नाटकें येतात. दुसऱ्या गटात घराबाहेर, उद्याचा संसार व जग काय म्हणेल हीं भावपूर्ण गंभीर व अभिजात स्वरूपाचीं नाटकें येतात. आणि तिसऱ्या गटात वंदे भारतम् व मी उभा आहें यासारखीं प्रमेयात्मक नाटकें येतात.[1] या तिन्ही प्रकारच्या नाटकांचें तंत्र वेगवेगळें आहे. प्रहसनात्मक नाटकात (ज्याला इंग्रजींत फ्लॅर्स किंवा फार्स म्हणतात) मुद्दाम अतिशयोक्तीचा अवलंब करून काहीं गोष्टींचें विडंबन केलेलें असतें. असल्या नाटकांतून वास्तवतेचें जसें दर्शन होत नाहीं, त्याचप्रमाणें ज्याला सूक्ष्म स्वभावरेखन म्हणतात त्याचेंहि यात दर्शन होणें दुर्लभ असतें. व्यक्तीचें, वस्तूचें किंवा संस्थाचें विडंबन करून त्यांच्यात सुधारणा घडवून आणण्याच्या उद्देशानें लिहिलेल्या नाटकांत इतर गंभीर गोष्टींची अपेक्षा करणें चुकीचें ठरेल. याच्या उलट गंभीर नाटकांत वास्तवतेचें दर्शन झालें पाहिजे. आयुष्यात आढळणाऱ्या व्यक्तींचीं चित्रें त्यात आलीं पाहिजेत. व्यवहारातल्या व्यक्ती ज्याप्रमाणें वागतात त्याप्रमाणेंच गंभीर नाटकातल्या व्यक्तीहि वागल्या पाहिजेत. ज्या भावनांचे संग्राम आपल्या संसारात चालतात, त्यांचींच चित्रें हलुवार हातानें गंभीर नाटकात रेखाटलीं गेलीं पाहिजेत. प्रमेयात्मक नाटकात स्वभावरेखनांतील सूक्ष्मता आढळली नाहीं, तरी मुख्य

१ याशिवाय वीरवचन व गुरुदक्षिणा हीं दोन पौराणिक नाटकें यांनीं लिहिलीं आहेत.

प्रमेयाची मांडणी परिणामकारक व पटणारी झाली पाहिजे प्रमेयात्मक नाटकात एरव्ही अपरिहार्य असणारा रुक्षपणा टाळण्याकरिता नाटकात अर्थातच विनोदाची माफक पखरणहि व्हायला पाहिजे

प्रहसनात्मक, भावनात्मक व प्रमेयात्मक अशा तीन प्रकारच्या नाटकांचें तत्र ध्यानात्यासमोर ठेवून अत्र्यांची नाटकें पाहिली असता आपणाला काय आढळतें तें पाहू या प्रथम प्रहसनात्मक नाटकाच्या गटापैकीं नमुन्यादाखल साष्टांग नमस्कार हें नाटक घेऊ या या प्रहसनात साष्टांग नमस्कार, काव्य, व ज्योतिष यांचें फाजील वेड लागलेल्यांची टिंगल उडविण्याच्या उद्देशानें मुद्दाम त्यांची अतिरंजित स्वरूपें ग. व. शेपाद्रि, कवि भद्रायु व सिद्धेश्वर यांच्या रूपानें दाखविण्यात आलीं आहेत नमस्काराचें व्रत मोडूं नये म्हणून प्रवासात असताना गाडीच्या डब्यातहि नमस्कार घालणारे रावबहादुर शेपाद्रि, पटकी झालेली असताना त्याला वैद्यकीय इलाज करण्याऐवजीं त्या प्रसंगावर आचरटपणानें काव्य करणारा भद्रायु, प्रेमाची मागणी करायला गेला असताना ज्योतिषदृष्ट्या वेळ प्रतिकूल आहे असें कळताच प्रेमयाचना न करणारा सिद्धेश्वर या व्यक्ती अशाच स्वरूपात व्यवहारात आढळणें अर्थातच शक्य नाहीं त्यांच्या जवळपास येऊं शकणाऱ्या व्यक्ती मात्र हरघडी आपणाला पाहावयास सापडतात काहीं वर्षांमागें महाराष्ट्रात साष्टांग नमस्कार, ज्योतिष व काव्यशास्त्र यांचें वेड पीक आलें होतें त्याला आळा बसावा म्हणून प्रस्तुत नाटकात या तिन्ही गोष्टींचें मार्मिक विडंबन करण्यात आलें आहे उरलेल्या प्रहसनात्मक नाटकात अशाच प्रकारें मुद्दाम अतिशयोक्तीचा अवलंब करून विनोदाच्या साहाय्यानें सामाजिक वैगुण्यें नाहींशीं करण्याचा यशस्वी प्रयत्न करण्यात आला आहे या नाटकातील पात्रांचें स्वभावरेखन सूक्ष्म किंवा भरीव नसलें तरी तें वैशिष्ट्यपूर्ण खचित् आहे सर्व रोगांवर नमस्काराचा इलाज सांगणारे ग. व. शेपाद्रि, पस्तीसाव्या वर्षापर्यंत कवींच्या शिरस्त्याप्रमाणें मृत्यु न आल्यास भाडघरच्या तलावात आत्महत्या करण्याचा निश्चय केलेला कवि भद्रायु, उठल्यासुटल्या 'आमचे ग्रह ठीक नाहींत' म्हणणारा सिद्धेश्वर, औषधें खाण्याचें वेड लागलेला कचेश्वर, प्रायश्चित्तापुढें ──लगाय म्हणणारा गोरण,

यांच्याचीं नाटकें रंगभूमीवर यशस्वी झालीं याचें कारण विशिष्ट काळांतील बहुजनसमाजाच्या मनाची परीक्षा करून त्यांनीं असें ठरविलें कीं, रंगभूमीच्या पहिल्या काळांत विनोदाचा उथळ व चुरचुरीत मसाला वापरल्यावांचून प्रेक्षकांचा नाट्यविषयक सदाचलेली भूक प्रज्वलित होणार नाहीं. साहजिकच विनोदप्रधान अशीं बरीचशीं नाटकें लिहून आसन्नमरण अशा रंगभूमीला त्यांनीं प्रथम हुशार, नंतर चेतनायुक्त व नंतर सतेज बनविली. याचा परिणाम होऊन प्रेक्षकांच्या झुंडीच्या झुंडी त्यांचीं नाटकें पाहण्यास लोटू लागल्या.

अत्र्यांच्या नाटकांचे माझ्या दृष्टीनें तीन गट सहज पडतात. पहिल्या गटांत साष्टांग नमस्कार, भ्रमाचा भोपळा, लग्नाची बेडी, पराचा कावळा, पाणिग्रहण व कवडीचुंबक हीं प्रहसनात्मक नाटकें येतात. दुसऱ्या गटांत घराबाहेर, उद्याचा संसार व जग काय म्हणेल हीं भावपूर्ण गंभीर व अभिजात स्वरूपाचीं नाटकें येतात. आणि तिसऱ्या गटांत वंदे मातरम् व मी उभा आहें यांसारखीं प्रमेयात्मक नाटकें येतात.[१] या तिन्ही प्रकारच्या नाटकांचें तंत्र वेगवेगळें आहे. प्रहसनात्मक नाटकांत (ज्याला इंग्रजींत बर्लेस्क किंवा फार्स म्हणतात) मुद्दाम अतिशयोक्तीचा अवलंब करून काहीं गोष्टींचें विडंबन केलेलें असतें. असल्या नाटकांतून वास्तवतेचें खरें दर्शन होत नाहीं, त्याचप्रमाणें ज्याला सूक्ष्म स्वभावरेखन म्हणतात त्याचेंहि यांत दर्शन होणें दुर्लभ असतें. व्यक्तींचें, वस्तूंचें किंवा संस्थांचें विडंबन करून त्यांच्यांत सुधारणा घडवून आणण्याच्या उद्देशानें लिहिलेल्या नाटकांत इतर गंभीर गोष्टींची अपेक्षा करणें चुकीचें ठरेल. याच्या उलट गंभीर नाटकांत वास्तवतेचें दर्शन झालें पाहिजे. आयुष्यांत आढळणाऱ्या व्यक्तींचीं चित्रें त्यांत आलीं पाहिजेत. व्यवहारांतल्या व्यक्ती ज्याप्रमाणें वागतात त्याप्रमाणेंच गंभीर नाटकांतल्या व्यक्तीहि वागल्या पाहिजेत. ज्या भावनांचे संग्राम आपल्या संसारांत चालतात, त्यांचींच चित्रें हळुवार हातानें गंभीर नाटकांत रेखाटलीं गेलीं पाहिजेत. प्रमेयात्मक नाटकांत स्वभावरेखनांतील सूक्ष्मता आढळली नाहीं, तरी मुख्य

१ याशिवाय वीरवचन व गुरुदक्षिणा हीं दोन पौराणिक नाटकें यांनीं लिहिलीं आहेत.

प्रमेयाची मांडणी परिणामकारक व पटणारी झाली पाहिजे. प्रमेयात्मक नाटकात एरव्ही अपरिहार्य असणारा रूक्षपणा टाळण्याकरिता नाटकांत अर्थातच विनोदाची माफक पखरणहि व्हायला पाहिजे.

प्रहसनात्मक, भावनात्मक व प्रमेयात्मक अशा तीन प्रकारच्या नाटकांचें तंत्र आपल्यासमोर ठेवून अत्र्यांचीं नाटकें पाहिलीं असता आपणाला काय आढळतें ते पाहू या. प्रथम प्रहसनात्मक नाटकाच्या गटापैकीं नमुन्यादाखल साष्टांग नमस्कार हें नाटक घेऊ या या प्रहसनात साष्टांग नमस्कार, काव्य, व ज्योतिष यांचें फाजील वेड लागलेल्याची टिंगल उडविण्याच्या उद्देशानें मुद्दाम त्यांचीं अतिरंजित स्वरूपें रा. ब. शेषाद्रि, कवि भद्रायु व सिद्धेश्वर यांच्या रूपानें दाखविण्यात आलीं आहेत. नमस्काराचें व्रत मोडू नये म्हणून प्रवासात असताना गाडीच्या डब्यातहि नमस्कार घालणारे रावबहादुर शेषाद्रि, चंदूला दुखापत झाली असताना त्याला वैद्यकीय इलाज करण्याऐवजीं त्या प्रसंगावर आत्यंतिकपणानें काव्य करणारा भद्रायु, प्रेमाची मागणी करायला गेला असताना ज्योतिषदृष्ट्या वेळ प्रतिकूल आहे असें कळतांच प्रेमयाचना न करणारा सिद्धेश्वर या व्यक्ती अशाच स्वरूपात व्यवहारात आढळणें अर्थातच शक्य नाहीं. त्यांच्या जवळपास जाणाऱ्या व्यक्ती मात्र हरघडी आपणाला पहावयास सापडतात. काहीं वर्षांमागें महाराष्ट्रात साष्टांग नमस्कार, ज्योतिष व काव्यगायन यांचें वेडें पीक आलें होतें. त्याला आळा बसावा म्हणून प्रस्तुत नाटकात या तिन्हीं गोष्टींचें मार्मिक विडंबन करण्यात आलें आहे. उरलेल्या प्रहसनात्मक नाटकात अशाच प्रकारें मुद्दाम अतिशयोक्तीचा अवलंब करून विनोदाच्या साहाय्यानें सामाजिक वैगुण्यें नाहींशीं करण्याचा यशस्वी प्रयत्न करण्यात आला आहे. या नाटकातील पात्रांचें स्वभावरेखन सूक्ष्म किंवा भरीव नसलं तरी तें वैशिष्ट्यपूर्ण खचित् आहे. सर्व रोगांवर नमस्काराचा इलाज सांगणारे रा. ब. शेषाद्रि, पस्तीसाव्या वर्षापर्यंत कवींच्या शिरस्त्याप्रमाणें मृत्यु न आल्यास भाइंदरच्या तलावात आत्महत्या करण्याचा निश्चय केलेला कवि भद्रायु, उठल्यासुटल्या 'आमचे ग्रहसें ठीक नाहींत' म्हणणारा सिद्धेश्वर, औषधें खाण्याचें वेड लागलेला कचेश्वर, आत्कोपर्डें ... पनगारा गोकर्ण,

लग्नानें वेड लागलेल्या अवधूत, कोल्हापूरचा अभिमान बाळगणारे गणसाहेब अभाराम, यामिनीवर निस्सीम प्रेम करणारा विभीग, यामिनीवर प्रेम असूनहि रश्मीच्या नादीं लागलेला कांचन, मैत्रीविवाहाच्या मृगजळामागें धावणारी अरुणा व पराग, साध्या बोलण्याचा विपर्यास करून स्वतःवर अनुरक्त होणाऱ्या पुरुषाकडे कौतुकानें, कुतूहलानें व एक प्रकारच्या तटस्थतेनें पाहणारी परंतु जिच्याविषयीं पुरुषांच्या मनात गैरसमज उत्पन्न होतात अशी मोहक, अवखळ व नखरेल रश्मी, निष्पाप निर्भीड, फटकळ पण जीविताचें खरें स्वरूप व पुरुषाचा खरा स्वभाव ओळखणारी मालती—या सर्व पात्रांच्या ठिकाणीं फारशी सूक्ष्मता नसली तरी तीं अविस्मरणीय निःसंशय आहेत.

प्रहसनात्मक नाटकांचा थोडासा विचार केल्या नंतर आता भावात्मक किंवा गंभीर नाटकांचा विचार करूं या. घराबाहेर या नाटकात सासऱ्याच्या आणि सावत्र दीराच्या पापी वासनेला बळी न पडल्यामुळें त्यांनीं बदफैलीपणाच्या खोट्या आरोपावरून घरातून घालवून दिलेली निष्पाप निर्मला, पतीच्या प्रेमाकरिता नव्हे तर मुलाच्या प्रेमाकरिता, मातेचें कर्तव्य पुरें करण्याकरिता काहीं दिवसांनीं घरीं कशी परत येते, तें दाखविलें आहे. उद्याच्या संसारात आपल्यावरील जबाबदारी न ओळखता, स्वच्छंदवृत्तीनें वागणाऱ्यांचे उद्याचे संसार कोणत्या स्वरूपाचे होण्याचा संभव आहे तें दाखविलें आहे. 'जग काय म्हणेल' मध्यें बेजबाबदार नवऱ्याच्या दांभिकपणाला आणि दुष्टपणाला कंटाळून आर्थिक स्वातंत्र्य मिळविणाऱ्या तेजस्वी उल्केचें चित्र रेखाटण्यात आलें आहे. तिन्ही नाटकांतील विषय समाजाच्या जिव्हाळ्याचा वाटणारा असून, त्याची मांडणी बरीच बरीच यशस्वी झाली आहे. अनेक प्रकारचे हाल सोसूनहि स्त्री कोणाच्या ओढणीनें घरात राहते, अनेक प्रकारचे पाश तिनें धैर्यानें तोडले तरी कोणता पाश ती तोडू शकत नाहीं, याची मीमांसा घराबाहेर या नाटकात करुणोत्कट प्रसंगानीं करण्यात आली आहे. नाटकाचा तिसरा अंक या दृष्टीनें अत्यंत सरस आहे. निर्मलेची समजूत घालण्याच्या उद्देशानें पद्मनाभ भय्यासाहेबांच्या घरीं आला असताना म्हणतो,—"भय्यासाहेब, निर्मलाबाई या केवळ पतीच्या पत्नी

नसून एका अजाण बालकाच्या माता आहेत ही गोष्ट आपण आधीं लक्षांत घ्या. पतीपासून पत्नी दूर झाली तरी मुलापासून मातेला दूर होतां येत नाहीं. धर्माचे पाश तुटले, प्रेमाचे पाश तुटले तरी रक्ताचे पाश तुटणें कालत्रयींहि शक्य नाहींत ! समार हा कमळाच्या फुलांनीं आणि चिखलानें भरलेल्या सरोवराप्रमाणें आहे त्यात बुडणाऱ्या माणसाला एक वेळ त्या चिखलातून पाय बाहेर काढता येईल; पण त्या कमळाच्या कोमळ ततूंची पायाभोवतीं बसलेली मगरमिठी कधींहि सोडवितां येणे शक्य नाहीं." नाटकांतील हीच मध्यवर्ति कल्पना असून तिच्याच आधारावर घराबाहेर पडलेली निर्मळा घरीं परत गेल्याचे दाखविण्यात आलें आहे जरा वेगळ्या रीतीनें परंतु मातृत्वाचीच थोरवी उद्याच्या ससारात देखील गाण्यात आली आहे. स्वतः बेजबाबदारपणानें वागूनहि आपल्या मुलीला तिच्या हातून अज्ञानानें घडलेल्या दोषाबद्दल बॅ. विश्राम घरातून घालवून द्यायला उद्युक्त झाला असताना त्याची पत्नी "शैला बाहेर जाणार नाहीं, हें घर माझं आहे" असें म्हणून प्रथम त्याचा प्रतिकार करते व नतर म्हणते, "मातृत्व हे कधींही पापी नसत ! मातृत्व हे कधींहि अपवित्र नसत ! मातेचं रक्षण करण हं समाजाचें पहिलें कर्तव्य आहे ! मग ती माता विवाहित असो अगर अविवाहित असो." "जग काय म्हणेल" मध्यें उल्का बजावते, "जो पुरुष नको तो टळत नाहीं व जो पुरुष हवा तो मिळत नाहीं, हीच हिंदु स्त्रियांच्या आयुष्यातली घोर आपत्ति आहे ! एवढ्यासाठींच स्त्रियाना आर्थिक स्वातत्र्य पाहिजे आहे, आणि काडीमोडीचा कायदाहि हवा आहे !"

सग्राम किंवा झगडा हा नाटकाचा प्राण आहे घराबाहेर, उद्याचा ससार व जग काय म्हणेल या नाटकांतील समरप्रसग फारच कौशल्यानें रगविले आहेत. घराबाहेर नाटकाच्या पहिल्याच अकात आबासाहेब, नागेश्वर, नीळकठ व शौनक यांच्याशीं तडफदार निर्मळेचा झगडा होऊन ती तेथल्याच भरात मंगळसूत्र तोडून घराबाहेर पडते असें दाखविलं आहे. याच नाटकाच्या तिसऱ्या अकात भय्यासाहेब व निर्मला आणि भय्यासाहेब व पद्मनाभ यांच्यात खटका उडालेला दाखविला आहे उद्याचा ससार या नाटकात दांभिकपणानें व बेजबाबदार वृत्तीनें

सधार करणाऱ्या बॅ. विश्रामशीं करुणेचा हक्काच्या प्रेमाकरितां जन्मभर चाललेला झगडा दाखविला असून, त्याच्याच जोडीला उल्हास-शीला, शेखर-शीला व शेखर नयना यांच्यातील भावनाद्वंद्वहि व्यक्त करण्यात आले आहेत. जग काय म्हणेल मधील उल्का दिवाकर, वर्षा-दिवाकर, उल्का-तिलक यांच्यातील द्वंद्वाचीं चित्रें मनोवेधक आहेत. या बाह्य द्वंद्वाबरोबरच या तिन्ही नाटकांतील अंतर्द्वंद्वाचीं चित्र फारच बहारीचीं व हलुवार हातानें काढण्यात आलीं आहेत. निर्मला, शौनक, मल्हारराव, करुणा, शीला, शेखर, नयना, बॅ. विश्राम, उल्का, दिवाकर इत्यादि प्रमुख पात्रांच्या अन्तःकरणात चाललेल्या क्षोभांचीं चित्रें अत्यंत परिणामकारक वाटतात

अशाच्या प्रमेयात्मक नाटकांत वंदे भारतम् व मी उभा आहे या नाटकांचा अंतर्भाव होतो. हिंदुस्थानच्या उदार अखिल हिंदूंना समान भूमिकेवरून ऐक्यात सामावलेल्या असून हिंदुस्थानाला जो आपली मातृभूमि समजतो आणि हिंदुस्थान स्वतंत्र करण्यासाठीं ज्याचा आत्मा रात्रंदिवस तळमळतो तो हिंदु होय-या प्रमेयाची मांडणी दिलीवरनें कोटेश्वर मंदिर प्रवेशाच्या बाबतींत जो यशस्वी सत्याग्रह केला त्याच्याआधारानें चांगली झाली आहे. मी उभा आहे या नाटकांत "स्थानिक स्वराज्याच्या निवडणुका जोंपर्यंत व्यक्तिनिष्ठ पद्धतीनें लढविल्या जात आहेत तोंपर्यंत बेकायदेशीर साधनांचा अवलंब करून मतदारांची मतें उमेदवार मिळविल्याशिवाय राहणार नाहींत" या प्रमेयाची मांडणी अत्यन्त परिणामकारक झाली आहे. दोन्ही नाटकांत बहारीचें समरप्रसंग आले आहेत. सनातनी विरुद्ध परिवर्तनवादी, हिंदु विरुद्ध मुसलमान, या नेहमींच्या झगड्याबरोबरच सर गुरुनाथ आणि अलका या पितापुत्रींतील तसेंच सोमेश्वर आणि कल्याण या पितापुत्रांतील वैचारिक झगडा मोठा चुरशीचा वंदेभारतम् या नाटकात दाखविला आहे. मी उभा आहें, या नाटकांतील म्युनिसिपालिटीच्या निवडणुकीच्या वेळीं पक्षोपपक्षांत उडणाऱ्या क्षोभाबरोबरच गोवर्धनाची पत्नी गिरिजा ही त्याला निवडणुकींत विरोध करते, असें दाखविलें आहे. दोन्ही नाटकांतील स्वभावरेखन साहजिकच वरवरचें असलें तरी निरनिराळीं पात्रें वैशिष्ट्यपूर्ण वाटतात.

मराठी रंगभूमीच्या पडत्या काळांत प्रेक्षकांची नाडी पाहून अत्र्यांनीं प्रथम प्रहसनात्मक नाटकं लिहिलीं. या प्रहसनापैकीं साष्टांग नमस्कार व भ्रमाचा भोपळा हीं निःसंशय सरस असून, अखिल नाट्यसृष्टींतील कोणत्याहि उत्तम प्रहसनाशेजारीं तीं हक्कानें बसू शकतील. घराबाहेर, उद्याचा संसार, जग काय म्हणेल सारखीं भावोत्कट व समाजाच्या जिव्हाळ्याचीं नाटकें लिहून त्यांनीं मराठी नाट्यसृष्टींत स्वतःकरितां खास मानाचें स्थान निर्माण केलें आहे. अत्र्यांची नाट्यविषयक कामगिरी अजून संपलेली नाहीं. उद्याचा संसारासारखें शंभर टक्के कलापूर्ण नाटक निर्माण करून त्यांनीं रसिक प्रेक्षकांच्या त्यांनीं खूपच अपेक्षा वाढविल्या आहेत. या अपेक्षा पूर्ण करणें आचार्य अत्रे यांना मुळींच अशक्य नाहीं. तरीपण त्यांच्या हातून आतापर्यंत झालेली कामगिरीहि बहुमोलाची आहे. अल्पावधींत प्रहसनात्मक, भावात्मक व प्रमेयात्मक अशीं विविध स्वरूपाचीं नाटकें निर्माण करून मराठी रंगभूमीची त्यांनीं जी सेवा केली आहे ती रसिकांकडून नेहमींच कृतज्ञतापूर्वक उल्लेखिली जाईल.

## मो. ग. रांगणेकर

प्रल्हाद केशव अत्रे यांच्यानंतर मराठी रंगभूमि गेलीं वीस वर्षें जगविण्याचें श्रेय श्री. मो. ग. रांगणेकर यांनाच दिलें पाहिजे. नाट्यनिकेतन या नांवाची नाट्यसंस्था इ. स. १९४१ मध्ये विजयादशमीच्या मुहूर्तावर काढून व सौ. ज्योत्स्नाबाई भोळे, गणपतराव मोहिते ऊर्फ अविनाश, गजानन जागीरदार, कुसुम देशपांडे, विमल सरदेसाई इत्यादि चांगल्या नटनटींचें साहाय्य मिळवून आधुनिक पद्धतीचीं नाटकें प्रेक्षकांसमोर आणण्यांत रांगणेकरांनीं बराच विजय मिळविला आहे. आतापर्यंत त्यांनीं आशीर्वाद (१९४१), कुलवधू (ऑगस्ट १९४२), नंदनवन (नोव्हेंबर १९४२), कन्यादान (१९४३), अलंकार (१९४४), कोणे एके काळीं (१९५०), लिलाव (१९५५), धाकटी आई (१९५६), भटाला दिली ओसरी (१९५६), भाग्योदय (१९५७), इत्यादि नाटकें लिहिलीं आहेत.

रांगणेकरांच्या नाटकासंबंधीं साकल्यानें विचार केला असतां असें आढळतें

कीं, एका विशिष्ट परिस्थितीशीं टक्कर देण्याची दृष्टि आपल्यासमोर ठेवून त्यानीं आपलीं नाटकें आधुनिक तंत्राप्रमाणें लिहिलीं. त्यानी आपलीं नाटकें तीन तासाचीं लिहिलीं याला कारणें दोन एक थिएटराची उणीव आणि दुसरें बोलपटाचें आकर्षण. पूर्वीचीं लांब नाटकें करण्यासाठीं थिएटराची जी सपन्नता होती, ती कमी होऊन पूर्वीच्या नाट्यगृहाचें बोलपटगृहात रुपातर करण्याकडे थिएटर-मालकाचें लक्ष वेधलें. साहजिकच सुटीच्या दिवशीं सकाळीं नाटकें लावल्या वाचून त्याना गत्यतर नव्हतें. लोकाच्या बोलपटाच्या आवडीमुळें त्यानीं आपल्या नाटकात चित्तवेधक सुटसुटीत सवाद योजिले. नवीन परिस्थितींत पूर्वीसारखीं पुष्कळ मडळीं नाटक कपनींत ठेवून त्याचा सर्व प्रकारचा साभाळ घेणें दुर्घट असल्यानें, त्यानीं आपल्या नाटकात सात आठ किंवा दहा पात्रापेक्षा ज्यास्त पात्राची योजनाच केली नाहीं. बोलपटाप्रमाणेंच थोडक्यात विविधता आणण्याच्या हेतूनें त्यानीं आपल्या नाटकात बाल, तरुण, वृद्ध अशा निरनिराळ्या अवस्थेचे व गडी, कारकून, मास्तर, डॉक्टर, सिनेमानटी अशा पेशाचे स्त्रीपुरुष पात्राच्या ठिकाणीं योजिले.

त्याच्या नाटकात तत्राच्या बाबतींत बरीच अद्यतनता आहे. एक प्रवेशी अंक, स्वगतभाषणाची अनुपस्थिति, फ्लॅट सीन्सची योजना, स्त्रियाच्या भूमिका स्त्रियानीं करणें इत्यादि आधुनिक गोष्टी त्याच्या सर्व नाटकात आहेत. रगभूमि वास्तवतादर्शक करण्याच्या हेतूनें या गोष्टी आवश्यक असून, त्याच्या उपस्थितिमुळें रांगणेकराच्या नाटकांना आधुनिकता आली आहे ती योग्य आहे. ज्या इब्सेनी तत्राचा ह्या गोष्टी हा एक भाग समजला जातो, त्यात ससारातील किंवा जीवना तील कूट प्रश्न प्रेक्षकासमोर पूर्वांगस्थानिवेदनाच्या तत्राचा मदत घेऊन माडणें हें अत्यत महत्वाचें मानलें जातें नाटक हें साध्या ससाराचे चित्र नसून, ससारातील आणिबाणीच्या अटीतटीच्या प्रसगाचे चित्र असतें ससारातील वास्तवता जशी त्यात हवी, तशीच त्यातील उत्कटता रसराज हीहि हवी. रांगणेकराच्या नाटकात पूर्वांगस्थानिवेदन ' Retrospective Action ) आढ आहे कुलवधू नाटकातील भानुमती ( दुसऱ्या अकात ) कोणत्या विकट परिस्थितींत तिनें

सिनेमासृष्टीत पाऊल टाकलें तें सागत असताना याच तत्राचा उपयोग करते. 'नन्दन' नाटकात अशोक व मनोरमा याच्या संभाषणात पूर्वी घडून गेलेल्या गोष्टींचा असाच उल्लेख आला आहे. 'कन्यादाना' तील अहिल्या व 'अलकारा' तील वत्सला यांच्याहि भाषणातून पूर्वावस्थानिवेदन आलें आहे. परतु या पूर्वावस्थानिवेदनात जें उत्कटत्व, मत्यत्व व कारकत्व असावयास हवें, तें मात्र रागणेकराच्या नाटकात आढळत नाहीं. इब्सेनच्या नाटकाची हीच मख्खी आहे. तो आपल्या नाटकात भावनांचा प्रचड सग्राम दाखवितो. पण त्या संग्रामातील निम्म्याहून अधिक श्रेय पूर्वावस्थानिवेदनरूपी 'मार्टर फायर' ला देणें भाग पडेल. रागणेकराच्या नाटकात ससारातील काहीं प्रश्न नि.संशय आले आहेत. पण त्या प्रश्नात उत्कटत्व व विविधता हीं मुळींच नाहींत नवऱ्यानें बायकोला सोडून जाणें, किंवा बायकोनें नवऱ्याला सोडून जाणें, नवऱ्यानें दुसऱ्या स्त्रिचा विचार करणें—याच गोष्टी आलटून पालटून त्याच्या नाटकात च दरी आल्या आहेत. शिवाय ह्या ज्या घटना आहेत त्याचें चित्रण खेळकर, विनोदी, खुमासदार संवादानीं झाल्यानें त्याना एक प्रकारच्या पोरखेळाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. गल्या पधरा–वीस वर्षांत प्रसिद्ध झालेल्या बहुतेक सर्व नाटकात हा दोष आला आहे. या सर्व नाटकातील संवाद रागणेकराच्या नाटकातील सवादाप्रमाणेंच सुरसुरीत, अत्यन्त चुरचुरीत, अत्यत खुमासदार असे आहेत. नाटकातील सर्व पात्रें जणू काय एकाद्या पिकनिक पार्टीला निघाल्यासारखीं एकमेकाशीं अगदीं एकाच पातळीवर येऊन अल्लडपणें बेछूटपणें मोकळेपणानें बोलत असतात पतिपत्नी, पितापुत्र, धनिनोकर यांच्यातील संवाद कॉलेजच्या मधल्या सुटींत विद्यार्थ्यांत चालणाऱ्या सवादाप्रमाणें खुमासदार पण थिल्लर असे असतात. असले संवाद माझ्या मतें नाट्यविषयाच्या गाभीर्याला बाधक होतात. गडकऱ्यानीं चुरचुरीत सवाद योजिले आहेत. पण ते वेळस्थळ पाहून. आधुनिक नाटककार सवादाच्या पायीं वाहवत गेल्यासारखे दिसतात रागणेकराच्या नाटकातहि हा दोष बऱ्याच अशानीं आढळतो. त्याच्या नाटकात भावनाचें उत्कटत्व कमी आहे. पण जें काहीं आहे तें देखील या संवादानीं मारलें गलें आहे. नाटककार गडकरी

किंवा अत्रे यांच्यासारखा कुशल नाटककार नसेल तर सुरसुरीत आणि चुरचुरीत संवाद, गंभीर नाटकांना मारक ठरल्यावाचून राहत नाहीत. गडकऱ्यांनीं भावबंधनात आणि अत्र्यांनीं उद्याचा संसार या नाटकात खुमासदार संवाद योजूनहि नाटकाच्या गांभीर्याची हानि होऊ दिलेली नाहीं.

रांगणेकरांच्या नाटकात रसवत्ता किंवा भावनोत्कटता कमी असूनहि, त्यांचीं आशीर्वाद व कुलवधू सारखीं काहीं नाटकें रंगभूमीवर अत्यंत यशस्वी म्हणून गाजलीं आहेत यात शंका नाहीं. याचें कारण मला वाटतें त्यातील संवाद व संगीत हें होय. प्रेक्षकांची भरपूर करमणूक करण्याचें सामर्थ्य रांगणेकरांच्या चटकदार संवादात, त्याच्या ज्योत्स्ना भोळे यांच्या स्वर्गीय संगीतात दाचित् आहे. ह्या गोष्टींचा संयोग ज्या ज्या नाटकात होऊ शकेल, तीं तीं नाटकें द्रव्यदृष्ट्या यशस्वी झाल्या वाचून राहणार नाहींत. आणि ज्यात असा संयोग होणार नाहीं, तीं नाटकें फारशीं यशस्वी म्हणूनहि समजलीं जाणार नाहींत

स्वभावरेखन व स्वभावपरिपोष या गोष्टींकडे जितकें लक्ष पुरवावयास हवें तितकें रांगणेकरांनीं पुरविलें आहे असें म्हणवत नाहीं. त्यांच्या स्वभावरेखनात सूक्ष्मता व विविधता हीं येतांचीत आहेत. कुलवधू, नंदनवन व माऊलीआई या नाटकांतील पात्रांच्या स्वभावरेखनात सूक्ष्मता बरीच आढळते. बाकीच्या नाटकांतील पात्रें उथळ किंवा चित्रंर स्वरूपाचीं वाटतात.

## अनंत काणेकर

अनंत काणेकर यांनीं निशिकांताची नवरी (१९३८ ऑलिव्हर गोल्ड स्मिथ याच्या शी स्टूप्स टु कॉंकरचें रूपांतर), घरकुल (१९४१ इब्सेनच्या डॉल्स हाऊस नाटकाचें रूपांतर), फाटा (१९४९ डब्ल्यु ओ. सोमिनच्या अटेंशनचें रूपांतर), पतंगाची दोरी (१९५१ जेम्स बेरीच्या व्हॉट एव्हरी वुमन नोजचें रूपांतर), भाऊ (१९५४ जॉन गाल्सवर्दीच्या स्ट्राइफचें रूपांतर) अशीं रूपांतरित नाटकें व धूर (१९४१) हा एकांकिका संग्रह लिहून प्रसिद्ध केला आहे. एकांकिका स्वतंत्र

व अनुवादित आहेत. कानेकराच्या रूपांतरात आपल्या इकडच्या देशकाल परिस्थितीला धरून सर्व गोष्टी आल्यानें तीं स्वतंत्र सामाजिक नाटकासारखीं वाटतात. रंगभूमीला व नाट्यसाहित्याला वळण लावण्याचें काम या रूपांतरित नाटकांनीं काहीं अंशानी साधलें आहे. या शिवाय सोनेरी उन्हात, पाचूचीं बेटें सागर आणि इतर नाटिका त्यांनीं अलीकडे लिहिल्या आहेत.

## नाना जोग[1] Hamlet (Trans

नागपूरचे नाना ऊर्फ गणेश शिवराम जोग यानीं आपल्या वैशिष्ट्यपूर्ण नाटकांनीं मराठी नाट्यसृष्टींत मानाचें स्थान मिळविलें आहे. त्यांचीं नाटकें रत्याखुऱ्या अर्थानें सामाजिक, परिणामकारक व साहित्यिक गुणांनीं मंडित असतात. चित्रशाळा (१९४८), सोन्याचे देव (१९४९) व भारती (१९५२) या नाटकांत रंगविलेला समाज, आपल्या भोंवतीं वावरणारा असाच आपणाला वाटतो. अलीकडच्या काहीं नाटकांतून आढळणारा नवरा प्रेमाचा त्रिकोण जोगांच्या नाट्यसृष्टींत न आढळता, जीवनविषयक गंभीर समस्या त्यांत कलापूर्ण रीतीनें मांडलेल्या दिसतात. विनोदाकरिता योजिलेले थिल्लर व पांचकळ संवाद हें अलीकडच्या काहीं नाटकांचें वैशिष्ट्यच होऊन बसलें आहे. त्याच्या तुलनेनें जोगांच्या नाटकांतील संवाद बौद्धिकगुणांनी युक्त, सुटसुटीत व पात्रांचा स्वभाव व्यक्त करणारे असतात. सभोंवतालच्या समाजाकडे पाहत असताना नाटककाराला काहींतरी खुपतें आहे, खटकतें आहे, सलतें आहे आणि तो विचारमग्न झाला आहे, त्याला काहींतरी उत्तर सांपडलें आहे. पण तें तो आपल्या विचाराकरितां आपल्या समोर ठेवीत आहे, अशी कल्पना वाचकप्रेक्षकाची जोगांचीं नाटकें वाचीत किंवा पाहात असताना होते. अद्यावततन, प्रभावी व्यक्तिदर्शन आणि जीवनविषयक विशाल व सहानुभूतिपूर्ण दृष्टिकोन यानीं अलंकृत झालेलीं जोगांचीं नाटकें रसिकांना व विचारवंतांना नेहमींच आवडतील अशीं आहेत. त्यानीं केलेलें हॅम्लेटचें रूपांतर सरस आहे.

---

१ मृत्यु १ म १९५८ नागपूर येथें

## वि. वा. शिरवाडकर

सांगली येथें १९४३ सालीं झालेल्या नाट्यशतसांवत्सरिक उत्सवानंतर, रंगभूमीच्या क्षेत्रात यशस्वी रीतीनें कार्य करणाऱ्यात वि. वा. शिरवाडकर यांची प्रामुख्यानें गणना करावी लागेल. मुंबई येथील मराठी साहित्यसंघाच्या प्रेरणेनेंच साहित्यसंघाकरिता प्रामुख्यानें त्यांनीं दुसरा पेशवा (१९४४), दूरचे दिवे (१९४६), वैजयंती (१९५०), कौंतेय (१९५३) व राजमुकुट (१९५४) अशीं स्वतंत्र ऐतिहासिक, पौराणिक व रूपांतरित सरस नाटकें लिहून नाटककार या नात्यानें चांगलें नांव मिळविलें आहे. भव्य, सरस व परिणामकारक व्यक्तिरेखन, नाटकांतील सरर्षे, आणि ओजस्वी काव्यमय संवाद या वैशिष्ट्यांनीं त्यांचीं नाटकें वाचक प्रेक्षकांना आकर्षविणारीं ठरलीं आहेत. प्रस्तुत ग्रंथाच्या मर्यादित स्वरूपा-मुळें येथें त्यांचा संपूर्ण विचार करता येत नाहीं. तरी देखील 'दुसरा पेशवा या नाटकांतील बाजीरावाचें स्वभावचित्र व कौंतेय मधील कर्णाचें स्वभावचित्र हीं मराठी नाट्यसृष्टींतील भूषणें ठरतील, असें जातांजातांना म्हणावेंसें वाटतें. वैजयंती या रूपांतरित कल्पनारम्य नाटकांतील वैजयंतीची व्यक्तिरेखा परिणामकारक आहे. त्यांतील विविध प्रसंग भव्य, नाट्यपूर्ण व भावोत्कट आहेत. वैजयंतीच्या दिव्य व पवित्र प्रेमामुळें शत्रुपक्षाचा सेनापति रत्नाकर याच्याहि विचारांत बदल पडून, त्यानें आपला मूळचा वाईट हेतू कसा टाकून दिला तें यांत दाखविलें आहे. राजमुकुट हा शेक्सपियरच्या मॅकबेथ नाटकाचा रसनिष्ठ अनुवाद होय. यापूर्वीं या नाटकाचे दोन अनुवाद मानाजीराव (शिवराम महादेव परांजपेकृत) व डाकिनी विलास (एल्. एन्. जोशीकृत) प्रसिद्ध झाले आहेत. त्या अनुवादापेक्षा हा अनुवाद अधिक सरस व नाट्यपूर्ण आहे. या नाटकाचें दिग्दर्शन (ता. २० एप्रिल १९५४ रोजीं मुंबई येथें याचा प्रथम प्रयोग झाला) इंग्लंड मधील सुविख्यात नाट्यतज्ज्ञ व दिग्दर्शक हर्बर्ट मार्शल यांनीं केलें होतें. शेक्सपियरच्या काळीं जशी रंगभूमि होती, तशी बरीचशी त्यांनीं दाखविण्याचा प्रयत्न केला. नाट्यप्रयोगामध्यें सूचक नेपथ्य आणि सुयोग्य नादरचना यांची

योजना करण्यात आली होती. त्यामुळे हें मध्ययुगीन नाटक असूनहि, तंत्रदृष्ट्या प्रेक्षकांना अभिनव अतएव आकर्षक वाटलें. रंगभूमीच्या मागच्या बाजूला सिंहदुर्गाचा सेट कायम ठेविल्यानें रंगभूमीच्या मध्यतेत भरच पडली. मूळ नाटकात पाच अंक आहेत. पण प्रयोगाच्या वेळीं दोन प्रवेशात नाटक दाखविण्यात आलें. 'दूरचे दिवे' हें नाटक ऑस्कार वाइल्डच्या 'आयडियल हजबड' या नाटकावरून केलेलें हें 'मुक्त रूपातर' असून तें आपल्या इकडच्या राजकीय व सामाजिक परिस्थितीला साजेल असें आहे. एकातिक आदर्श हे दूरच्या दिव्यासारखे असतात, त्याच्या प्रकाशात आपण जीवनाची वाट चालून जाव, पण ते दूरचे आहेत याचा विसर होऊ देऊ नये, कारण कोणीहि मनुष्य आदर्शपदाला कधी पोहोचूं शकत नाहीं, तें या नाटकात दाखविलें आहे.

## पु. ल. देशपांडे

अनंत काणेकर, माधव मनोहर, वि. वा. शिरवाडकर इत्यादि नाटककारा प्रमाणें पाश्चिमात्य नाटकावर थोडीबहुत आधारलेली, परंतु आपल्याइकडच्या वातावरणाला व चालीरीतींना साजेशीं नाटकें श्री. पु. ल. देशपांडे यानीं लिहिलीं असून तीं प्रयोगदृष्ट्या अत्यंत यशस्वी ठरलीं आहेत. याशिवाय काहीं स्वतंत्र नाटकेंहि त्यानीं लिहिलीं आहेत. श्री. देशपांडे याच्या काहीं नाटकाचा छोटीं परीक्षणें या खालीं दिलीं आहे.

अंमलदार:—सुप्रसिद्ध रशियन लेखक निकोलाय व्ही. गोगोल यानीं रशियन क्रांतिपूर्व काळात झारच्या अमदानींत लिहिलेल्या 'दि गव्हर्मेंट इन्स्पेक्टर' ह्या नाटकाच्या कॉन्स्टेलकृत इंग्रजी रूपातराचें प्रस्तुत स्वैर रूपातर श्री. पु. ल. देशपांडे यानीं करून तें प्रकाशित केलं. मूळ रशियन नाटकाचें हे रूपातर इतकें सरस झालें आहे कीं तं स्वतंत्र नाटकासारखे वाटतें. कोठेंहि त्यात विजातीयता फारशी आढळत नाहीं. हिंदुस्थानाला स्वराज्य मिळाल्यावर संस्थानाचे विलिनीकरण झालें. विलीन झालेल्या संस्थानांपैकी एका मासलेवाईक संस्थानातील खोटें बोलणाऱ्या व लाचलुचपतखोर अशा अधिकाऱ्याच्या, त्याचा-

त्याच्या व इतरेजनांच्या वागणुकीचें उपरोधपूर्ण चित्र यांत रेखाटण्यांत आलें आहे. आपल्या खोटें बोलण्यांत किंवा लांच घेण्यांत कांहीं वावगें आहे असें यांना वाटतच नाहीं व त्या त्या गोष्टी सहजतेनें ते करतात. नाटकांत स्वभावनिष्ठ, शब्दनिष्ठ व प्रसंगनिष्ठ विनोदाचीं स्थळें पानोपानीं असून तीं रम्य आहेत. पात्रांचें स्वभावरेखन चांगलें सूक्ष्म व वैशिष्ट्यपूर्ण असून, संवाद खुसखुशीत व चटकदार आहेत. चार दिवस सुरंगवाडांत विश्रांतिकरितां राहिलेल्या एका इनामदाराच्या मुलावर सुरंगवाडांतील भोळसट लोकांमुळें अंमलदाराची भूमिका येऊन पडते व ती त्यानें अंमलदाराच्या रुबाबांत पार पाडली. अंमलदाराचें स्वभावचित्र अत्यंत स्वाभाविक व परिणामकारक आहे.

भाग्यवान्:—प्रस्तुत नाटकाची कल्पना नाटककारानें सांगितल्याप्रमाणें मॉमच्या 'शेपी' या नाटकावरून सुचली, तरी त्याची जडण घडण सर्वस्वी स्वतंत्र आहे. शिदबा रद्दीवाल्याला शब्दकोड्यांत तीस हजारांचें बक्षीस मिळालें असतांना, त्यानें त्याचा विनियोग स्वतःकरितां किंवा स्वतःच्या नातेवाईकांकरितां न करितां, गरीब जनांची फुकट बाळंतपणें करण्याकरितां एका प्रसूतिगृहाला रक्कम देऊन कसा केला (करविला) तें या नाटकांत दाखविलें आहे. स्वतःच्या सर्वस्वाचें समर्पण करणाऱ्या व आकाशाएवढें अन्तःकरण असलेल्या देवमाणूस शिदबा याचें स्वभावचित्र फारच मार्मिकपणें रंगविलें गेलें आहे. हक्क आणि कायद्याच्या भाषेची पोपटपंची करणाऱ्या व पैशाकरितां आपल्या भाची सासऱ्याला वेडा ठरविणाऱ्या श्रीपतरावांचें पात्र विरोधाकरितां रंगविण्यांत आलें असून, तेंहि वैशिष्ट्यपूर्ण आहे. प्रसंगीं भलेपणा देखील आत्मघातकी कसा ठरतो तें शिदबाच्या चरित्रावरून समजतें. सायकलीची चोरी करणाऱ्या एका इसमाला तो पकडून देतो आणि मागाहून त्याला कळतें कीं, ती चोरी तो त्याच्या बायकोच्या बाळंतपणाकरितां पैसे पाहिजेत म्हणून असहायतेनें करीत असतो! त्या इसमाच्या पोरक्या मुलीला-लतेला तिचा बाप तुरुंगांत असेपर्यंत तो नातीप्रमाणें सांभाळतो. पण ही गोष्ट त्या चोरी करणाऱ्या इसमाला माहीत नसल्यानें, तो तुरुंगांतून सुटतांच प्रथम शिदबाच्या छातींत सुरी खुपसतो! या शेवटच्या प्रसंगांत नाट्य भरपूर

असून, त्याची परिणति स्वाभाविकपणें करण्यांत आली आहे. डोक्यानें जगणारी श्रीपतरावासारखीं माणसे आणि अन्तःकरणानें जगणारीं शिंदवा, चंपा, सरस्वती-मारखीं माणसे यांच्यात संघर्ष दाखविला असून तो परिणामकारक आहे.

तुझें आहे तुजपाशीं :—हें तीन अंकी सामाजिक नाटक पु. ल. देशपांडे यांनीं लिहून ते जानेवारी इ. स. १९५७ मध्यें प्रसिद्ध केलें. या नाटकाचा प्रथम प्रयोग मुंबई मराठी साहित्य संघानें संघमंदिरात ता. २६ जानेवारी १९५७ रोजीं करून दाखविला. त्याचें दिग्दर्शन पु. ल. देशपांडे यांनींच केलें. कडक, दांभिक व दर्पयुक्त शिस्तीनें जीवनाचा अकारण कोंडमारा करणारे आचार्य पोफळे आणि जग सुंदर आहे असें म्हणून जीवन स्वाभाविकपणें पण शांतपणें जगणारे काकाजी यांची तुलना या नाटकांत दाखविली असून, थोरपणाच्या मार्गे लागलेल्याचें जीवन कसें कृत्रिम बनतें तें यात चांगलें दाखविले आहे. आचार्य, काकाजी, उषा, श्याम, डॉ. सतीश, गीता इत्यादि प्रमुख पात्रांचें स्वभावरेखन रेखीव व परिणामकारक झाल आहे. विशेषतः आचार्य, गीता, उषा यांच्या अंतःकरणात चाललेल्या द्वंद्वाचें चित्र अत्यंत सरस रेखाटण्यात आलें आहे. आचार्यांच्या दुःखाची कल्पना पुढील शब्दांवरून होते. "जग आपल्या गेलों कीं लोक विसरतील मला–मग सामान्याच सुख नाहीं आणि संन्याशाचा सत्कारहि नाहीं म्हणून सतत भाषण कर, सप्ताहात ला–मुलाखती दे–उपास कर–चित्तशुद्धींच्या जाहिराती दे—काहीं तरी करून माझ्या अस्तित्वाची जाणीव लोकाना पटवून दें—हेंच कार्य राहिल आयुष्यात —मोह जिंकला नाहीं मी बाळ—मोहावर शब्दांचें ढीगच्या ढीग रचून त्याला गाडण्याचा प्रयत्न केला." (पृ. ९२) एकाच वेळीं गंभीर आणि खेळकर असलेलें हें नाटक, वाचक प्रेक्षकाना अंतर्मुख बनवायला लावितें. कथानकरचना सामान्यपणें चांगली आहे. तिसऱ्या अंकाचा शेवट अत्यंत परिणामकारक आहे. त्यामानानें पहिल्या व दुसऱ्या अंकाचे शेवट जरा फिकट वाटतात. नाटकाची भाषा इंदुरी वातावरण चांगल निर्माण करते. 'समझला, तकलिफ होऊन राहिली आहे–यार' इत्यादि शब्दांवरून हें वातावरण सिद्ध होते. संवाद विनोदी, सुटसुटीत व पात्रानुरूप आहेत. विनोद शब्दनिष्ठ, प्रसंगनिष्ठ, स्वभावनिष्ठ असा विविध स्वरूपाचा

असून, तो बहारीचा व सोज्ज्वळ आहे. खरें सुख 'तुझें आहे तुजपाशी' हें पटवून देणारें हें नाटक सरस आहे. सुंदर मी होणार ( १९५८ ) या रूपांतरित नाटकांत सनातनी बाप व त्याची बंडखोर मुलें यांचा मनोरंजक झगडा दाखविला आहे. नवें गोकुळ हें श्री. देशपांडे यांचें नाटकहि उल्लेखनीय आहे. याशिवाय मोठे मासे आणि छोटे मासे, सार कसं शांत शांत या एकांकिकांत मानवीस्वभावाचें सूक्ष्म निरीक्षण व उपहास आढळतो. यांतील विनोद सरस आहे. सदू आणि दादू ही आधुनिक नाट्यतंत्रावरच नव काव्यावर आधारलेली उपहासिका आहे.

## सौ. मुक्ताबाई दीक्षित

सौ. मुक्ताबाई दीक्षित यांनीं जुगार ( १९५० ), अबोलिया ( १९५३ ) व अंधारांतून (१९५६) अशीं तीन सामाजिक नाटकें लिहिलीं असून, तीं रंगभूमीवर यशस्वी ठरलीं आहेत. नीटस रचना, सोज्ज्वळ वातावरण व चित्तवेधक स्वभावरेखन असलेल्या त्यांच्या नाटकांत एखादें तरी विचाराचें शिखर असतें आणि त्या दिशेनें कथानकाचा व स्वभावरेखनाचा ओघ वाहात असतो. उदाहरणार्थ 'जुगार' या नाटकांत विवाह मग तो कोणत्याहि पद्धतीनें केलेला असो एक प्रकारचा जुगार असतो आणि स्त्रीजातील गन्या सुखाचा लाभ मातृत्वानें मिळतो असा विचार प्रगट केला आहे, तर 'अबोलिया' नाटकांत "दुनिया निर्वैर झाली पाहिजे, बुद्धिवान शिस्तीपेक्षा प्रेमाचें धन असलें पाहिजे, आपण आपल्या मनाप्रमाणें वागायला शिका अन् दुसऱ्याला तशी परवानगी द्यायला शिका, वाट येईल तशी आनंदानें मागमानें पाठ फिरविली पाहिजे, चमकपणा आणि प्रतिष्ठितपणा हीं टोकें वर्ज्य करून मागमानें वागलें पाहिजे" इत्यादि विचार दर्शविले आहेत. भावनांची उत्कटता, नाट्यमयप्रसंगांची नीयता, स्वभावरेखनांतील भव्यता किंवा उदात्तता हे गुण मुक्ताबाईंच्या नाटकांत प्रकर्षानें नसले तरी त्यांचीं नाटकें प्रयोगदृष्ट्या यशस्वी ठरणारीं, नीटनेटकीं, सोज्ज्वळ व विचारगर्भ अशीं असतात.

## पुरुषोत्तम भास्कर भावे

पुरुषोत्तम भास्कर भावे यानीं थोडींच नाटकें लिहिलीं असलीं तरी तीं वैशिष्ट्यपूर्ण व नाट्यगुणानीं मंडित आहेत. ओजस्वी काव्यमय भाषा, चटकदार मवाद, रेखीव पात्रें, बाह्य व आंतरिक संघर्ष आणि एखाद्या प्रमेयाची मांडणी हीं सामान्यपणें त्यांच्या नाटकांचीं वैशिष्ट्यें असून त्यामुळें त्यांच्या नाटकांना एक प्रकारचा भरीवपणा आला आहे

निवकन्या :—हें चार अंकी सामाजिक नाटक श्री. पुरुषोत्तम भास्कर भावे यानीं इ. स. १९४३ मध्यें लिहून इ स. १९४४ मध्यें प्रकाशित केलें. साहित्यगुणानीं, नाट्यगुणानीं मंडित असलेल्या या नाटकांत विषया या नायिकेच्या स्वभावरेखनांतून, व्यक्तिचित्रणांतून, नाटककारानें एक धोक्याचा कंदील समाजापुढें धरला आहे. श्रद्धा, सेवा, त्याग, प्रेम, माणुसकी या शाश्वत जीवनमूल्यांचा विसर पडलेल्या आणि केवळ शारीरिक, वैयक्तिक सुखाच्या मागें लागलेल्या विषया आणि विलास यांच्या जीवनाची दुर्दशा, मनाची दुर्दशा कशी होते तें यांत दाखविली आहे. पुरोगामी विचारांच्या सुशिक्षित तरुणतरुणींपैकीं कांहीं जण कोणत्या विनाशाच्या मार्गानें जात आहेत, तें विषया व विलास या जोडीवरून समजतें. विषया, विलास, नीलकंठ (विशेषतः नीलकंठ) यांच्या मनांत चाललेल्या खळबळींचा अविष्कार परिणामकारक व जोरदार संवादाच्याद्वारें करण्यांत आला आहे. नीलकंठ आणि विषया (उर्फ उमा) यांचें स्वभावरेखन अत्यंत रेखीव, वैशिष्ट्यपूर्ण, जोरदार व परिणामकारक झालें आहे.

स्वामिनी :—(१९५६) लक्षाधीश, क्रीडापटु व कॉलेजियन अशा जगन्नाथा-भोंवतीं चित्रार आणि प्रेमवेड्या अशा तरुणींचा जमाव जमू लागला असतांना, त्यानें आपली स्वयंवराची अट प्रत्येकीला सांगून आणि त्या अटीला त्या न टिकताच दोनटीं साध्या व सोंध्या कार्याला प्रेमाची कसोटी म्हणून आपल्या मोटारवर सुरी मागायला कशी सांगितली आणि ती त्या कसोटीला उतरताच तिचा

स्वामिनी म्हणून कसा स्वीकार केला तें या नाटकात दाखविलें आहे. अगदी अलीकडे त्यांनीं पडछाया (१९६०) हें नाटक प्रसिद्ध केले असून त्यांत केदारनाथाच्या श्रीमंतीला भाळलेली हेमा आणि माणुसकीला भाळलेली त्यागशील गौरी यांच्यातील संघर्ष चांगला दाखविला आहे

कॅ मा कृ शिंदे यांनीं नडखोर कुमारी, गृहलक्ष्मी, गुनागुत, बनारस नायका, अर्थाचा अनर्थ, आंदोलन, सोन्याचा दिवस, मातृदेवोभव, नाजुक नवरा व संत जनाबाई सारखीं पौराणिक व सामाजिक नाटकें लिहिलीं असून, त्याचे प्रयोगहि झालें आहेत. सामान्यपणें एखाद्या सामाजिक विषयावर रचलेलीं कॅ शिंदे यांचीं नाटकें प्रयोगदृष्ट्या यशस्वी व कथानकरचना, स्वभावपरिपोष, संवाद, विनोद व भाषाशैली या दृष्टींनी बऱ्यापैकीं आहेत.

## वसंत दुदवडकर

वसंत दुदवडकर यांनीं सोन्याचा संसार, माझं लग्न, संग्राम, कुटुंब, गोळी पाहिजे, श्रीमंत, माझा गांव, जगावेगळा इत्यादि नाटकें लिहिलीं असून तीं सामान्यपणें बऱ्यापैकीं आहेत मध्यम स्थितींतील, गरीब स्थितींतील लोकांच्या जीवनावर आधारलेलीं हीं नाटकं असून, त्याचें चित्रण बरेच वास्तवतापूर्ण असें असतें. प्रत्येक कुटुंबात कांहींतरी बेबनाव असतो आणि तो त्या कुटुंबांतील सोशीक, त्यागी, प्रेमळ अशा एखाद्या स्त्रीमुळें तीव्र स्वरूप घेऊं शकत नाहीं असें या नाटकांतून प्राय दाखविलें जातें. 'सोन्याचा संसार' यामधील काशी नावाची बहीण, 'संग्राम' मधील इन्स्पेक्टर केदारनाथाची बायको सुशील, 'कुटुम्ब' नाटकांतील पार्वतीवहिनी, 'श्रीमंत' नाटकांतील कमल, हे अशाप्रकारच्या स्त्रियांचे नमुने होत दुदवडकरांच्या बहुतेक नाटकांतून संघर्ष व कृती यांचें प्रमाण चांगलें असतें. पात्रांच्या तोंडीं योजिलेल्या भाषेचा कांहींसा ओबडधोबडपणा व कथानकांतील थोडासा भडकपणा वगळल्यास दुदवडकरांचीं नाटकें वर सांगितल्या प्रमाणें बऱ्यापैकीं आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. भरेनहादर (१९६०) हा त्यांनीं लिहिलेला फार्सहि बऱ्यापैकीं आहे

## आचासाहेब आचरेकर

आचासाहेब आचरेकर यानीं मी राजा आहे, मुजलाम् मुजलाम्, तो फाशी गेला, रणकंरण, अपराधी, गाववाले इसतील, सैनिक, अमर झाले राजे, भागतील तुलस (१९५९), घराणे, भाकरी इत्यादि छोटी मोठीं नाटकें लिहिलीं असून, अजूनहि ते नवीं नवीं नाटकें लिहीत आहेत. एखादें समाजोपयोगी तत्त्व सांगण्याकरिता आचरेकर आपलीं नाटकें सामान्यपणें लिहीत असल्यासारखे दिसतात. त्यांच्या नाटकात सतत कांहीं तरी घडत असलेले दाखविल्याने, तीं रंगभूमीवर प्रेक्षकांना आवडत असतील.

## ला. कृ. आयरे

ला. कृ. आयरे यानी किर्यार, मायेचा बाजार, बुद्धिभेद, नवऱ्याची गोष्ट, जुलूम, हास माणूस, शेतकरी दादा, मंगल दिव्य, माय माउली, अमरत्याग, ईर्षा जया अंगी मोठेपण, स्वराज्यानि, कुलकलंक, अमरत्याग, वडील माणस, कसोटी इत्यादि नाटकें लिहिलीं असून त्यात त्यांनी प्रायः शेतकरी-कामकरी वर्गातील स्त्रीपुरुषांच्या जीवनातील संघर्षाचे प्रसंग दाखविले आहेत. भाषेचा कांहींसा ओबडधोबडपणा व प्रसंगाचा अतिरंजितपणा हे दोष वगळल्यास आयरे यांचीं नाटकें बऱ्यापैकीं आहेत. रंगभूमीच्या दृष्टीनें पाहता त्यांचीं नाटकें बऱ्याचशी जुन्या तंत्राप्रमाणें लिहिलेलीं आढळतात. असे असलें तरी तीं रंगभूमीवर आलीं आहेत व कांहीं काळ त्यांनी विशिष्ट लोकांचें मनोरंजन व उद्बोधन केलें आहे. त्यांच्या नाटकांपैकीं कांहींच्या अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत त्यावरून त्यांची लोकप्रियता अजमाविता येते.

## बाबुराव गोखले

नाटकें रचताना बाबुराव गोखले यांची मनोभूमिका माधवराव जोशी यांच्या सारखी म्हणजे प्रेक्षकांचें मनोरंजन करण्याची दिसते. पेल्यातील वादळ या आपल्या नाटकाच्या प्रस्तावनेंत ते म्हणतात, " प्रेक्षक नाटक पहावयास आला

असता प्रसन्न मनानें त्याला घरीं पाठविण्याचा एडिंन नाटककाराचें व त्या नाटकांत भूमिका करणाऱ्या नटाचें कर्तव्य असतें. तें कर्तव्य पार पाडण्याचा प्रयत्न मी आणि के. नागरंग नाट्यसंघानें कसोशीनें केला आहे." पेल्यातील वादळ (१९४२), करायला गेलो एक (१९५५) व समोर पहावा मोहन (१९५६) ही तिन्ही नाटकें त्यांच्या गुणांचा पाठपुरावा करीत आहेत.

## विजय तेंडुलकर

अल्पावधीत व एक–दोन नाटकांत रसिक वाचक–प्रेक्षकाचें लक्ष वेधून घेणाऱ्या नाटककारांत श्री. विजय तेंडुलकर यांचें नांव प्रामुख्यानें घ्यावें लागेल. त्यांचें पहिलें नाटक 'गृहस्थ' हें प्रहसनवजा नाटक अद्यापि प्रसिद्ध झालेलें नाहीं. मराठी साहित्य संघाच्या १९५३ सालच्या नाट्यमहोत्सवात हें करून दाखविण्यात आलें. परंतु तितकेसें तें यशस्वी ठरलें नाहीं. त्यानंतर त्यांनीं श्रीमंत (१९५५) व माणूस नांवाचें बेट (१९५६) अशीं दोन नाटकें लिहिलीं. या दोन्ही नाटकांनीं त्यांना कीर्ति मिळवून दिली यात शंका नाहीं. याशिवाय 'ओळख', 'रात्र', 'बाबूशा', 'चार दिवस' अशा एकांकिकाहि त्यांनीं लिहिल्या असून, त्यापैकीं कांहींचे यशस्वी प्रयोगहि झाले आहेत. सामाजिक जिव्हाळ्याचे प्रश्न घेऊन, त्यावर भावोत्कट व नाट्यपूर्ण नाटकें लिहिण्याची कला श्री. तेंडुलकरांना चांगली साधली आहे. कथानकाची रचना ते इतक्या सफाईनें करतात कीं वाचक प्रेक्षक कथानकाच्या शेवटापर्यंत उत्कंठेनें व आनंदानें जातो. त्यांचे संवाद भावोत्कट व सुटसुटीत असतात. त्यांचीं पात्रें सजीव, वास्तवतापूर्ण व स्वत्वपूर्ण वाटतात. मधल्या भिंती (१९५८) यातील भावगर्भ संवाद उल्लेखनीय असून सासू व सून यांतील संघर्ष पाहण्याजोगा आहे. अंधेरीनगरीतील कटाळा दिन ही त्यांची नाट्यकृती बऱ्यापैकीं आहे. चिमणीचें घर मेणाचें हें प्रतीकात्मक सुंदर नाटक यांनीं १९६० सालीं लिहिलेलें सफाईदार नाटक आहे.

## बाळ कोल्हटकर

श्री. जयराम शिलेदार यांच्या 'मराठी रंगभूमि" या नाट्यसंस्थेतर्फे श्री. बाळ कोल्हटकर यांचीं मुंबईचीं माणसें, एखाद्याचें नशीब, स्वप्नमंगला, प्रतिष्ठित

भामटे, मला निवडून द्या, आकाशगंगा (१९५८) इत्यादि पौराणिक व सामाजिक नाटकें होत असून त्यांपैकीं बरींच प्रयोगदृष्ट्या लोकप्रिय झालीं आहेत. श्री. बाळ कोल्हटकर हे स्वतः नट असल्यानें व इतर अनुभवी नटांचें त्यांना मार्गदर्शन लाभल्यानें प्रयोगाच्या दृष्टीनें नाटक कसें लिहावें हें त्यांना चांगलें समजतें. सुटसुटीत व चुरचुरीत संवाद, प्रसादपूर्ण पद्यें व विनोदी नाट्यपूर्ण घटना यांच्या जोरावर त्यांचीं नाटकें प्रयोगदृष्ट्या यशस्वी ठरलीं आहेत. ललितकलादर्श करीत असलेलें आकाशगंगा हें नाटक कलात्मक असून, त्यांत आकाशगंगेवरील पवित्र वातावरण पृथ्वीवरील एक राजकीय पुढारी तेथें जाताच कसें दूषित झालें तें दाखविलें आहे. आकाशगंगा नाटकांतील दृश्यें चित्तवेधक व वातावरणाला साजेल अशीं आहेत. पु. श्री. काळे यांचें नेपथ्य वाखाणण्याजोगें आहे. दुरितांचें तिमिर जावो (१९५७) या नाटकांत समाजानें दगड व वेडा ठरविलेल्या एका देव माणसाची करुण कहाणी आहे. यांतील दिगूचें पात्र अविस्मरणीय आहे. वेगळं व्हायचंय मला हें नाटक त्यांनीं अलीकडेच लिहिलें आहे.

वर उल्लेखिलेल्या मुख्य नाटककारांखेरीज ज्यांची नाट्यविषयक कामगिरी निर्देशनीय आहे अशा नाटककारांत छलादेवीकर्ते बा. या. भोळे, युगांतरकर्ते ना. सी. फडके, थाककर्ते न. ग. कमतनूरकर, पतीची सूनकर्ते गणेश कृष्ण शास्त्री फाटक, जुगारी जगकर्ते वि. गो. शेटये, दुरंगी दुनियाकर्ते कृ. ना. अस्नोडकर, राजाला गजाकर्ते द. ग. सारोळकर, माईसाहेबकर्ते ना. वि. कुळकर्णी, पटवर्धनकर्ते गो. स. टेंबे, स्वर्गावर स्वारीकर्ते स. अ. शुक्ल, महाकुमारीकर्ते वेडेकर, पहिला पांडवकर्ते शिवरामपंत परांजपे, सुप्रसिद्ध बेबंदशाहीकर्ते वि. ह. औंधकर, अर्ध्या वाटेवरकर्ते इ. वि. देसाई, हिरा हरपलाकर्ते शा. गो. गुर्जे, समरधुरंधरकर्ते श्रीधर कृष्ण ओक, डॉ. वर्टीकृत राणीचा बाग, भा. वि. नाडकर्णीकृत मधाचे मोहोळ आणि प्रेममूर्तीची आराधना हा विषय असलेल्या भावपूर्ण संगीतप्रधान आराधना (१९६०) नाटकाच्या लेखिका सुप्रसिद्ध अभिनेत्री सौ. ज्योत्स्नाबाई भोळे, संगीत सांवळ्या तांडेल (१९४७), संगीत खुनी सभा (१९५७) या नाटकांचेकर्ते पा. तु. फाळगावकर जन्म ४-१०-१९११. विशपुराहून सुटका या ऐतिहासिक

व उत्तराविवाह या पौराणिक नाटकाचेकर्ते गो. ना. आपटे; आकाशपुष्प व आधुनिक मस्तानी या नाटकाचेकर्ते सी. म. आपटे; प्रीतिविवाह या नाटकाचेकर्ते वा. कृ. भावे; गृहदाह व परक्याचें धनकर्ते डॉ. गो. के. भट; आई, सशाचीशिंगे कर्ते माधव मनोहर; फुलपाखरें, देवमाणूस, मेल्यांचा दगड, विजय, अंतरपाटकर्ते नागेश रामचंद्र जोशी (मृत्यु मे १९५८ पुणें येथे), लाखेचें मणीकर्ते अच्युत बर्वे; सोनेरी चौकट व तारु लागलें किनारीं कर्त्या शशिकला आठंकर; रक्तांचें नात, पत्नीचा स्नूष, लाडकी लेक(१९५९) कर्ते म. मा. भोसले; पैसे झाडाला लागतातकर्ते दिनकर पाटील; कल्पनारम्य 'देवाचे मनोराज्य' व वेड्याचें घर उन्हातंकर्ते वसंत कानेटकर (यात स्वर्ग, पृथ्वी वगैरेची उत्कृष्ट दृश्यें आली आहेत), धुळीचा कण (१९५९) कर्त्या सौ. सुमतीबाई धनवटे; पट्टे बापुरावकर्ते ल. ना. भावे; तिन गड्यांची खिडकीकर्ते बाळ कुरतडकर व गंगाधर महांबरे; उदयकर्ते मंगेश पत्की; अलका टॉकिज, सेवाकर्ते प्र. श्री. कोल्हटकर; स्त्रीकर्ते हरि विनायक दाडेकर; गौराबाई व वेदीचा लग्नकर्ते वसंत बापट; प्राणप्रतिष्ठा, बुवाबाजी, विद्यार्थी, महारवाडा, सैरंध्री, झाशीची राणी इत्यादि नाटकाचेकर्ते ग. वि. उर्फ नानासाहेब गोखले (मृत्यु ७१ वे वर्षी २ ऑक्टोबर १९६०); उ:शाप व सन्यस्त खड्गकर्ते स्वातंत्र्यवीर सावरकर; लोकांचा राजाकर्ते चिं. य. मराठे, जगन्नाथाचा रथ व पन्हाळगडचा थोंडी (१९६०) कर्ते गो. नि. दांडेकर, फुट पाखरीकर्ते सूर्यवंशी; बाधा (१९५५) कर्त्या सरीता पत्की; स्वप्नीचें धनकर्ते दा. गो. साठे, अशारा रेखाकर्ते गो. ग. पारखी; पुरुषोत्तम (१९५९) कर्ते मो. स. साठे; २६ जानेवारी कर्ते र. दा. दिवेकर; मराठ्याचें सिंहासनकर्ते मुंगरीकर, वाट चुकलीकर्ते नामदेव व्हटकर; अशीच एक रात्र येतेकर्ते प्रभाकर ताम्हणे, उर्मिलाकर्ते जगन्नाथ गोखले, कक्षा कर्त्या तारा वनारसे; कांचनमृगकर्ते गोपाळराव कुलकर्णी, तिकीटकर्ते रंगनाथ कुलकर्णी, पंडितराज जगन्नाथ (ऐतिहासिक) सुवर्णतुला (पौराणिक) साक्षीदार इत्यादि वैशिष्ट्यपूर्ण व काव्यमय नाटकाचेकर्ते विद्याधर गोखले, मुद्राक्या साजल्याकर्ते म. दि. माडगूळकर; अमृत घट तुझ्या घरीकर्ते मधुकर अदीकर, एकाच माळेचे मणीकर्ते वि. वि. जोशी,

'नाताचे मोठे' (१९५८) कर्ते गो. ग. जोशी; नव्या डहाळ्या, नवें सोपेकर्ते शरश्चंद्र टोंगो; साक्षीदारकर्ते विद्याधर गोखले; चंद्र नभींचा ढळला (फ्रेंच नाटककार आल्बर्ट कामू याच्या कॅलीगुली या नाटकावर आधारलेलें नाटक) कर्ते पुरुषोत्तम दारव्हेकर इत्यादि नाटकें व नाटककार रंगभूमीचें वैभव वाढविणारे आहेत.

## आधुनिक वग व प्रहसनें

गेल्या पाचदहा वर्षांत इतर कलांप्रमाणे लेखन करून लोकभोग्य बनविण्याच्या हेतुनें जे प्रयत्न चालू आहेत त्यांत तमाशांतील वगांना, प्रहसनांना, फार्सांना एक स्थान द्यायला हरकत नाहीं. ठिकठिकाणीं कलापथकें निघून त्यांच्या द्वारें जसा पोवाडे, लावण्या व पद्ये यांचा प्रसार होत आहे तसा वगांचाहि प्रसार होत आहे. सुप्रसिद्ध लेखक अण्णाभाऊ साठे (जन्म १ ऑगस्ट १९२०) यांच्या लोकनाट्यकला पथका मार्फत त्यांच्या दोन वगांचे (दे. म. घोटाळे व खापऱ्या चोर) यशस्वी प्रयोग होत असतात. या वगांची साहित्यिक पातळी उच्च नसली तरी बहुजनसमाजाला मनोरंजनद्वारा शिक्षण देण्यांत या वगांचा चांगला उपयोग होत आहे. याच संदर्भात श्री. वसंत प्रभूंच्या फार्सांचाहि अंतर्भाव करायला हरकत नसावी. झोपी गेलेला जागा झाला (१९५८) हा त्यांचा फार्स रंगभूमीवरील सिनेमांतील अभिनयासारख्या अभिनयाच्या जोरावर यशस्वी झाला असून सामान्य प्रेक्षकाची चांगली करमणूक करतो. हा एका इंग्रजी प्रहसनावर आधारलेला आहे. यांतील घटना खदखदून हसविणाऱ्या आहेत. चोरावर मोर व माकड आणि पाचर हेहि त्यांचे फार्स रंगभूमीवर यशस्वी ठरले आहेत. शाहीर साबळे आणि पार्टीचा यमराज्यातील एक रात्र हा मुक्त-नाट्याचा प्रकार चांगलाच लोकप्रिय झाला आहे. यांत नफा प्रेमी व्यापारी, निवडणुकीच्या निर्णयाकरिता तळमळणारे देशभक्त इत्यादि व्यक्तींचें नमुने प्रेक्षणीय आहेत. भाऊ बापू नारायणगावकरांचा "चंद्रमोहन" हा वग अत्यंत प्रेक्षणीय आहे.

## रंगभूमि आणि समाज

नाटक हें संसाराचें चित्र असल्यानें त्यात सभोंवतालच्या समाजाचें-समाजाचें चित्र उमटावें यात नवल नाहीं. मराठी रंगभूमि ही तिच्या जन्मकाळापासून समाजाभिमुख असलेली आढळते. विष्णुदास भावे सुरुवातीला कळसूत्री बाहुल्यांचे खेळ दाखवीत. असल्या एका खेळात त्या काळीं समाजाच्या चर्चेचा विषय बनलेल्या " ढोंगी महंताची नक्कल " दिलेली आढळते. चिमणी नानाची विवाहित स्त्री आपल्या पतीची नजर चुकवून बुवाना भेटायला कशी आली आणि मागाहून तिचा पति बडगा घेऊन कसा आला तें या काळसूत्री बाहुल्यांच्या खेळात दाखविलें आहे. महाराष्ट्रात स्त्री शिक्षणाचा प्रश्न घरोंघरीं चर्चेचा विषय झाला असताना, त्यावर वासुदेव मोरेश्वर पोतदार यांचें सुशिक्षित स्त्री (१८८६) व ना. बा कानिटकर यांचें सुप्रसिद्ध तरुणीशिक्षण नाटिका (१८८६) अशीं दोन नाटकें प्रसिद्ध झालीं. तरुणीशिक्षण नाटिकेनें ज्याप्रमाणें स्त्रियांच्या शिक्षणाची दर उडविली, त्याप्रमाणें 'मोर एलएल बी.' प्रहसनानें उच्च शिक्षणानें पुरुषाला कलैब्य येतें असें सुचवून सुशिक्षिताची टिंगल केली. पुनर्विवाहाच्या प्रश्नावर अनेक नाटकें लिहिलीं गेलीं. इ. स. १८७० मध्यें पुण्यात या विषयावर शास्त्री मंडळीचा जंगी वाद झाला होता त्यानंतर लागलीच र. शा अभ्यंकराचें प्रबोधनिपुण किंवा स्वैरसंचेष्टा (१८७१) व म बा. चिपळूणकर याचें मनोरमा (१८७१) अशीं दोन नाटकें प्रसिद्ध झालीं अण्णा मार्तंड जोशी यांच्या संगीत सौभाग्यरमा (१८९०) नाटकात नायिका रमा हिच्यावर आलेल्या वैधव्यदु खाचें चित्र दाखवून सुप्रसिद्ध सुधारक विष्णुशास्त्री पंडित यांच्या प्रोत्साहनानें तिचा एका कर्तृत्ववान तरुणाबरोबर पुनर्विवाह झाल्याचें वर्णिलें आहे. याच विषयावर श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचें मतिविकार (१९०६), राम गणेश गडकरी याचें प्रेमसंन्यास (१९१२) हीं नाटकें रंगभूमीवर चमकलीं. हुंडा घेण्याच्या चाली विरुद्ध हुंडा मदमन (१८८८) व हाच मुलाचा बाप (१९१६) अशीं नाटकें झालीं जरठ तरुणीविवाहाच्या बाबतींत पु मा. डोंगरेकृत जरठोद्वार १८९०) व गो. ब देवलांचें सुप्रसिद्ध शारदा (१८९९) हीं दोन नाटकें रंगभूमीवर आलीं मराठान

साजपणा हे कोल्हटकर–गडकऱ्यांचे विशेष होत. वास्तवता हा चिंतामणरावांच्या विनोदाचा प्राण आहे. समाजात आढळणाऱ्या अनेक विरोधी, उपरोधिक, दोषपूर्ण घटनांचे यथातथ्य चित्रण त्यांच्या विनोदी कथांतून आढळते. डॉक्टर, वकील, शिक्षणशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ, इतिहाससंशोधक, सरदारनिक, विमाएजंट, लग्न जुळविणारे, रेल्वेचे नोकर, घरगुती नोकर इत्यादि समाजातील सर्व व्यक्तींची चित्रे त्यांच्या कथांत आल्याने त्या कथांतून सपन्न व विविध बनल्या आहेत. समाजातील अनेक सोंगाढोंगांचा समाचार त्यांनी आपल्या विनोदी कथांच्याद्वारे घेतला आहे. असे करताना त्यांनी मार्मिकपणा दाखविला असला, तरी कोठेहि मर्मभेदकपणा दाखविलेला नाही. चिमणराव स्टेट गेस्ट, स्टेशनस्टाफची मेजवानी, एम्प्रसाई, प्रु. शिंदे, आय सी. एस; माझे ठवक वकील, वर संशोधन, अखेरीस जमले, गुलाब, घोळघाण; शुंड्याभाऊंचे दुखणे, घरगुती नोकरांचा प्रश्न, स्पष्ट वक्तेपणाचे प्रयोग इत्यादि त्यांच्या कथा वाचल्या असताना शुद्ध व सात्विक अशा प्रसंगनिष्ठ व स्वभावनिष्ठ विनोदाची उदाहरणे जागोजागी आढळतील. मनुष्य स्वभाव व मानवी जीवन यांच्या वास्तवतापूर्ण चित्रणावर आधारलेल्या त्यांच्या विनोदी कथा म्हणजे मराठी वाङ्मयाचे एक बहुमोल भूषण होय.

ना धों. ताम्हनकर (मृ. १९६१) यांनी 'दाजी'च्या विनोदी कथा लिहून मराठी साहित्यात मोठीच भर टाकली आहे. प्रामाणिक, सत्यप्रिय, लोकसेवक, रूढिविध्वंसक दाजीच्या कथा म्हणजे ते एक मराठी वाङ्मयाचे भूषण आहे. दाजीचें वागणें, बोलणें, रुसणें चाकोरीबाहेरचे असल्याने स्वभावनिष्ठ विनोदाबरोबरच प्रसंगनिष्ठ विनोदहि जागोजागी तयार होतो. दाजीची एक एक गोष्टहि स्वतंत्रपणे वाचनीय आहे. परंतु सर्व कथांतून त्यांचे जे चरित्र तयार होते ते विशेष मनोहर असे आहे. ताम्हनकर यांच्या 'निवाडे' या पुस्तकात एकदर बारा गोष्टी असून त्या सर्व यमधर्मासमोर केलेल्या निवेदनाच्या रूपाने आहेत. समाजात व्यक्तींच्या हातून कळत किंवा न कळत जे सामाजिक अपराध होतात, त्यांचा जबाब त्यांना यमधर्मासमोर द्यावा लागतो असे या निवाड्यांत दाखविले आहे. या कथांत सूक्ष्म विनोद व उपरोध जागोजागी भरला आहे. 'दाजी' प्रमाणेंच

'ताल्या' हें पात्र निर्माण करून ताम्हनकरांनीं त्याच्याहि अनेक कथा लिहिल्या आहेत. मात्र 'ताल्या' हें पात्र दाजीपेक्षा सर्वस्वी भिन्न आहे. ताल्या हा नरराक्षस असून आपल्या आप्तस्वकीयांना छळणें हा त्याचा स्वभावधर्म आहे. 'दाजी' हा अकारण स्नेहाचा नमुना मानला तर 'ताल्या' हा अकारणद्वेषाचा नमुना मानता येईल. त्यांच्या 'मामा' या पुस्तकात गणमामा बनलेल्या एका शाळामास्तरचे मजेशीर अनुभव दिले आहेत.

प्रल्हाद केशव अत्रे यांच्या 'ब्रँडीची बाटली', 'गुत्त्यांत नारद', 'ज्ञानेश्वर दंतमंजन', आम्ही सात जण आणि ती 'मास्तर आणि पोलीस', 'हास्यकथा' इत्यादि कथांत विनोद आणि भावना यांचें मनोहर मिश्रण पाहावयास सापडतें. हास्य आणि करुणरस हातांत हात घालून "ब्रँडीची बाटली" या कथेंत वाचकांना आढळतात. भोळेपणा-मामेपणा अज्ञान निष्पापवृत्ति यामुळें निंबकराव फारकुनावर आलेल्या अनेक प्रसंगांत विनोद जसा भरपूर आहे, तसाच आणि त्या विनोदामागे करुणरसहि आहे. 'पाठीवरचे वळ' या कथेंत भावोत्कटता व उपरोध हीं दोन्ही आहेत. शब्दनिष्ठ, कल्पनानिष्ठ विनोदानूनहि निंबकराव, बगाराम, पुणेरी टांगेवाल्यासारखीं चांगलीं स्वभावचित्रेंहि अत्र्यांनीं निर्माण केलीं आहेत 'मराठपुडा' या संग्रहाच्या दुसऱ्या भागात 'लहानाच्या मोठ्यासाठीं गोष्टी' ज्या आल्या आहेत त्यांत उपरोध-व्याजोक्ति इत्यादि साधनांनीं शिक्षणशास्त्र व मानसशास्त्र यांच्यांतील कांहीं मूलभूत सिद्धांत व्यक्त केले आहेत. 'समुद्राची देणगी' या कथेंतील रुस्तुमसाहेबाचें स्वभावचित्र जितकें कारुण्यमय तितकेंच अविस्मरणीय आहे हास्यकथा या भावकथाहि कशा होऊ शकतात याचीं उदाहरणें पाहावयाचीं असल्यास अत्र्यांच्या काहीं कथांकडे निःसंशय बोट दाखविता येईल कोल्हटकर गडकऱ्यांप्रमाणें आत्रेय विनोदहि कोटिक्रमपणा व कल्पकता यावर बराचसा आधारलेला आहे अत्र्यांच्या विनोदांपैकीं बराचसा भाग त्यांच्या नाटकांत व झेंडूचीं फुलें नामक विडंबनगीतसंग्रहात असून तो अत्यंत खुमासदार आहे. नाटकांवरील प्रकरणांत त्याचें स्वतंत्र विवेचन आलें आहे मुलांचा बाजार, बाम-कुक्षी, हास्यकथा, कशी आहे गंमत, हे त्यांचे अलीकडचे संग्रह उल्लेखनीय आहेत

शामराव ओक[1] यांच्या विनोदीकथांतून व लेखांतून कधीं प्रसंगांवर तर कधीं व्यक्तींवर भर देण्यात आलेला असतो. 'मुफलीस आपक' मध्यें आपल्या कुरूपतेची जाणीव नीट नसलेल्या प्रमवेड्याची कथा आहे तर 'माफक मुशा-फरी'त रामराव जोगांच्या बावळटपणाचें प्रदर्शन आहे. समाजांतील अनेक दोष विनोदी पद्धतीनें उघड करून समाजाच्या डोळ्यात चांगलेंच अंजन लेखकानें घातलें आहे. प्रसंगनिष्ठ, स्वभावनिष्ठ, व शब्दनिष्ठ अशा विनोदाचीं रमणीय उदाहरणें शामराव ओक यांच्या कथांतून आढळतात. ग. स. मराठ्यांच्या विनोदाप्रमाणें ओकांचा विनोद बौद्धिक किंवा विद्वत्ताप्रचुर व काहींसा कृत्रिम वाटतो.

बाळकृष्ण वामन फाटक[2] यांनीं आपल्या विनोदी कथांकरितां मुंबई हे क्षेत्र पसंत केलेलें दिसतें. मुंबईतल्या चाळी, त्या चाळींतल्या मौजा, मुंबईतील विविध नागरिक, मुंबईतील 'रामा' गडी, सलूनवाले, व्हिक्टोरियावाले इत्यादि संबंधीं त्यांच्या कथा असतात. लघुकथांत आढळणारें एकजिनसी कथानक, येचक पात्रें या गोष्टी अर्थातच त्यांच्या विनोदी कथांत अपेक्षिणें चुकीचें होईल. सुटेसुटे प्रसंग व काहीं व्यक्ति यांच्यावर आधारलेला त्यांचा विनोद खुसखुशीत, वास्तवतापूर्ण व सात्विक असतो. 'अण्णा' नावाच्या कथासंग्रहांत त्यांनीं 'अण्णा' नावाच्या विशिष्ट कारकुनाबरोबरच सामान्य कारकून वर्गांच्या विनोदी व वास्तवतापूर्ण कथा सांगितल्या आहेत.

चि. मा. दी. पटवर्धन यांनीं कॅ. लिमये, चिंतामणराव जोशी यांच्याच प्रमाणें निर्भेळ व निर्हेतुक हास्यकथा लिहिल्या आहेत. साहित्य गुदाम (१९२९-३१) या पुस्तकांत त्यांनीं प्रथम आपले सुपारीबाज-पत्तेबाज सीनेमाक्टिक जलसेबाज इत्यादि विनोदी लेख प्रसिद्ध केले. हे विनोदी निबंधासारखे आहेत. मात्र यांत वाचकांत सुधारणा घडवून आणण्याचा लेखकाचा हेतु नसून, त्यांचें

१. कथासंग्रह :—कोपरखळ्या, चोरबाजारांतील विजा; भोनऱ्याचे कळे; बामळ-वनांत, गलोल इत्यादि. २. चाळींतील चाळे, मुंबईचे मानकरी; अण्णा इ०

मनोरंजन करणाचा आहे. पटवर्धनांना विनोदी लेखक या नात्यानें खरा लौकिक "जीते रहो जीवा" (१९३९) या विनोदीकथांच्या संग्रहानें मिळवून दिला. यातील नायक "टाटू" हा अजागळ, व्यवहारशून्य असून, त्याचा नोकर जीवा हा हुशार व मार्मिक आहे. जीवाच्या कल्पकतेनें टाटू वरील अनेक संकटें दूर होतात. पी. जी. वुडहाऊस या सुप्रसिद्ध इंग्रज विनोदीलेखकाच्या "जीव्ज" या पात्राचा तोंडवळा आणि "जीवाचा" तोंडवळा सारखा असला, तरी ते भिन्न व स्वतंत्र आहेत. "जीवाची मर्दुमकी" (१९४०) यातहि जीवा टाटू याच्या हास्यकथा आल्या आहेत. "हास्यकळ्या" व "जिनी हमाल" यातील हास्यकथा मुलांना उद्देशून लिहिलेल्या आहेत. पटवर्धनांचा विनोद प्रसंग व व्यक्ति यांवर मुख्यतः आधारलेला असून, वाचकांचें सात्विक मनोरंजन करणें हें त्यांचें ध्येय दिसतें. त्यांच्या विनोदीकथांतील कथानक आकर्षक असतें व संवाद खुसखुशीत असतात. कल्पकतेचें मुबर लेणें लेखकाजवळ असल्याशिवाय इतक्या वरच्या दर्जाच्या व विविध हास्यकथा निर्माण होणें अशक्य आहे. वुडहाऊसप्रमाणें पटवर्धनांच्या हास्यकथांतहि शंभर टक्के कथा व शंभर टक्के हास्यविनोद सापडतो, असें म्हणण्यास हरकत नाहीं. टीडहाणे (१९४६) यांतील निरनिराळे टीडहाणे वाचकांचें खात्रीनें मनोरंजन करू शकतील असे आहेत.

डॉ. अ. वा. वर्टी[१]—यांचें नांव आतां वाचकांच्या चांगल्याच परिचयाचें व आवडीचें झालें आहे. विनोद हा त्यांच्या प्रतिभेचा अंगभूत गुण असून, त्यांच्या कथांत स्वभावनिष्ठ व प्रसंगनिष्ठ विनोदाची स्थळें सर्वत्र आढळतात. 'सहा मास्तर आणि एक मास्तरीण', 'अरसिक नायको', 'मुमताज', 'वधू पाहिजे' इत्यादि त्यांच्या विनोदी कथा दर्जेदार आहेत. पुरुषप्रधान समाजांत स्त्री आणि पुरुष यांच्यांत शुद्ध आणि अविकारी मैत्री असणें कां अशक्य झालेलें आहे, याचें अत्यंत प्रभावी चित्रण 'सहा मास्तर आणि एक मास्तरीण' या कथेंत लेखकानें केलें आहे. डॉ. वर्टी यांची भाषाशैली व वर्णनपद्धति अतिशय मार्मिक असून त्यांचें अवलोकनहि फार सूक्ष्म आहे.

१. कथासंग्रह —मुमताज आणि इतर गोष्टी, दंतकथा इ.

भा. रा. भागवत–शहरातल्या अडचणी–अडथळे–संकटें विनोदी पद्धतीनें सांगणारे फाटकांसारखे दुसरे विनोदी लेखक म्हणजे भागवत हे होत. "वैतागवनातील वाफारे" (१९३९) या पुस्तकात त्यांनीं मुंबईतल्या रहिवाश्याला अनुभवाव्या लागणाऱ्या गंमती सांगितल्या आहेत. अतिशयोक्ति, उपरोध, व्याजोक्ति, विनोदी प्रसंग यांच्या साहाय्यानें हास्यरस ते तयार करितात. माझा विक्रम (१९४६) या हास्यकथांच्या संग्रहात त्यांनीं चक्रमपुरातील विसू रोडे–दाजी लड्डे–किसन व धारूअण्णा यांच्या अनेकविध गंमती सांगितल्या आहेत. यांहि पुस्तकांत आलेला विनोद प्रसंग व व्यक्ति यावर आधारलेला आहे.

वृत्तपत्रीय विनोदाच्या क्षेत्रात दत्तु बांदेकर यांचें नाव प्रामुख्यानें झळकत असताना आढळतें. चित्रा–नवयुग इत्यादि साप्ताहिकात त्यांनीं राजकीय–सामाजिक–धार्मिक दंभाचा जो स्फोट केला आहे तो केवळ अपूर्व आहे. कल्पकता, खेळकरपणा, बोचकपणा या गुणामुळें बांदेकराचे लेख वैशिष्ट्यपूर्ण बनले आहेत. सभोंवतालच्या परिस्थितीवर ते मार्मिक व मर्मभेदक टीका करितात. पण त्या टीकेच्या मागें आपणाला सहानुभूतीनें ओतप्रोत भरलेली व्यक्ति स्पष्ट दिसते. "अतिप्रसंग" संग्रहांतील वेश्येची कैफियत मार्मिक व विदारक झाली आहे. समाजाच्या भपकपणावर त्यांनीं केलेली टीका समर्थनीय नाहीं असें कोण म्हणेल ? त्यांच्या "सख्या हरी" या चित्रा व नवयुगात चालू असलेल्या लेखमालेंतील विनोद त्याच्या ताजेपणामुळें केवळ बहारीचा वाटत असे. "सख्याहरी"नें खेळाडू गुड बनण्याचा जो धडा समाजाला दिला आहे तो चिरंतन आहे.[1] अच्युतराव कोल्हटकरांच्या "संदेश" मधील "वत्सलावहिनींचीं पत्रें" या सदराइतकच "सख्याहरि" हेंहि सदर अत्यंत लोकप्रिय बनलें होतें, असें म्हणावयास हरकत नाहीं. खुमासदार मार्मिक उपरोधपूर्ण वृत्तपत्रीय विनोद निर्माण करणारे दुसरे लेखक प्र. श्री. कोल्हटकर हे होत. 'आकाशवाणी' व 'मोड आणि सुर्दा' हीं त्यांचीं पुस्तकें अत्यंत वाचनीय आहेत.

---

१. आवळ्या भोपळ्याची मोट (१९५९)

सुप्रसिद्ध ल्घुकथालेखक यशवत गोपाळ जोशी याच्या "साहित्यिकाची मफर" (१९४१) या पुस्तकाने मराठी विनोदी वाङ्मयात चागली भर घातली आहे. *खरोखरीची प्रतिमा जवळ नसताना मवग लोकप्रियता मिळविण्याच्या* नादीं जे साहित्यिक लागतात, त्यांच्या हातून कोणत्या हास्यास्पद लीला घडतात त्याचें उपरोधपूर्ण चित्र यात आलें आहे.

मो गो सोमण याच्या 'कालेजविहार' (१९३२) मध्यें कॉलिजात जाणाऱ्या तरुण-तरुणींविषयीं तसेच प्राध्यापकांविषयीं विनोदी लेख आले आहेत. 'खेड्यांतील स्वभावचित्रें' (१९३५) यात खेडेगावातील लोकांचीं मजेशीर वर्णनें आहेत. 'मातलेल्याहिक चेहेरे' (१९३९) या संग्रहातील लेख विनोदीच पण सकीर्ण स्वरूपाचे आहेत. सोमणाचा विनोद कोटिबाजपणा-कल्पकता-प्रतिभा इत्यादि गुणविशेषानीं नटलेला नसला, तरी तो साधा-स्वाभाविक व सर्वांना कळेल असा आहे. गो. ल. आपटे याच्या विचित्र वाटमारी या पुस्तकात आलेल्या विनोदीकथा प्रसंगनिष्ठ, सुरसुरीत व स्वाभाविक आहेत. वा वि जोशी यानीं रेशमी चिमटे, नरम गरम व म्हातारपणच्या उलाढाली अशीं तीन हास्य रसात्मक पुस्तकें लिहिलीं आहेत. जोशाचा विनोद सहेतुक व काहींसा बोचक असला तरी समाजाचें त्यानीं रगविलेलें चित्र वास्तवतापूर्ण आहे यात शका नाहीं. आपल्या विनोदी लेखात व कथात त्यानीं अनेक सस्थाची व व्यक्तींची टिंगल केलेली आढळली तरी त्याना त्या त्या सस्थाविषयीं वा व्यक्तींविषयीं तिरस्कार नाहीं. समाजाचें हसत खेळत दोषदिग्दर्शन करून त्याची सुधारणा करण्याचा त्याचा यत्न अभिनंदनीय नाहीं असें कोण म्हणेल!

वि. आ. बुवा—(जन्म १९२६ पढरपूर येथें) अक्लेचे तारे (१९५१) रकलेचे दिवे, एकना घड, अडाण्याचा गाडा, आणखी एकाची भर, लटाटोप, उगीच काहीतरी, फापटपसारा, घ्या टाळी, असून अडचण नसून खोळबा, आधुनिक पचतत्र (१९६०) इत्यादि विनोदी लेखाचे सग्रह प्रसिद्ध केले असून त्यातील विनोद कल्पनानिष्ठ, स्वभावनिष्ठ, शब्दनिष्ठ, प्रसगनिष्ठ,

रूपनिष्ठ असा विविध प्रकारचा आहे. श्रीयुत बुवांच्या विनोदाचा वेध निबंधात्मक, कथात्मक, स्फुटलेखात्मक व चुटकेवजा असा असून बुद्धिला मुळींच ताण न पडता वाचकाला हसविणारा असा आहे. कथात्मक विनोदात प्रेमाचा सिनेमा, सोळा मेची गोष्ट, महिला मंडळाची सभा इत्यादि कथा उल्लेख करण्याजोग्या आहे. कल्पनानिष्ठ विनोदात परमेश्वरास अर्ज, बायकांची राज्यें, ह्या दोन लेखांची गणना होईल. शब्दनिष्ठ विनोदात ("कवि प्रफुल्लदत्त ह्यानाच कोणी चुकून हाऊसफुल्ल दत्त म्हणतात"), मोठ्याच्या खोट्या गोष्टी, ह्याचा अंतर्भाव होऊ शकेल. विनोदी चुटक्यात मंत्री दगड न्याय, मंत्री अश्वासन न्याय, नवकाव्य अर्थ न्याय याचा निर्देश करता येईल. भानू शिरधनकर यांच्या नावानें लिहिलेल्या चुटक्यात ते एका लॉजमध्यें रहात असतांना त्यांनी सकाळी उठल्यावर व्यवस्थापकांकडे पुढीलप्रमाणें "हे काय लॉज आहे की लोंग ! काल रात्रभर झोप आली नाहीं सारखे दोन उंदीर भांडत होते.' तक्रार केली असतांना त्यांना उत्तर मिळालें, "मग इथं उंदीरच भांडणार ! रोजी दीड रुपया दराच्या लॉजिंग बोर्डिंगमध्यें तुम्हाला बैलाची साठमारी नाहीतर वाघ सिंहाची झुंज पाहयला पाहिजे काय ? अं." सोळा मेच्या गोष्टींत नायक नायिकेची फजगत खिसेकापूच्या चातुर्यानें कशी झाली तें बहारीनें सांगितले आहे. परमेश्वराला केलेल्या अर्जात बुवा पुढील गोष्टींची मागणी करतात, व त्याची विनोदी कारणे देतात — आणखी अर्धा डझन डोळे, चालू डोळ्यांचे दिव्यचक्षूंत रुपांतर, ५० मैलाच्या टापूतील ऐकू येणारी दिव्य श्रवणशक्ति व एक वर्षापर्यंतचे बिनचूक भविष्य करणारा द्रष्टेपणा. मुख्यतः कल्पनानिष्ठ व शब्दनिष्ठ विनोद असणारे श्री. बुवांचे विनोदी साहित्य अगदीं पहिल्या दर्जाचें म्हणता नाहीं आले तरी ते स्वतः विनयानें म्हणतात त्याप्रमाणें तिसऱ्या दर्जाचें खास नाहीं. कांहीं ठिकाणीं बुवांचा विनोद चाळकरी पद्धतिचा (जानव्याचें फासासारखा) असला तरी सामान्यपणें तो आल्हादकारक आहे. इ. स. १९४६ ते १९५३ पर्यंत प्रत्येक दिवाळीला 'हुदुख्या' या नावाचें हस्तलिखित श्री. बुवा काढीत असत. हा अंक हस्तलिखित असूनहि त्यांत प्रथम श्रेणीचे साहित्यिक, चित्रकार, कवि

आपापले साहित्य देत असत. या अशाच सर्वांचे 'अत्युत्कृष्ट' असेच अभिप्राय येत असत. 'लिंगक युराचा' जन्म यातीलच एका अशातून झाला.

पु. ल देशपांडे यांनी नसती उठाठेव, गोगीर मराठी, 'गोळावेरीज' मराम्याची चाळ विनोदसग्रह प्रसिद्ध केले असून त्यात विविध प्रकारचा विनोद आला आहे. मैं स्मियें हास्यापासून सुरू झालेला कथात्मक विनोद जसा त्यांनी हाताळला तसाच वर्णनात्मक, निबंधात्मक, नाट्यात्मक विनोदही त्यांनी सजविला विनोदाच्या सर्व तऱ्हा शब्दनिष्ठ, स्वभावनिष्ठ, प्रसंगनिष्ठ, कल्पनानिष्ठ इत्यादि—त्यांनी अत्यंत यशस्वीपणे आपल्या हास्यसृष्टीत योजिला आहे इग्रजीची आवड असलेले दसुदुरा पानाची चंची उघडीत, कथेतील नायकाला म्हणतात, "ध्या पेज जमरा मॉर्ग, टोबॅको" त्याना म्हणावयाचे असते या पान जमरा चुना तंबाखू मिसळून (संगीत चिवडामणी) "माझी पाठ धरते" या नाट्यस्त्यात "यो." आणि "मीच्या' सवाात हो म्हणते," इतकी वर्षे शेजारी आहेत आमच्या ते, कधी डोळा वर करून पाहिलें नाही त्यांनी माझ्याकडे' त्यावर "मी" म्हणतो, "तुझ्याकडे कशाला पाहील? तुझ्याकडे पाहायला डोळा वर केला की आपोआप मान खाली जाते लोकाची" ते स्वन घरहि विनोद करतात. उदाहरणार्थ "मार्सेल मा सॉच्या मूकाभिनयाने तर आपल्याला अभिनयातल काही येतें या अहकाराची सपूर्ण विरेट उडाली" असे ते लिहितात. (अपूर्वाई १९६०) कल्पनानिष्ठ विनोद जागोजाग त्याच्या हास्यसृष्टीत आढळतो. खानावळीतला मालक बुवाच्या पानावर तुपाची नुसती इनिशियल" न करता "फुल सिग्नेचर" करतो (नसती उठाठेव). स्वभावनिष्ठ विनोदात सगीत चिवडामणी बुवाची गणना करता येईल सगीत चिवडामणी ही कथा करुण व हास्य ह्या रसानी बहाराची बनली आहे या कथेतील शेवटली वाक्यें अशी आहेत, "बाबूराव आम्ही एक मम ओळखले लोकाचें त्याना गाण्याची गरज नाही, खाण्याची आहे! सगीतचूडामणी पेक्षा सगीतचिवडामणीची लोकाना अधिक जरूरी आहे.' "त्याचे व्यवच्छेदक लक्षण" यात शब्दनिष्ठ कल्पनानिष्ठ विनोदाच्या जोडीला भरपूर उपरोध आहे नवकाव्यावर इतकी बोचक खोचक खोडकर टीका

क्वचितच पहायला सापडेल नव्य कविचा सामान्य मित्र त्याला म्हणतो, " तुझे काव्य कळायला दुर्बोध आहेरे हरि ! "त्यावर कवि म्हणतो," दुर्बोध !! बरोबर बोललास, हेंच माझ्या वाङ्मयाचें व्यवच्छेदक लक्षण आहे ! ' स्वभावनिष्ठ व प्रसंगनिष्ठ विनोदाची भरपूर उदहरणें वगान्याची चाळ या संग्रहात पहायला सापडतात. अशा रीतिने विनोदाचे सर्व प्रकार श्री पु ल देशपांडे यांच्या हास्य सृष्टींत येतात त्यांचा विनोद कुठेही ओढून ताणून आणलेला न दिसता, सर्वत्र स्वभाविक व सहज असा दिसतो देशपांडे यांनी काहीही लिहिले तरी त्यांत सहजता व सौंदर्य, एक प्रकारची चमक असते. ते नाटक लिहोत, निबंध लिहोत, प्रवासवर्णन लिहोत त्यात एक प्रकारचा "अपूर्वाई" असते मिदास राजाप्रमाणे असें वाटतात कीं तो ज्याला स्पर्श करी त्याचें सोनें होई थी देशपांडे हे कोणताही वाङ्मय प्रकार हाताळोत त्याला " देशपांडेच " लागलाच म्हणून समजावें

मोरेश्वर वासुदेव जोशी–यांच्या पुढारी की पेंढारी या पुस्तकात विनोदी कथा व विनोदी लेख यांच्या रूपाने अनेक सामाजिक दंभावर उपरोधपूर्ण पण आल्हादकारक टीका करण्यात आली आहे. 'इयापलट सारखे यातील काही लेख केवळ विनोदी आहेत बगूनानांचे आत्मचरित्र (१९२६) यात बगूनानाना आलेले विचित्र व मजशीर अनुभव देण्यात आले आहेत वि. मा जोशी यांच्या ' विनोदी कळ्या ' सुरसुटीत व मनोरंजक आहेत हरि विनायक, अनंता एक्सप्रेस व चलेजाव या विनोदी पुस्तकाचे लेखक हरि विनायक वाडेकर (जन्म ८-१०-१९१२) यांचा विनोद कल्पकतापूर्ण, खोडकर पण बहारीचा आहे द. गि गुप्ते यांनीं पुराण पुरुषाच्या अडचणी या पुस्तकांत श्रीराम, श्रीकृष्ण, नारद, भीम, धर्मराज, गरुड इत्यादि पौराणिक व पूज्य व्यक्ति पुन भूतलावर आल्यावर त्यांना कोणकोणत्या अडचणी नडल्या त्याचे मनोहर चित्र रंगविलें आहे. श्य ग घारपुरे यांच्या ' नाटक कपनीत ' नाटक कपनी काढून पाडोबाची कशी फजीती झाली तें दाखविलें आहे "गाळीव रत्नें" यांतील अनंत अतरकर यांचा विनोद खोडकर पण खेळकर स्वरूपाचा आहे शंकर शांताराम मोरे यांनीं

'बजरंग'च्या काल्पनिक चरित्राच्या रूपानें खेडेगावांतील परिस्थितीचें व लोकांचें मोठें मनोरंजक चित्र काढलें आहे. 'बजरंग' पुस्तकांतील विनोद वास्तवतापूर्ण व स्वाभाविक असा आहे. सी. ल. देवधर यांच्या गाल्गुचे या संग्रहातील नाट्यछटा हास्यपूर्ण, उपरोधपूर्ण व रसाळ आहेत. होनप व कानडे या मित्रद्वयांनी लिहिलेला "ब्रेन टॉनिक" हा विनोदी कथांचा संग्रह वाचकांची सात्त्विक करमणूक निःसंशय करील असा आहे. गडे एकांताचा वाग (१९५८), रानसाची मेख, तिसरा बाजीराव, पिछाडीचे मगदार, पृथ्वी गोल आहे इत्यादि विनोदी कथांचे कर्ते प्रा. पद्माकर डावरे (जन्म ४-१०-१९२८); विनोदी कळ्या कर्ते वि. वा. जोशी (ज. ६-४-१९०६), मातमझले कर्ते पु. भा. भावे; कादंबरीकार वि. वि. बोकील; वसंत सबनीस, अरेरे ! अरेरे जग सुधारलेंच नाहीं कर्ते मो. ग. रांगणेकर; मी दुकान काढतो कर्ते वसंत पटवर्धन, येथें कारकून मिळतात कर्ते दा. ना. नवरे; मी सिनेमाला जातो व साखरेची चित्रे कर्ते रमेश मंत्री (यांचा विनोद प्राय अतिशयोक्त वर्णनाने साधलेला असतो.) चंदू सिगारेट सोडतो कर्त्या कुमुदिनी रांगणेकर; आत्मारामाचे वडील कर्ते प्र. गो. पाठक, रेळीच्या तालीवरून कर्ते अ. द. अग्निहोत्री; आधुनिक महागयुगीन दर्शन कर्ते म. पा. भावे, साहस्रे श्री प्रतिवसति कर्ते प्रबोधनकार ठाकरे, 'एका उपवधू तरुणाची काही सुखदुःखें' कर्ते शरश्चंद्र गुण्ये, गमा बालिस्टर कर्ते ग. दि. माडगूळकर, वसंत सबनीस (हे अगदी अलीकडचे विनोदी लेखक उल्लेखनीय आहेत.) नसता उपद्व्याप कर्ते बाळ सामंत (याचा विनोद बोचत नाही, झोंबत नाही, संसारातल्या लहान सहान गोष्टींवर तो आधारला आहे.) चोरलेल्या चवल्या (मायातरिल विनोदी लेख) कर्त्या सौ. कमलाबाई फडके, हुबेहूब कर्ते द. मा. मिरासदार (खेड्यापाड्यातल्या जीवनावर आधारलेल्या यांच्या विनोदी कथा खुसखुशीत आहेत). इत्यादि लेखकांनी अलीकडच्या विनोदाचे दालन भूषविलें आहे.

# १०

## निबंधकार-प्रबंधकार

चिपळूणकर, आगरकर, लो. टिळकादि काहीं निबंधकारांचा विचार मागेंच आरंभीं केला आहे. उरलेल्या निबंधकार-प्रबंधकारांपैकीं काहीं प्रमुखांचा येथें उल्लेख करावयाचा आहे. निबंध आणि प्रबंध गेल्या पन्नास वर्षांत, अनेक विषयांवर व अनेक लेखकांकडून लिहिले गेले. त्या सर्वांचा येथें विचार करणें अशक्य आहे. ललित साहित्याच्या कसोटीला उतरणाऱ्या निबंधकारांचाच येथें निर्देश करणें उचित होईल. विज्ञान, स्थापत्य, शिल्प, इतिहास, व्याकरणादि विषयांवर तयार झालेल्या ग्रंथांचा विचार करणें प्रस्तुत ग्रंथाच्या कक्षेबाहेरचें होईल तथापि विचार किंवा भाषा यांचें सौंदर्य ज्या ललितेतर निबंधकारांत आढळतें अशांचाहि येथें नामोल्लेख केला आहे.

मराठी साहित्याच्या समीक्षकांत विनायक लक्ष्मण भावे यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. जुनीं हस्तलिखितें वाचून प्राचीन गद्य व पद्य लेखकांच्या कार्यांचें समालोचन त्यांनी आपल्या 'महाराष्ट्र सारस्वत'[1] (इ. स. १९१९) या ग्रंथात जें केलें आहे तें मोलाचें आहे. या ग्रंथात अनेक ठिकाणीं ग्रंथविषयाशीं समरस होऊन भाव्यांनी सुंदर शैलीनें युक्त असा मजकूर लिहिला आहे. ग्रंथाचा उपसंहार तर केवळ बहारीचा आहे. दत्तो वामन पोतदार यांचा 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' (१९२२) हा ग्रंथ मौलिक आहे. इ. स. १८१० ते १८७४ पर्यंतच्या काळांत तयार झालेल्या साहित्याचा यांत साधार आढावा घेण्यांत आला आहे. या काळांतील वाङ्मय बालोपयोगी-शालोपयोगी-तेजोहीन कां,

१. प्रस्तुत ग्रंथाची पुरवणीसह नवीन तृतीय आवृत्ति डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी १९५१ मध्यें प्रसिद्ध केली.

याचें विवेचन ग्रंथात चांगलें व डौलदार शैलीनें करण्यात आलें आहे. ग. मि. जोशी यांनीं आपल्या मराठी भाषेची घटना (१९२३) या ग्रंथात मराठी भाषेच्या इतिहासाबरोबरच मराठी साहित्याचाहि त्रोटक इतिहास दिला आहे. भिडे यांच्या 'मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास' (१९३३) या पुस्तकांत महानुभाव अखेर पर्यंतच्या काळांतील भाषा व साहित्याचा विचार आला आहे. 'तुकाराम बोवा' हा त्याचा निबंधहि सरस आहे. महानुभावीय साहित्याचा परामर्श यथावत खुशाल देशपांडे यांच्या 'महानुभावीय मराठी वाङ्मय' (१९२५) या ग्रंथात चांगल्या प्रकारें घेण्यात आला आहे. डॉ. वि. भि कोलते यांच्या "महानुभाव तत्त्वज्ञान" (१९४५) या ग्रंथात महानुभावांच्या तत्त्वज्ञानाचा साधार व सोपपत्तिक विचार आला आहे. नरेंद्रकृत रुक्मिणीस्वयंवर, उद्धवगीता, भास्करभट्ट बोरीकर, श्री गोविंद प्रभुचरित्र इत्यादि ग्रंथ उत्तमप्रकारें संपादन करून कोलत्यांनी महानुभावीय साहित्याशीं लोकांना चांगलाच परिचय करून दिला आहे. ल. रा. पांगारकर यांच्या विस्तृतात्मक मराठी वाङ्मयाचा मागोवा (उत्तरार्धात) उल्लेख आला असला तथापि येथें त्याचें स्मरण करणें प्रस्तुत ठरेल. इंदूरच्या वि सी. सरवटे यांनीं "मराठी साहित्यसमालोचन" (१९३७) नावाचा ग्रंथ लिहून त्यात इ. स. १८१८ ते १९३४ पर्यंतच्या अर्वाचीन मराठी साहित्याचे चांगलें विवेचन केलें आहे नाटक काव्य-कादंबरी-कथा इत्यादि वाङ्मय निर्माण करणाऱ्या लेखकांचा यात चिकित्सकपणें विचार करण्यात आला आहे "अर्वाचीन मराठी साहित्य' (१९३५) या वि. पा. नेने यांनीं संपादन केलेल्या ग्रंथात अनेक लेखकांचे मराठी वाङ्मयाच्या विविध शाखांवरील निबंध आले आहेत. आपापल्या परीनें हे निबंध ठीक असले, तरी त्यात एकसूत्रीपणा दिसत नाहीं. ग. बा. सरदार यांचा "अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका" (१९३७) हा ग्रंथ साधन ग्रंथ म्हणून अभ्यसनीय आहे. याच ग्रंथकाराचीं उपेक्षित मानकरी व संतवाङ्मयाची फलश्रुति हीं दोन पुस्तकेंहि साहित्याच्या इतिहासाच्या दृष्टीनें उपयोगी आहेत. अगदीं अलीकडे त्यांनी 'महाराष्ट्र जीवन' (१९६०) या नांवाचा ग्रंथ श्री. चिं. ग. कर्वे, दा न शिखरे व मु ग पानसे यांच्या मदतीनें संपादन

केला असून, त्यात महाराष्ट्रातील सांस्कृतिक जीवनाच्या विविध अंगाचें समीक्षण करण्यांत आलें आहे ग्रंथाचें संपादन निर्दोष नसलें तरी तो माहितीनें भरलेला व कांहीं दृष्टींनीं अपूर्व असा आहे. दंडवते यांच "महाराष्ट्र नाट्यकला व नाट्यवाङ्मय" (१९३१) हें पुस्तक त्रोटक असलें तरी त्यात रसिकता चांगली व्यक्त झाली आहे धुळें येथें भरलेल्या २८ व्या साहित्य संमेलनानिमित्त इ. स. १९१४ ते १९४४ पर्यंतच्या मराठी साहित्याचें समालोचन निरनिराळ्या लेखकांकडून संमेलनानें नेमलेल्या संपादक मंडळानें जें करविलें तें "मराठी साहित्य" (१९४५) या नावानें प्रसिद्ध करण्यात आलें आहे ग. दे. खानोलकर यांची अर्वाचीन मराठी साहित्यसेवक भाग १-२ व माधवज्यूलियन हीं पुस्तकें उपयुक्त आहेत. चिं. नी जोशी यांनीं मराठवाड्यातील "अर्वाचीन मराठी वाङ्मया" चा आढावा घेतला असून, त्यात इ. स. १८३८ ते १९३८ पर्यंतच्या काळात तयार झालेल्या साहित्याचा विचार केला आहे. "श्रीधर चरित्र व काव्य विवेचन" हाहि त्यांचा ग्रंथ माहितीनें भरपूर आहे. अलीकडे द. ल. माजरेकर व गं. भा. निरंतर यांनीं इ. स. १८७४ पर्यंतच्या मराठी साहित्याचें धावतें समालोचन करणारीं पुस्तकें जीं प्रसिद्ध केलीं आहेत, तींहि उल्लेखनीय आहेत. ना ग. नांदापूरकर यांनीं कहाणीच्या भाषेंत मराठी साहित्याची "मराठीची कहाणी" नावानें जी रूपरेषा दिली आहे ती काव्यपूर्ण व आकर्षक आहे. आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास (भाग १ व २) या ग्रंथात प्रो. अ. ना. देशपांडे यांनीं इ. स. १८७४ ते १९५० पर्यंतच्या आधुनिक मराठी वाङ्मयाचा साधार व सोपपत्तिक असा इतिहास लिहिला असून, त्यांतील विवेचन समतोल व सरस झालें आहे. मराठीचा परिमल (१९५३) या श्री. दा. न शिखरे यांच्या ग्रंथात समग्र मराठी वाङ्मयाचें सोदाहरण विवेचन करण्यात आलें आहे. मुख्यतः प्रमुख नाटककार, कथाकार, कादंबरीकार इत्यादींकाच्या साहित्याचा परिचय यात करून देण्यात आला आहे. प्राचीन मराठी वाङ्मयाचें स्वरूप (१९५६) या ग्रंथात ह श्री शेणोलीकर यांनीं इ म. १०५० ते १८४० पर्यंतच्या मराठी वाङ्मयाचा आढावा घेतला आहे.

साहित्याचा साहित्य म्हणून किंवा तत्त्व म्हणून विचार करणारे काहीं ग्रंथकार आहेत फळकरांनीं बडोदें येथ इ स १९२१ मध्यें भरलेल्या दहाव्या मराठी साहित्य संमेलन प्रसंगीं साहित्यरचनानें निर्माण होणाऱ्या सविकल्प समाधीची जी अभिनव कल्पना प्रगट केली तिचा उल्लेख येथें करता येईल फळकरांनीं पुढें "सुभाषित आणि विनोद" (१९०८) हा ग्रंथ लिहून आणि त्याचाच अधिक विस्तार केलेला "हास्यविनोदमीमांसा" (१९३७) हा ग्रंथ प्रसिद्ध करून, विनोद या वाङ्मयप्रकाराचें साधार, सुंदर व मार्मिक विवेचन केलें हरिभाऊ आपटे याचा "विनय वाङ्मय" (१९११) हा निबंध आकारानें फारसा मोठा नसला तरी गुणानें मोठा आहे या गो आपटे यानीं हडसन यांच्या "ॲन इन्ट्रोडक्शन टु दि स्टडी ऑफ लिटरेचर" च्या धर्तीवर मराठींत "लेखनकला व लेखन व्यवसाय" (१९२६) नावाचें पुस्तक तयार करून, त्यात वाङ्मयाच्या विविध शाखाचें विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें चांगलें विवेचन केलें आहे

वाङ्मयविषयक निबंधकारात ग त्र्य माडखोलकर यांची प्रामुख्यानें गणना होईल केशवसुत, गोविंदाग्रजादि आधुनिक कवींच्या काव्याचा परामर्ष घेणारें त्याचें 'आधुनिक कविपंचक (१९२१) हें पुस्तक प्रसिद्ध होताच स्वतंत्र वृत्तीचा एक चांगला टीकाकार उदयास आला असें वाचकांनीं ठरविलें त्यानंतर त्यांनीं विष्णुशास्त्री चिपळूणकरांवर बराच मोठा निबंध लिहून शास्त्रीबोवांच्या कार्याचें मूल्यमापन केलें. माडखोलकरांच्या निबंधात रसिकता राष्ट्रीयवृत्ति व वास्तवतावाद याचें सुंदर मिश्रण झालेलें आढळतें त्याची भाषाहि प्रौढ पण सुबोध व रमणीय असल्यानें त्याचे ग्रंथ वाचनीय बनले आहेत विलासिका, वाङ्मयविलास, स्वैर विचार, माझे आवडते लेखक, परामर्ष, जीवनसाहित्य, समालोचना, माझे आवडते कवि, इत्यादि त्यांच्या अनेक ग्रंथात त्यांनीं साहित्याच्या अंगोपांगाची जशी चर्चा केली आहे, त्याचप्रमाणें अनेक साहित्यिकांच्या ललितकृतींचाहि परामर्ष घेतला आहे जीवन म्हणजेच कला, या विचाराचे ते असल्यानें कलेकरिता कला हें मत त्यांना कधींच ग्राह्य झालेलें नाहीं काव्याकडे ते विद्वज्जनाच्या विनोदनाचें साधन म्हणून न पाहता उद्बोधनाचें साधन म्हणून पाहतात

प्रसिद्ध कादंबरीकार ना. सी. फडके यानींहि साहित्यविषयक व इतर अनेक ग्रंथ लिहिले आहेत. लालित्यपूर्ण भाषाशैली व विचाराचा समतोलपणा यामुळें त्यांचे ग्रंथ आकर्षक बनले आहेत. नाटक, कादंबरी, लघुकथा इत्यादि वाङ्मय प्रकाराची लालित्यपूर्ण चर्चा करणारा 'प्रतिभासाधन' हा ग्रंथ अतिशय लोकप्रिय असून, आतापर्यंत त्याच्या चार पाच आवृत्त्या निघाल्या आहेत. वाङ्मयविहार मानसमंदिर, माझ्या साहित्यातील कांहीं स्मृति, गडकऱ्यांच्या नाट्यकृति, साहित्य आणि संसार, लघुकथालेखन मंत्र आणि तंत्र इत्यादि ग्रंथांत साहित्य विषयक व इतर अनेक विषयांवर चर्चा आली आहे. अक्षर वाङमयापासून वाचकाला पुनःप्रत्ययाचा आनंद मिळतो, व कला ही मुख्यतः कलात्मक आनंदा करिता आहे अशा आशयाची त्यांचीं मतें असून तीं त्यांनीं परिणामकारक रीतीनें प्रतिपादिलीं आहेत.

वि. स. खांडेकर हे प्रथम श्रेणीचे जसे लघुकथाकार, कादंबरीकार आहेत. तसेच ते अव्वल दर्जाचे निबंधकार टीकाकारहि आहे. "गडकरी व्यक्ति आणि वाङ्मय" या त्यांच्या ग्रंथात त्यांनीं गडकऱ्यांच्या जीवनाचें तसेंच वाङ्मयाचें उत्कृष्ट समालोचन केलें आहे. सूक्ष्मता, सहृदयता व मार्मिकपणा हे त्यांच्या ग्रंथाचे विशेष सांगता येतील. त्यांची भाषाशैली विनोदगर्भ व अलंकारिक असल्यानें, त्यांचे ग्रंथ सुरसदारहि बनले आहेत. आगरकरांचें चरित्र 'तीन संमेलनें', 'मराठीचा नाट्यसंसार' इत्यादि त्यांचे ग्रंथ या म्हणण्याची साक्ष देतील.

रा. श्री. जोग (जन्म १५ मे १९०३) यानीं आपल्या 'अभिनव काव्यप्रकाश (१९३०)" या ग्रंथात संस्कृत साहित्यमीमांसकांच्या तसेच पाश्चिमात्य साहित्य मीमांसकांच्या ग्रंथांच्या आधारें काव्याच्या विविध अंगांचा तौलनिक व सुबोध विचार केला आहे. 'सौंदर्यशोध व आनंदबोध" (१९४३) या ग्रंथात काव्यातील सौंदर्य व काव्यापासून होणारा आनंद या विषयींचे त्यांचें विवेचन मूल्यग्राही व सरस झालें आहे केशवसुत, अर्वाचीन मराठी काव्य, काव्यविभ्रम (१९५१)

डॉ. ग. दा. वाळिंबे यांनीं टीकात्मक अनेक ग्रंथ लिहिले आहेत. साहित्याचा ध्रुवतारा ( दुसरी आवृत्ति ) या ग्रंथात जीवन हाच साहित्याचा ध्रुवतारा, असें प्रतिपादन केलें आहे मानवतेचें मर्म ज्यात प्रतीत झालें असेल तें थोर साहित्य, साहित्याची उत्पत्ति जीवनात आणि जीवनावरील भाष्यातच त्याची परिणती इत्यादि विचार यात माडण्यात आले आहेत वाङ्मयीन टीका–शास्त्र आणि पद्धति, सुधाकर कीं एकच प्याला; मुक्तात्म्यापासून प्रमद्वरे पर्यंत; बालकवि, साहित्यातील संप्रदाय; गडकऱ्याचें अंतरंग; ज्ञानेश्वरींतील विदग्ध मवृत्ति, भावबंधन प्रस्तावना, साहित्य मीमांसा, प्राचीन भारतीय कला व नाटककार गडकरी इत्यादि त्याचे ग्रन्थ स्वतंत्र व समतोल विचारानीं लिहिलेले आहेत.

श्री. म. माटे यानीं आपल्या 'रसवंतीची जन्मकथा' या ग्रंथात काव्य कसें तयार होतें, याची मूलग्राही व चिंत्य अशी चर्चा केली आहे. प्रौढ सुश्लिष्ट भाषा आणि समतोल विचार यामुळें माट्यांचे सर्वच ग्रंथ अभ्यसनीय झाले आहेत. अस्पृश्यांचा प्रश्न, विज्ञानबोधाची प्रस्तावना, साहित्यधारा, पचमानव हिंदुसमाज, आजकालचे विद्यार्थी, विचारशलाका इत्यादि त्याचे ग्रंथ मर्मज्ञ वाचकाला मेजवानीसारखे वाटतील. दा. ना. आपटे[१] हे मागच्या पिढींतील चागले निबंधकार आहेत. पार्लमेंट, 'तत्त्वज्ञानातील कूट प्रश्न' इत्यादि त्याचे कांहीं ग्रंथ रूपांतरात्मक असले, तरी 'साहित्यप्रकाश,' 'इंद्रधनुष्य' यासारखे कांहीं स्वतंत्रहि आहेत आपल्या स्वतंत्र ग्रंथात त्यानीं साहित्यविषयक व इतर अनेक विषयावर स्फुट लेख प्रौढ व डौलदार शैलींत प्रसिद्ध केले आहेत. माधव दामोदर आळतेकर[२] हे स्वतन्त्रवृत्तीचे निबंधकार म्हणून प्रसिद्ध आहेत. 'गोपाळ गणेश आगरकर' या ग्रंथात त्यानीं आगरकराच्या जीवनाचें तसेंच साहित्याचें कांहीसें एकतर्फी वाटणारें पण स्वतंत्र विवेचन केलें आहे. 'श्रीज्ञानदेव' या ग्रंथात ज्ञानेश्वराच्या कार्याचें समालोचन आलें आहे 'नवें मानसशास्त्र व नवी

१. मृत्यु १९५७ बडोदें येथें.
२. मृ. २० ऑगस्ट १९५९ मुंबई येथें वयाच्या ७० व्या वर्षी

नीति', 'पानें व फूलें', कालिदासाची सृष्टि हीं त्याचीं पुस्तकें त्याच्या स्वतंत्र विचाराची साक्ष देतील.

श्री समर्थरामदास यांच्या वाङ्मयाचे थोर अभ्यासी धुळ्याचे शंकर श्रीकृष्ण देव यांचे रामदासावरील ग्रंथ अभ्यसनीय व अत्यंत रसाळ आहेत. 'श्री समर्थ हृदय' हा त्यांचा ग्रंथ तर केवळ अपूर्व आहे. संतवाङ्मयाचे चिकित्सक अभ्यासी प्रा. नरहर रघुनाथ फाटक यांचे ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास यांच्यावरील प्रबंध मौलिक व विचारप्रवर्तक आहेत. प्राचार्य शं. वा. दांडेकर यांचा ज्ञानेश्वरावरील प्रबंध ज्ञानेश्वराचें तत्त्वज्ञान उत्तमप्रकारें विशद करून दाखवितो. 'ईश्वरवाद' हा त्यांचा प्रबंधहि आदरणीय असाच आहे. डॉ. दि. दा. पेंडसे यांच्या 'ज्ञानेश्वराचें तत्त्वज्ञान' या ग्रंथात शंकराचार्यांचें तत्त्वज्ञान व ज्ञानेश्वराचें तत्त्वज्ञान यांत ऐक्य कसें आहे तें दाखविलें आहे. य. र. आगाशे (जन्म १७-८-१८९२) यांचा काव्यविवेचनात्मक 'ज्ञानेश्वरीचें काव्यांग' हा ग्रंथ उल्लेखनीय आहे. याच संदर्भात प्रो. श्री. गो. याळिंगेकृत (व ५ फेब्रु. १९२०) ज्ञानेश्वरचरित्र आणि ज्ञानेश्वरीचचा हा ग्रंथहि वाचनीय आहे. यात ज्ञानेश्वराचें चरित्र आहे, व वाङ्मयविवेचनहि आहे. श्री ज्ञानेश्वरी अध्याय सातवा, हा यांचा ग्रंथ, विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें उपयोगी आहे.

वाङ्मयप्रकाराची चर्चा करणाऱ्या इतर ग्रंथात प्र. वा. बापट आणि ना. वा. गोडबोलेकृत 'मराठी कादंबरी', या. कृ. गलगलीकृत 'लघुकथा', रा. ह. देशपांडेकृत 'लघुकथा', अ. म. जोशी व प्रभाकर माचवेकृत 'चरित्र, आत्मचरित्र आणि टीका', वे. नारखेडेकृत 'काव्यकलेचें अंतरंग', महादेवशास्त्री जोशीकृत 'सुलभ काव्यशास्त्र', सरोजनी बाबर व कुळकर्णीकृत 'साहित्यदर्शन', शिवराम गोविंद भावेकृत 'गडकऱ्यांचा विनोद', मो. प्र. फडकेकृत 'लेख कसे लिहावेत!' प्रो. म. वि. फाटककृत मराठी निबंध तत्र आणि विकास, प्रो. स. ग. मालशेकृत आवडनिवड (१९५९); डॉ. प्र. न. जोशीकृत मराठी साहित्यातील मधुराभक्ति (यात मराठीतील शृंगारभक्तीचें मानसशास्त्रीय परीक्षण

मराठी वाङ्मयाभिरुचीचें विहंगमावलोकन (१९५९). नवंगा (१९६०) इत्यादि यांचे ग्रंथहि अभ्यसनीय आहेत. द. के. केळकर यांच्या "काव्यालोचन" (१९३१) यातहि काव्यविषयक चर्चा आली असून काव्यानंदाची मीमांसा विस्तारानें केलेली पाहावयास सापडते. केळकरांची भाषाशैली प्रौढ व अलंकारिक असल्यानें यांचा ग्रंथ चित्ताकर्षक बनला आहे. संस्कृतिसंगम, दर्याची संस्कृति, वादळी वारें व साहित्यविहार हेहि त्यांचे ग्रंथ गाजले आहेत. य. न. आगाशे यांच्या 'सारस्वत समीक्षा" (१९३४) ग्रंथात वाङ्मयाच्या अंतर्बाह्य स्वरूपाचें शास्त्रीय विवेचन" आलें आहे. वासुदेव बळवंत पटवर्धन यांचें 'काव्य आणि काव्योदय' (१९२१) हें पुस्तक वाचकांच्या मनात काव्याविषयी प्रेमादर निर्माण करतें. प्रा. के. ना. वाटवे यांचा 'रसविमर्श' हा ग्रंथ रसाचा सांगोपांग व मूल्यग्राही विचार करणारा असून तो प्रौढ व रसाळ शैलीनें नटलेला आहे. संस्कृत काव्याचे पंचप्राण हा त्यांचा ग्रंथहि महत्त्वपूर्ण आहे. सौ. मालती बेडेकर (पूर्वाश्रमींच्या बाळुताई खरे) यांचा "अलंकारमंजूषा" (१९३१) हा ग्रंथ अलंकाराची बाधक बाधक चर्चा करणारा असूनहि सुबोध झाला आहे. राजकवि काळेले यांच्या 'वे अलंकार' (१९५२) या पुस्तकातील विवेचन मूल्यग्राही व चिंत्य आहे. दावरी केतकर यांचें "भारतीय नाट्यशास्त्र' (१९२८), शिरीष यांचें मराठी नाट्यछटा" (१९३७), वि. का. राजवाडे यांचें "कादंबरी" (१९२८) मोठीं छोटीं पुस्तकेंहि उपयुक्त आहेत. विशेषतः "कादंबरी"त कादंबरीविषयक रिक विवेचन चांगलें केलेलें आढळतें.

सौ. कुसुमावती देशपांडे यांचे मराठी कादंबरीचें पहिलें शतक (१८५४) ग्रंथात प्रमुख मराठी कादंबरीकारांचा परिचय करून देण्यात आला आहे. श्री. मा. कुलकर्णी यांच्या कादंबरीची रचना (१९५६) या ग्रंथात कादंबरीचा या दृष्टीनें विचार करण्यात आला आहे. मराठी कादंबरी या श्री. प्रभाकर वासुदेव बापट व नारायण वासुदेव गोडबोले यांच्या ग्रंथात मराठी कादंबरीचा आणि विकास अशा दुहेरी दृष्टीनें परामर्श घेण्यात आला आहे.

सुप्रसिद्ध कवि माधवराव पटवर्धन यांनीं "छंदोरचना" नावाचा ग्रंथ तयार करून, त्यात गल्या दीडशे वर्षांत मात्रावृत्तात जी मराठी कविता तयार झाली, तिची पाहणी करून, वर्गवारी करून, तिला स्थायिस्थिरपणा मिळवून दिला. आजचे बरेच मराठी कवि आता छंदोरचनेंतील जातिवृत्तानुरूप काव्य करीत असलेले आढळतात.

डॉ. ना. ग. जोशी यानीं मराठी छंदोरचना (१९७४) हा ग्रंथ लिहिला असून, त्यात त्यानीं कै. माधवराव पटवर्धनांच्या छंदोरचना या ग्रंथाच्या मागोवा घेत, मराठी छंदोरचनेचा स्वतंत्रपणे पुनर्विचार केला आहे. श्रीयुत जोशी याना डॉक्टोरेटची पदवी या ग्रंथावरच मिळाली मराठी छंदोरचनेचा विकास (१९५७) या ग्रंथात डॉ. जोशी यानीं मराठी पद्यरचनेचा ऐतिहासिक विकास दाखवित, त्यातील वैशिष्ट्यपूर्ण नमुने दिले आहे. प्राचीन गीतभांडार (१९६९) यात त्यानीं मध्ययुगीन मराठी गीतांचा संग्रह करून त्याला विवेचक प्रस्तावना जोडली आहे.

श्रीधर विनायक वर्तक यांच्या 'तुतारीचे पडसाद' (१९२६) या ग्रंथानें एकेकाळीं खूपच खळबळ उडवून दिली होती. केशवसुताच्या काव्याचें या ग्रंथात करण्यात आलेलें विवेचन मोठें मार्मिक व विचारप्रवर्तक आहे. रविकिरण मंडळानें प्रसिद्ध केलेलें 'काव्यविचार' (१९२४), ना. म. भिडे व द. अ. आपटे यानीं संपादून प्रसिद्ध केलेलें 'वाङ्मयचर्चा' (१९२५) आणि महाराष्ट्र शारदा मंदिर पुणें या संस्थेनें प्रसिद्ध केलेलें 'शारदाविहार' (१९४०) या ग्रंथात अनेक लेखकाकडून लिहून घेतलेले साहित्यविषयक लेख प्रसिद्ध करण्यात आले आहेत. गो. चिं. भाटे यांच्या 'ललितकलामीमांसा' (१९२५) या ग्रंथात नृत्यकला, चित्रकला व साहित्यकला यांचें विवेचन आलें आहे. कविवर्य भास्करराव तांबे यांचा 'कला आणि नीति' (१९३२) हा निबंध लहान असला तरी उल्लेखनीय आहे. नीतिचा आणि कलेचा काहीं संबंध नाहीं, असें मत या निबंधात मांडण्यात आलें आहे.

वस्तुनिष्ठ दृष्टीनें केलें आहे), प्रो. वा. ल. कुलकर्णीकृत वामन मल्हार जोशी, वाङ्मयांतील वादस्थळें, वाङ्मयीन टीका आणि टीपणी (१९५२, यात रस म्हणजे काय, वाङ्मय, आत्मचरित्र इत्यादि विषय आले आहेत), वाङ्मयीन मतें आणि मतभेद (१९४९; यात टीकाशास्त्राची मूलभूत तत्त्वें मांडिलीं आहेत). श्रीयुत वा. ल. कुलकर्णी यांचा श्रीधर कृष्ण-चरित्र आणि दर्शन अलिकडील प्रसिद्ध झालेला ग्रंथहि उल्लेखनीय आहे. प्रो. कुलकर्णी हे सहृदय टीकाकार असुन त्यांचीं मतें स्वतंत्र वृत्तीचीं द्योतक आहेत. थोडें पण मौलिक निबंध लिहिणारें वक्तृत्वाचें प्रो. माधव अचवल यांचा येथें उल्लेख करायला हवा. त्यांच्या लेखनात नवा दृष्टीकोण असतो. त्यांचा किमया नांवाचा निबंधसंग्रह चांगला आहे. लेखक, कवि व मर्मीरसिक या नात्यानें गेलीं तीस वर्षे विविध नियतकालिकांतून लिहिणारें न्याय्याचें तु. ना. वाडकर हेहि उल्लेखनीय आहेत.

वासुदेव कृष्ण भावे (ज. २६ जानेवारी १८८५) यांनीं अनेक ग्रंथ लिहिले आहेत. या पैकीं पुढील महत्त्वाचे होत ब्राह्मणेतर वादाचे स्वरूप (१९२६) तुर्काचें साम्राज्य; पेशवेकालिन महाराष्ट्र, ग्रीस साहित्यादर्श, मुसल्मान पूर्व महाराष्ट्र, ब्राह्मण धर्म दर्शिका, शिवराज्य व शिवकाल (१९५७. भावे यांचे ग्रंथ परिश्रमपूर्वक लिहिलेले व माहितीनें भरलेले असें असतात.

ना. म पटवर्धन–यांनीं बरेच ग्रंथ लिहिलेले आहेत. सहेतुक, उपदेशात्मक पण रसाळ असे ग्रंथ यांचें असल्यानें त्यांचा एकत्र प्रस्तुत प्रधान उल्लेख केल्या वाचुन मला राहवत नाहीं ग्रंथ पुढीलप्रमाणें आहेत. आमची दिवाळी, जगांतील मौजा, जगातील मुलें, साम्राज्यातील आपले संबंधी, आमच्या इंदूचें शिक्षण, हितपत्रें व विरगुळा (१९६०). यांनीं लिहिलेल्या चरित्राचा उल्लेख चरित्राच्या प्रकरणात केला आहे.

श्री. अप्रबुद्ध–यांनीं बरेच मौलिक स्वरूपाचें ग्रंथ लिहिले आहेत. प्रस्तुत सारख्या मर्यादित स्वरूपाच्या ग्रंथात त्यांचा ओझरता उल्लेखच करता येईल.

वैदिक संस्कृतीची पुनर्घटना, ऋग्वेदाचा संदेश, वेदाचें अपौरुषेयत्व, ऐक्याचे खरे शत्रु, भारतीय विवाहशास्त्र, दोन साम्यवाद, लाल गुडगिरी, ब्राह्मण-एक राष्ट्रीय प्रश्न; पातंजल योगसूत्रें इत्यादि ग्रंथ प्रमुख आहेत.

वि गो. आपटे (जन्म ता २४ ऑक्टो. १९०३)-यांनीं गीता ज्ञानप्रदीप, सार्थ शिवमहिम्न, सार्थ हरिपाठ, सार्थ ईशावास्योपनिषद्, संक्षिप्त रामायण इत्यादि पुस्तकें सोप्या व रसाळ भाषेंत लिहिली आहेत.

टीकाविषयक, साहित्यविषयक स्वतंत्र दृष्टिकोन वाचकासमोर मांडणारे काहीं लेखक आहेत. बा. सी. मर्ढेकर यानीं आपल्या 'वाङ्मयीन महात्मता' या ग्रंथात वाङ्मयविषयक नवा दृष्टिकोन दाखविला आहे. सत्यकथा मासिकातील त्यांचे साहित्यविषयक लेख विचारप्रवर्तक आहेत. सौंदर्य आणि साहित्य (१९५५) या ग्रंथात त्यांनीं सौंदर्यभावना म्हणजे काय, कलेची फलश्रुति इत्यादि विषय चर्चीले आहे. वा. ना. देशपांडे हे चांगल्यापैकीं टीकाकार आहेत. 'विचार समीक्षा' हें त्यांचें लहानसें पुस्तक गुणानें मोठें ठरणारें आहे. लालजी पेंडसे यांच्या साहित्य आणि समाजजीवन (१९३५) पुस्तकानें एकेकाळीं खूपच खळबळ उडविली होती. सुप्रसिद्ध पत्रपंडित व लघुकथाकार प्रभाकर पाध्ये यांचें ' कलेचीं क्षितिजें ' हें पुस्तक विचार प्रवर्तक आहे. वामन मल्हार जोशी यांचीं विचारलहरी, विचारविलास आणि विचारसौंदर्य ही तिन्हीं पुस्तकें सोज्वळ आहेत. अनेक ग्रंथावर यात अभिप्राय आले असून अनेक साहित्यविषयक प्रश्नांची समतोल व तार्किक पण रमणीय चर्चा करण्यांत आली आहे. त्र्यंबक शंकर शेजवलकर यानींहि साहित्यासंबधीं काहीं मौलिक विचार प्रकट केले असून ते त्यांच्या 'शेजवलकरांचे लेख' या पुस्तकात वाचावयास मिळतात. प्रसिद्ध नाटककार व विनोदी लेखक आचार्य अत्रे यानीं निरनिराळ्या संमेलनातून जाहीर केलेल्या साहित्यविषयक विचारांना 'ललित वाङ्मय'[१] या

१. सिंहगर्जना (१९५७), मराठी लोक-मराठी मनें, मुद्दे आणि गुद्दे, पंचामृत, साहित्य यात्रा, भ्रमंती, अत्रे उवाच, हशा आणि टाळ्या, चित्रकथा, पत्रकार अत्रे, महात्मा फुले, समाधिवरील अश्रु.

प्रथात स्थान देण्यात आले आहे. त्याचा साहित्याकडे पाहण्याचा दृष्टिकोन वास्तववादी, जीवनवादी व रसिकतापूर्ण असा आहे रा. गो हर्षेंकृत 'टीका आणि अभ्यास' व 'गोविंदाग्रज' हे दोन्ही ग्रंथ चांगले साधले आहेत. इंदूरचे ग. वा. कवीश्वर यानीं कला व नीति यांच्यासंबंधीं मौलिक व साधार असे विवेचन केलें असून तें त्यांच्या नीति आणि कलोपासना (१९३४) व वाङ्मय विडंबनाचा वाद (१९४८) या ग्रंथात पाहावयास सापडतें. सुप्रसिद्ध ज्ञानकोशकार डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या 'महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण' या बहुमोल ग्रंथाचा कोणालाहि विसर पडणें शक्य नाहीं. प्राचीन मराठी कवींची काव्यपरी क्षणाची पद्धति कशा प्रकारची होती त्याचें विवेचन, या ग्रंथात विस्ताराने आले आहे. श्री. ना. बनहट्टी हेहि चांगल्यापैकीं निबंधकार असून त्यांनीं मयूरकाव्य विवेचन, ज्ञानोपासना व भारतीयांचें कर्तव्य, विष्णुशास्त्री चिपळूणकर, एकावली, नाट्य व रंगभूमि, वाङ्मयविमर्श, मराठी रंगभूमीचा इतिहास इत्यादि पुस्तकें अभ्यसनीय आहेत प्राध्यापक मा. का. देशपांडे यानीं 'प्रो. फडकेव्यक्ति आणि वाङ्मय,' 'अत्रे व्यक्ति आणि वाङ्मय' इत्यादि पुस्तकें माहितीपूर्ण व खरी आहेत. वा. भा. पाठक यानीं 'टीका व टीकाकार' नावाचा मोठा ग्रंथ लिहून मराठींतील टीकावाङ्मयावरून काहीं सिद्धांत निघतात कीं काय तें पाहाण्याचा प्रयत्न केला आहे. डॉ श. गो. तुळपुळे यांचे 'यादवकालीन मराठी' व 'पांच संतकवी' हे दोन्ही ग्रंथ अनुक्रमें भाषाभ्यासी व संतप्रेमी वाचकांना मोलाचे वाटतील डॉ. माधव गोपाळ देशमुख यांचा 'मराठीचें साहित्यशास्त्र' हा ग्रंथ विचारप्रवर्तक आहे. याशिवाय प्र. श्री कोल्हटकरकृत 'आकाशवाणी,' ना. गो. चापेकरकृत निबंधक लेख भाग १ व २, महादेव मल्हार जोशीकृत स्वामी सच्चिदानंदांचे विचार, प्रा. प्रामोपाध्येकृत वाङ्मयीन मूल्यें व जीवनमूल्यें, दु. का. संतकृत साहित्य आणि संस्कृति व कल्पनाविलास; प्रा. द. सी पंगूकृत प्राचीन मराठी कविपंचक, आस्वाद, तुषार; श्री मा. दाभाडे ऊर्फ शशांककृत कलांतरंग, भारतीय चित्रकला, चित्रामंदिरात इत्यादि ग्रंथ अवश्य वाचण्याजोगे आहेत

नाट्यसृष्टिसंबंधानें चर्चा करणारें बरेंच साहित्य मराठींत आहे. काशिनाथ बाळकृष्ण मराठे यांचा नावल व नाटक या विषयींचा निबंध इ. स. १८७२ मध्यें प्रसिद्ध झाला. आजच्या दृष्टीनें पाहतां निबंध सामान्य दर्जाचाच म्हटला पाहिजे. म. ना. ठोसर व ग. स. मराठे यांच्या नाट्यकलाकुठार (१९०८) या ग्रंथानील कोल्हटकरांच्या गुप्तमंजूष नाटकावरील विनोदी व मार्मिक टीकेनें एकेकाळीं खूपच खळबळ उडवून दिली होती. म. ना. ठोसर यांनीं हाच क्रम पुढें चालवून आपल्या नाट्यकलाकुठाराचे दोन घाव गडकऱ्यांच्या द्रौपदी व मेनका या नाटकांना लाविले. का. ना. पटवर्धन यांनीं 'नाटकांचे तारे' (१९१४) हा ग्रंथ लिहून त्यांत मराठी रंगभूमी, नट, नाटककार इत्यादींवर विनोदपूर्ण टीका केली. न. चिं. केळकर यांचें 'तोतयाचें बंड' हें नाटक प्रसिद्ध होतांच श्री. कृ. कोल्हटकर यांनीं मासिक मनोरंजनांत अनेक लेखमाला (१९१४) लिहून त्यांचें नाट्यशास्त्राधारें विस्तृत विवेचन केलें. अनंत वामन बर्वे यांनीं नाट्यबोध व नाट्यकथामृत इत्यादि पुस्तकें लिहून रंगभूमीची चांगली सेवा केली. आप्पाजी विष्णु कुळकर्णी व शंकर बापूजी मुजूमदार हे रंगभूमि नांवाचें मासिक कांहीं वर्षें चालवीत होते. सदरहू मासिकांतून रंगभूमिविषयक अनेक प्रकारची चर्चा आली आहे. या शिवाय शंकर बापूजी मुजूमदार यांनीं अण्णासाहेब किर्लोस्कर, भाऊराव कोल्हटकर, गॅरीक इत्यादींचीं चरित्रें, तसेंच 'महाराष्ट्रीय नाटककार' कुलीन स्त्रिया व रंगभूमि इत्यादि पुस्तकें लिहून एकोणिसाव्या शतकांतील मराठी रंगभूमीची बरीचशी यथार्थ कल्पना आणून दिली आहे. चिं. ग. भानू यांनीं भरतमुनीच्या 'नाट्यशास्त्र' ग्रंथाला मराठी वेषभूषा चढविली. डॉ. वि. पा. दांडेकर यांनीं 'केळकरांचीं सहा नाटकें' (१९३२) हा प्रबंध प्रसिद्ध करून त्यांत केळकरांच्या तोतयाचें बंडादि सहा नाटकांचा परामर्श घेतला आहे. मराठी नाट्यसृष्टि पौराणिक नाटकें (१९४१) व मराठी नाट्यसृष्टि–सामाजिक नाटकें (१९४५–१९२८)[1] या दोन ग्रंथांत दांडेकरांनीं मराठी नाट्यसृष्टीचा

---

१ (याची द्वितीयावृत्ति इ. स. १९५८ मध्यें प्रसिद्ध होऊन तेथपर्यंतच्या सामाजिक नाटकांचा विचार त्यांत आला आहे)

मुखवार्तापासून ते इ. स. १९५८ पर्यंतच्या काळाचा विस्तारानें व साधार विचार केला आहे 'मराठीचा नाट्यसंसार' या ग्रंथांत वि. स. खांडेकर यांनीं मराठी नाट्यसृष्टीचा थोडक्यात पण चांगला परामर्ष घेतला आहे. व. शा देसाई यांनीं 'मखमलीचा पडदा' हा ग्रंथ लिहून त्यात मुख्यतः गंधर्व नाटक मंडळीच्या रंगभूमीचा व तदनुषंगानें काहीं नाटकांचा विचार केला आहे.[1] भा. वि. वरेरकर गणपतराव बोडस व गो. ग. टेंबे यांनीं आत्मचरित्रपर पुस्तकें लिहून त्यात मराठी रंगभूमिसंबंधानें स्वतःचे बरेच अनुभव लिहिले आहेत. धोंडो वासुदेव गद्रे कृत 'नाट्य सुगंध' (१९६०) मध्यें नाट्यविषयक व देवलांसंबंधीं लेख आले आहेत. पु. गो. काणेकर ऊर्फ शारदाश्रमवासी यांचें 'माझ्या काहीं नाट्यस्मृति' हें पुस्तक चांगलें आहे. डॉ. य. ग. लेले यांचें 'यक्षगान-भागवत नाटक' हें पुस्तक विशिष्ट नाट्यप्रकाराची माहिती देणारें आहे. या शिवाय वामन हरि धारपुरेकृत ग्याडिलकरांची नाट्यसृष्टि; जोशी–साठेकृत गडकरी व किर्लोस्कर; वि. म कुलकर्णीकृत 'नाटककार खाडिलकर', (मृत्यु मार्च १९५४) वि. द. साठेकृत 'मराठी नाट्यकथा'[2] वा. वि. जोशीकृत नाट्यनिबंध, शिल्पकार र. कृ. फडकेकृत नाट्यपरामर्ष (१९४७), शं. वा. सहस्रबुद्धेकृत नाट्याचार्य खाडिलकर, के. शिंदेकृत नाटक शास्त्र आणि तंत्र, डॉ मनोहर माधव आळतेकरकृत शोककारण आणि मराठी शोकांतिका इत्यादि ग्रंथहि अभ्यसनीय आहेत

समाजशास्त्र या सदराखालीं सामान्यपणें पडू शकतील असे काहीं चांगले ग्रंथ मराठींत तयार झाले आहेत. अशा ग्रंथात ना. गो. चापेकरकृत बदलापूर व चित्पावन; वा. कृ. भावेकृत पेशवेकालीन महाराष्ट्र व मुसलमान पूर्व महाराष्ट्र; श्री. त्र्यं. केतकरकृत भारतीय समाजशास्त्र व प्राचीन महाराष्ट्र, दा. ना. आपटेकृत हिंदी मुमेरी संस्कृति, साने गुरुजीकृत भारतीय संस्कृति, महादेवशास्त्री दिवेकर-कृत हिंदुसंस्कृतिप्रदीप व आर्य संस्कृतीचा उत्कर्षापकर्ष; गो. म. जोशीकृत हिंदूंचें

१ नट, नाटक, नाटककार (१९५७) या ग्रंथात नाट्यशास्त्रावर चर्चा आहे.

२. मराठी नाट्यरचना (तंत्र आणि विकास १९५५).

समाजरचना शास्त्र, गो. चिं. भाटेकृत समाजशास्त्रावरील व्याख्यानें, डॉ. शं. दा. पेंडसेकृत महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास, डॉ. इरावती कर्वेकृत मराठी लोकांची संस्कृति, श्री. म [1]भाटेकृत अस्पृश्यांचा प्रश्न व पंचमानवसमाज; विठ्ठल रामजी शिंदेकृत भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न, डॉ. आंबेडकरकृत अस्पृश्य मूळचे कोण इत्यादि ग्रंथांचा समावेश होऊ शकेल.

हिंदुधर्मचर्चा या सदराखालीं ज्यांचा समावेश होऊ शकेल अशा ग्रंथांत चिं वि. वैद्यकृत हिंदु धर्माचीं तत्त्वें, वि. दा. सावरकरकृत हिंदुत्व, रघुनाथशास्त्री कोकजेकृत नवा आचारधर्म, भारतीय हिंदूंच्या अवनतीची मीमांसा, धर्मस्वरूप निर्णय; महादेवशास्त्री दिवेकरकृत नवा हिंदुधर्म, धर्मशास्त्रमंथन; केशव लक्ष्मण दप्तरीकृत धर्मरहस्य इत्यादि ग्रंथांचा निर्देश करता येईल. जुन्या पौराणिक कथा नव्या पद्धतीनें कीर्तनांत सांगणारीं दोन छोटीं पुस्तकें पुण्याचे श्री. विष्णु सखाराम घाटे यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांपैकीं एक आहे सावित्रीचें कथानक (१९३०) व दुसरें आहे मत्सासुर (१९३१). दोन्ही पुस्तकांत तत्कालीन भारतीय परिस्थितीचें प्रतिबिंब पडलें असून, लेखक त्यांवर कीर्तनें करीत असत व तीं लोकप्रिय होत. याच संदर्भात बडोद्याचे कीर्तनकेसरी नानाबुवा सुपेकर यांचीं कीर्तनविषयक पुस्तकें उल्लेखनीय आहेत.

## प्रवासवृत्तें

मराठींत प्रवासवृत्तें बरींच आहेत. त्या सर्वांचा परामर्श येथें घेणें अशक्य आहे. काहीं ठळक वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथांचाच येथें अंतर्भाव करण्यांत आला आहे. हिमालयांतील यात्रांचें वर्णन ल. वा. भावे, सयाजीराव गायकवाड, मो. गो. काळे, मो. ह. फडके, द. बा. उर्फ काका कालेलकर व कुंदर दिवाण यांनीं केलें आहे. मो. ह. फडके यांनीं 'माझी तीर्थयात्रा' (चार भाग) चाललें आवश्यक आहे. काका कालेलकरांचें माऊ धर्माधिकारी यांनीं अनुवादलेलें 'हिमालयांतील प्रवास' हें पुस्तक अत्यंत वाचनीय आहे हिमालयाची हाक

१. मृत्यु–२५ डिसेंबर १९५७ पुणें येथें कॅन्सरच्या विकारानें.

(१९४८) हे सुंदर दिवाळीचे पुस्तक चांगले आकर्षक आहे. पं. महादेवशास्त्री जोशी यांचा तीर्थरूप महाराष्ट्र लालित्य पूर्ण भाषेने व माहितीने भरलेला आहे. श्री ग. टिकेकरांची प्रवासवर्णने चांगली असतात. 'मुसलमानी मुलुखातली मुशाफरी' हे पुस्तक देशाभिमानी दृष्टी ठेवून लिहिलेले आहे. "भारतभ्रमण" हे ग. गो. भिडे यांचे पुस्तक उल्लेखनीय आहे. एन. एम. शिरवळकरकृत टीरोच्या सुवर्णस्वारीयात' (१९४७); गो. नि. दांडेकरकृत नर्मदेच्या तटाकी; ही प्रवासवर्णने भावपूर्ण आहेत. अनंत काणेकर यांची धुक्यातून लाल ताऱ्याकडे, आमची माती-आमचे आकाश व निळे डोंगर तांबडी माती ही तिन्ही पुस्तके रसिकता व व्यक्तिमत्त्वदर्शक झाली आहेत. प्रवासवृत्तान्त त्यांना एक स्वतंत्र स्थान आहे. पं. वा. काणे यांचा युरोपचा प्रवास सरस आहे. गंगाधर गाडगीळकृत साता समुद्रापलिकडे; अरविंद गोखलेकृत अमेरिकेस पहावे जाऊन' सौ. कमला फडकेकृत जितेन्द्रमची सफर; भा. गो. घाणेकर कृत काशी वाराणसी दर्शन; ज. पा. देशमुख कृत मला दिसलेला रशिया; ज्ञानेश्वर नाडकर्णी कृत विलायतची वारी, गौतम बुद्ध पाठक कृत श्री सोमनाथ तीर्थ, प्रभाकर पाध्ये कृत वैशिष्ट्य पूर्ण नवी क्षितिजे व उडता गालिचा; त्रि. गो. साठे कृत आसेतु हिमाचल; गो. त्रिं माटे कृत अनाकर्षक तक्षशिलाने भरलेली अनेक प्रवास वर्णने ही आपापल्या परीने उल्लेखनीय अशी आहेत या सर्व प्रवास वृत्तात मनात तारुण्यातील भरणारा व दणदार शैलीने नटलेला श्री पु ल. देशपांडे यांचा 'अपूर्वाई' (१९६०) या नावाचा वृत्तांत अत्यंत सरस आहे. एका दृष्टीने तो अपूर्वच आहे

इतिहासविषयक ग्रंथात चिं वि. वैद्यकृत महाभारताचा उपसंहार, महाराष्ट्रीय कृत रामायणाचा उपसंहार, के. ल. दप्तरीकृत महाभारतीय युद्धकालनिर्णय, वि. दा. सावरकरकृत १८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध व हिंदुपदपादशाही; य. न. केळकरकृत ऐतिहासिक पोवाडे, वसईची मोहीम व इतिहासातील सहली; त्र्यं. वि. आपटेकृत मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास, पोतदारकृत इतिहास व इतिहाससंशोधन, प्रभाकर पाध्ये व श्री. रा. टीकेकरकृत आजकालचा

महाराष्ट्र, भास्करराव जाधवकृत रामायणावर नवा प्रकाश, रियासतकार सरदेसाई यांच्या विविध रियासतींचा याचा प्रामुख्यानें अंतर्भाव करतां येईल. म. म. वा. वि. मिराशीकृत संशोधन मुक्तावलि. सर १,२,३; मेघदूतातील रामगिरी अर्थात् रामटेक; दे. गो. लाडवेकृत नागपूरचा सांस्कृतिक इतिहास व संशोधनांजलि; यादव माधव काळे यांनी संपादलेली नागपूरकर भोसल्यांची बखर, न. शे. ऊर्फ दादासाहेब पोहनेरकरकृत 'दासोपंतांची पासोडी' ( हा ग्रंथ संशोधन पर असून अेक दर्जाचा आहे. )

तत्त्वज्ञान या सदराखालीं सामान्यतः पडणारे बरेच महत्त्वाचे ग्रन्थ तयार झाले आहेत. अशा ग्रन्थांत रा. द. रानडेकृत[1] उपनिषद्रहस्य, श्री. म. वैद्यकृत प्रणवोपासना, लक्ष्मणशास्त्री जोशीकृत आनंदमीमांसा, ना. सी. फडकेकृत आधुनिक गीता, स. कृ. फडकेकृत मनोबोध आणि नवामनु, ग. स. भागवतकृत आत्मविद्या म्हणजे काय,[2] वि. रा. राजवाडेकृत नासदीयसूक्तभाष्य, मो. गो. मिडेकृत मननामोद, म. ह. मोडककृत खडे तात्त्विक बोल, सी. म. फडकेकृत वेदांतनिदर्शन, वि. वा. आपटेकृत श्रीमद्भगवद्गीताभाष्यार्थ, वि. रा. राजवाडेकृत गीताभाष्य, सदाशिवशास्त्री भिडेकृत श्रीमद्भगवद्गीतार्थ-रहस्यदीपिका, ज. स. करंदीकरकृत गीतार्थमंजरी, महादेव सीताराम सुडलेकृत गीताप्रणीत व्यवहारशास्त्र (१९५९); डॉ. के. ल. दप्तरीकृत औपनिषदिक जीवनसौख्य, श्री गणेश विष्णु तुळपुळेकृत श्री अंबुराव महाराजांच्या आठवणी, परमार्थपथ, तुकाराम भक्तीचा डांगोरा, साक्षात्कार पथावर तुकाराम; संतप्रणीत स्वरूप साक्षात्कार; गुरुदेव रानडे यांची परमार्थपर व्याख्यानें, नामदेव; फकिराजी गणगणेकृत भागवतधर्म आणि ईश्वर साक्षात्कार; वि. म. कर्वे ( जन्म ४ फेब्रुवारी १८९३ बडोदें. मृत्यु १६ डिसेंबर १९६० पुणें येथें ) यांचा उल्लेख येथेंच केलेला बरा. कोशकार कर्वे म्हणून ओळखले जात. डॉ. केतकरांच्या ज्ञानकोशात त्यांनीं पुष्कळ

१. मृत्यु ६-६-५७ गुरुवार, निंबाळ येथें.

२ ईश्वर आहे की नाहीं, सिद्धपुरुष व त्यांचे संप्रदाय, राजयोगाची मूलतत्त्वें.

लिहिले आहे. महाराष्ट्र शब्दकोश, महाराष्ट्र वाक्संप्रदायकोश, शास्त्रीय परिभाषा कोश इत्यादि त्यांची पुस्तकें उपयुक्त आहेत. त्यांनीं अनेक विषयांवर लिहिलेले लेख माहितीनें भरलेले आहेत. ग. वा कवीश्वरकृत गीतातत्त्वदर्शन इत्यादि ग्रंथांचा तसेंच व्यक्तींचा समावेश करता येईल.

शिक्षणविषयक मानसशास्त्रीय ग्रंथांत द. ना. नेनेकृत शिक्षणकला व मानसशास्त्र, ना. म पटवर्धनकृत आमच्या इंदूचें शिक्षण व भा. धों कर्वेकृत अध्यापन व मानसशास्त्र यांची गणना होऊं शकेल. ज्योतिःशास्त्रासंबंधीं झालेल्या ग्रंथांत के. ल. दप्तरीकृत भारतीय ज्योतिःशास्त्रनिरीक्षण, श. बा. दीक्षितकृत भारतीय ज्योतिःशास्त्र व ज्योतिर्विलास हे ग्रंथ प्रमुख होत. आइनस्टाईनच्या अपेक्षावादावर प्रो द. गो मटंगेकृत अपेक्षावाद व भारद्वाजकृत सापेक्षवाददर्शन अशीं दोन उल्लेखनीय पुस्तकें आहेत

व्याकरण, भाषाशास्त्र, व्युत्पत्तिविषयक ग्रंथांत प्रा. कृ. पां. कुलकर्णीकृत भाषाशास्त्र आणि मराठी भाषा, मराठी भाषा-उद्गम व विकास, व्युत्पत्तिकोश; य. रा. दातेकृत भाषाशास्त्र व जगांतील भाषा, मराठी भाषेची उत्पत्ति, मराठी भाषेची वाट, महाराष्ट्रदेश जनता व भाषा; ना. म. पावगीकृत भाषाशास्त्र, राजारामशास्त्री भागवतकृत प्राकृतभाषेची चिकित्सा; वि. का. राजवाडेकृत ज्ञानेश्वरीचें व्याकरण. गो. कृ मोडककृत मराठीचें अंतरंगदर्शन, मोरो केशव दामलेकृत शास्त्रीय मराठी व्याकरण[1] इत्यादींची प्रामुख्यानें गणना होते.

अर्थशास्त्रावरील प्रमुख ग्रंथांत वा. गो. काळेकृत अर्थशास्त्र व भारतीय अर्थशास्त्र, धनंजयराव गाडगीळकृत हिंदुस्थानचा आर्थिक इतिहास; न. वि. गाडगीळकृत ग्यानबाचें अर्थशास्त्र व हिंदी अदाअपत्रकें, आचार्य जावडेकरकृत अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र यांचा समावेश होतो राजकारणविषयक ग्रंथांत न. चिं. केळकरकृत राज्यशास्त्र, आचार्य जावडेकरकृत आधुनिक भारत, पा. वा. गाडगीळ कृत कॅपिटल, न. वि. गाडगीळकृत राज्यशास्त्रविचार, ज. स. करंदीकरकृत

१ डॉ ना गों कालेलकरकृत ध्वनिविचार (१९५६)

निवडक लेख, ग. वि. केतकरकृत मर्मभेद, भा. व. भोपटकरकृत भाल्याच्या फेरी भाग १-२ दत्त नारायण आपटेकृत 'निसर्गसंपत्ति व मानव', पॅलेस्टाईन, (यांनी ह्यूमाच्या मॅन इन दि आयर्न मास्कचे भाषांतर, टॉलस्टॉयच्या वॉर अँड पीसचें युद्ध आणि शांतता-भाषांतर केलें आहे. राजकीय व अर्थशास्त्रीय लेखन यांचें विपुल आहे) इत्यादींची गणना होईल.

संकीर्ण निबंधांत वि. दा. सावरकरकृत सावरकर साहित्य भाग १ ते २ व क्षकिरणें; विनोबा भावेकृत गीता प्रवचनें, मधुकर व विचारपोथी, के. सी. ठाकरेकृत स्वाध्याय संदेश, आचार्य कालेलकरकृत हिंडलग्याचा प्रसाद, ग्रंथालयीन वर्गीकरण इत्यादि पुस्तकांचे कर्ते श्री. पु. कोल्हटकर (ज. २१-६-१९११). जगांत वागावें कसें ? जपानच्या प्रगतीची शिटोरी, सुलभ वेदांत, इच्छापूर्ति करणारा धर्म इत्यादि ग्रंथांचे कर्ते वि. रा वेलणकर (ज. ६ जानेवारी १८८७); संत वाङ्मयाचा परामर्श (१९५६) व युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा (१९६०) या ग्रंथांचे कर्ते डॉ. श्री. म. पिंगे (ज. २४ एप्रिल १९१६), संकेत कोश (१९५९) या ग्रंथाचे संपादक श्री. शा. हणमते, विज्ञानप्रणीत समाजरचना, भारतीय लोकसत्ता (१९५४) स्वभावलेखन, माझें चिंतन, राजविद्या (१९५९) इत्यादि मौलिक ग्रंथांचे चिंतनशील वृत्तीचे व विधायक प्रकारची टीका करणारे ग्रंथकार डॉ. पु ग. सहस्रबुद्धे (ज. १०-६-१९०४), मराठी काव्यसमीक्षा, निर्झरिणी व साहित्य सौरभ या पुस्तकांचे लेखक वि. अ. कुलकर्णी, निबंधलेखन (१९६०) या पुस्तकाचें कर्ते मा. गो दामाडे (ज. ४-१-१९११); मराठी ग्रंथ सूचिकार शंकर गणेश दाते; इंग्रजी काव्यस्फूर्तींची पाणपोई खंड १ व २ आणि गंगालहरी या भाषांतरित ग्रंथांचे कर्ते लक्ष्मण गोविंद विंझे (ज २ मार्च १९०२), इत्यादींची गणना होईल.

पत्र पंडितांत काहींकाचे आपापल्या पत्रांतील लेख साहित्याच्या कसोटीला उतरणारे असे असतात. मागच्या पिढींत लो. टिळक, आगरकर, शिवरामपंत परांजपे, न. चिं. केळकर, कृष्णाजीपंत खाडिलकर, अच्युतराव कोल्हटकर,

